# मराठी बखर गद्य

संपादक
डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये, एम्. ए., पीएच्. डी.
मराठीचे प्राध्यापक, खालसा कॉलेज, माटुंगा

मूल्य रु. ३-०-०

व्हीनस बुक स्टॉल : पुणे

पहिली आवृत्ति १९५२



मूल्य तीन रुपये फक्त

प्रकाशक :
स. कृ. पाध्ये
व्हीनस बुक स्टॉल
अप्पा ब[illegible] : पुणे २

मुद्रक :
श्री. र. राजगुरु
राजगुरु प्रेस
४०५ नारायण : पुणे २

# अनुक्रमणिका



# मराठी बखर गद्य

## प्रस्तावना

प्राचीन मराठींत पद्याच्या मानानें गद्य फारच अल्प आहे ही समजूत दिवसेंदिवस कमी होत आहे. महानुभावी वाङ्मयाच्या शोधानें जसें 'पद्याचें एक दालन खुलें झालें, तसेंच मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें गोळा करण्याच्या प्रयत्नानें ऐतिहासिक गद्याचें आणखी एक दालन उघडलें गेलें. या दालनांत छोट्यामोठ्या लोकांनीं लिहिलेलीं नाना पत्रें जशीं आढळतात, तशींच 'पुरातन माहितगारांकरवीं नवीनांच्या मार्गदर्शनासाठीं सजविलेल्या' अनेक बखरीहि आढळतात. स्वराज्याच्या काळांत मुख्यतः निर्माण झालेलें हें गद्य साहित्याचें लेणें किती दिवस अज्ञात राहतें कोण जाणे. परंतु ग्रँड डफ साहेबानें मराठ्यांचा इतिहास लिहिला आणि त्यांतील पूर्वग्रह, अल्प माहिती व चुकीचीं विधानें यांनीं मराठ्यांचा अभिमान दुखविला. साहाजिकच, न्यायमूर्ति रानड्यांना 'Rise of the Maratha power' हा चिकित्सापूर्ण ग्रंथ लिहावा लागला, आणि तेलंगांना 'मराठ्यांच्या इतिहासांतील कांहीं टिपणें' प्रसिद्ध करावीं लागलीं; इतकेंच नव्हे तर ज्या बखरींच्या साह्यानें साहेबानें आपला ग्रंथ रचिला होता, त्या बखरींचा शोध घेऊन इतिहासाचें साधन म्हणून त्यांची परीक्षा पाहण्याची आवश्यकताहि निर्माण झाली. त्यांतच अस्सल पत्रें, यादी, तहनामे, करीणे इत्यादि अनेक ऐतिहासिक साधनांचा शोध घेण्याचा नि प्रसिद्ध करण्याचा प्रचंड उद्योग आरंभिला गेला. चिपळूणकर, कीर्तने, साने, राजवाडे, खरे, पारसनीस इत्यादि संशोधकांच्या यासंबंधींच्या कामगिरीला तोड नाहीं. साने यांनीं 'काव्येतिहाससंग्रह' सुरू केला. पारसनिसांनीं 'भारतवर्ष' काढला आणि राजवाड्यांनीं 'मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांचे खंडच्या खंड' प्रसिद्ध करण्याचा सपाटा सुरू केला. या साऱ्या प्रचंड उद्योगांतून मराठ्यांच्या खऱ्या इतिहासलेखनाला जशी मदत झाली, तशीच त्यांतून उजेडांत आलेल्या बखरी, पत्रें, कैफियती,

इत्यादींमुळें ऐतिहासिक गद्य साहित्यांतहि मोलाची भर पडली. विशेषतः बखरींचें लेखन ज्या हेतूनें झालें आणि ज्या विशिष्ट पद्धतीनें झालें, त्यामुळें इतिहासलेखनाचें साधन म्हणून जरी त्यांचें महत्त्व कमी ठरलें, तरी ऐतिहासिक काळांतील गद्य सारस्वताची एक शाखा म्हणून त्यांचें महत्त्व स्पष्ट झालें. प्रस्तुत 'मराठी बखर गद्य' या पुस्तकांत त्यांचे कांहीं नमुने संग्राहित केले आहेत ते याच हेतूनें. बखरींचा अभ्यास इतिहास म्हणून करण्याऐवजीं (कारण इतिहास या दृष्टीनें त्या गौण ठरतात.) गद्य सारस्वताचा एक नमुना म्हणून करणें अवश्य आहे. प्रस्तुत संग्रहांतील उताऱ्यांकडेहि याच दृष्टीनें पाहावें. 'महिकावतीची ऊर्फ माहिमची बखर' या उपलब्ध अशा जुन्यांतल्या जुन्या बखरीपासून तों अव्वल इंग्रजींत लिहिल्या गेलेल्या 'हरिवंशाच्या बखरी' पर्यंत ज्या कांहीं बखरी छापून प्रसिद्ध झालेल्या आहेत, त्यांपैकीं कांहींचे उतारे येथें घेतले आहेत. कालक्रमाच्या दृष्टीनें 'हरिवंशाची' बखर अखेरीस यायला हवी; परंतु प्रस्तुत संग्रहांत त्या आधींची बृहदीश्वराची शिलालिखित बखर अखेरीस घातली आहे. एक तर ती दूर तंजावरची आहे आणि दुसरें म्हणजे ती शिलालिखित आहे. कालानुक्रम येथें सोडण्याचें कारण इतकेंच. तसेंच प्रस्तुत संग्रहांतील उताऱ्यांसाठीं मुख्यतः बखरींची निवड केलेली असली, तरी त्यांना जवळ असणाऱ्या कैफियती आणि थैली यांचाहि येथें समावेश केला आहे. 'नानांचें आत्मचरित्र'हि याच दृष्टीनें येथें घेतलें आहे. नाहीं म्हणायला, 'आज्ञापत्र' आणि 'राजनीति' यांचा समावेश यांत कसा केला अशी शंका कुणाला येऊं शकेल; परंतु तो बुद्धिपुरस्सर केलेला आहे. कारण ऐतिहासिक काळांतील राजनीतिशास्त्रावरील हीं दोन स्वतंत्र प्रकरणें आहेत आणि गद्य सारस्वताच्या दृष्टीनेंहि त्यांच्यांत कांहीं गुण आढळण्यासारखे आहेत. सारांश, ऐतिहासिक काळांतील बखरी वा बखरींना जवळ असणारें गद्य सारस्वत यांचें स्वरूप प्रस्तुत संग्रहांतील उताऱ्यांवरून स्पष्ट व्हावें, आणि त्यांचा अभ्यास मुख्यतः गद्य सारस्वत या दृष्टीनें व्हावा.

बखरींचें लेखन मुख्यतः स्वराज्याच्या काळांत झालेलें असलें, तरी त्यांची परंपरा फार पुरातन कालापासूनची आहे, असें राजवाडे यांचें अनुमान आहे. त्यांनीं पाहिलेली जुन्यांतली जुनी बखर म्हणजे 'शालिवाहनाची बखर!'

महानुभावांनीं लिहिलेल्या 'सिंघणादि यादवांच्या बखरीचीं कांहीं पानें त्यांच्या अवलोकनांत आलीं होतीं म्हणे. हेमाडपंती बखरीचीहि त्यांनीं नोंद केली आहे. ( राजवाडे-ऐतिहासिक प्रस्तावना, पृ. ३४८–३४९. )

परंतु आज मुद्रित स्वरूपांत उपलब्ध असलेली जुन्यांतली जुनी बखर म्हणजे 'महिकावतीची ऊर्फ माहिमची बखर' होय. ही गद्यपद्य असून तिचीं प्रकरणें निरनिराळ्या लेखकांनीं निरनिराळ्या काळीं लिहिलेलीं आहेत ( इ. स. १४४८–१४७८ ). यानंतरची उपलब्ध बखर म्हणजे इ. स. १५६५–६६ मधील 'राक्षेसतागडीची बखर' होय. मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेच्या आधीं लिहिल्या गेलेल्या या बखरी झाल्या. यानंतर पांचपन्नास वर्षांनीं भोंसल्यांचें कुळ जन्मास आलें आणि स्वराज्याचा पाया घातला गेला. या स्वराज्यस्थापनेच्या काळापासून तों शनिवारवाड्यावर इंग्रजांचा बावटा उभारला जाईपर्यंत साधारण दोन-अडीचशें बखरींचें लेखन झालें असावें. अव्वल इंग्रजीला सुरुवात झाल्यानंतरहि मराठे सरदारांच्या वतनासाठीं म्हणून कांहीं बखररूप लेखन झालेंच; परंतु एकंदरींत बखरलेखकांचा म्हणून जो एक वर्ग निर्माण झाला आणि त्यानें प्रत्यक्ष पाहिलेल्या किंवा कर्णोपकर्णीं ऐकिलेल्या माहितीच्या आधारें ज्या बखरी सजविल्या, त्या स्वराज्याच्या नि स्वराज्याचें साम्राज्य झाल्याच्या काळांतच.

बखरींचें लेखन मुख्यतः कांहीं विशिष्ट काळांतच झालेलें दिसतें. त्याचीहि कांहीं संगति लागूं शकते. शिवाजीनें मराठी राज्याची स्थापना करतांच समाजांत एक प्रकारचें चैतन्य निर्माण झालें होतें. शिवाजी हा नुसता पराक्रमी पुरुषच नव्हे तर एक अवतारी विभूति आहे असा समज दृढ झाला होता. तसेंच समरांगणावर समशेर गाजविणाऱ्या वीरपुरुषांसंबंधींहि एक प्रकारचा आदर निर्माण झाला होता. वीरांचे आदर्श आपल्यापुढें ठेवावेत, त्यांच्या पराक्रमांचे पोवाडे गावेत, प्रसंगीं त्यांत आपल्या मनाचे रंग भरावेत, अशा प्रकारची वृत्ति निर्माण झाली होती. वीरयुग म्हणतात तें यालाच. महाराष्ट्रांत पोवाड्यांची निर्मिति झाली ती याच काळांत; परंतु पोवाडे हें बोलूनचालून काव्य होतें. वीररसाला म्हणजे रसयुक्त काव्याला त्यांत उधाण येणें साहजिक होतें; परंतु केवळ व्यवहारासाठीं, नवीनांना मार्गदर्शन

करांवें या हेतूसाठीं लिहिल्या गेलेल्या गद्य बखरींत देखील वीरयुगानें आपल्या अद्भुतरम्यतेचा प्रभाव दाखविला. शिवाजी तर काय केवळ अवतारी पुरुष मानला गेला होता; परंतु संभाजीसारख्या व्यसनी राजानें औरंगजेबाला तडफदार उत्तर देऊन धर्मासाठीं मरण पत्करतांच समाजानें त्याच्या व्यसनावरहि पांघरूण घातलें. राजारामाला रानोमाळ करीत परागंदा व्हावें लागलें म्हणून त्याच्या नि त्याच्या सहकाऱ्यांसंबंधीं जशी लोकांना खंत वाटली, तशीच त्यानें पुनरपि स्वराज्याची विस्कटलेली घडी बसवितांच त्याच्याबद्दलचा त्यांचा आदर दुणावला. या झाल्या छत्रपतींच्या जमान्यांतल्या गोष्टी. पण पेशवाईत भीमथडीचे घोडे गंगथडीला भिडले. स्वराज्याचें साम्राज्य झालें आणि अखेर त्याचें पानिपतहि झालें; परंतु या साऱ्यांत खुद्द पेशव्यांनीं किंवा त्यांच्या छोट्यामोठ्या सरदारांनीं पराक्रमाची जी सीमा गांठली तिनें मराठी मन मोहून गेलें. पानिपतावर प्यादेमात होऊन सव्वा लाख बांगडी फुटली; पण भाऊसाहेबानें संग्रामांत उडी टाकतांत तो कल्पांतींचा आदित्य भासला. पानिपतावर किती तरी बखरी नि कैफियती रचिल्या गेल्या. सारांश, ज्या वीरयुगाची सुरुवात शिवरायाच्या स्वराज्यस्थापनेनें झाली त्या वीरयुगाचा एक अपरिहार्य परिणाम म्हणजे बखरींची निर्मिति व त्यांना प्राप्त झालेलें विशिष्ट स्वरूप. पराक्रमी पुरुषांचीं चरित्रें खुलवून सजवून सांगावींत, आणि अनेक वीरपुरुषांची आहुति घेणाऱ्या रणचंडीचें रोमहर्षक वर्णन करावें, या प्रकारचा बाणा बखरींत उतरला तो या वीरयुगामुळेंच. स्वराज्यस्थापनेच्या आधींच्या म्हणून आढळणाऱ्या बखरींतहि मुख्यतः युद्धप्रसंगांचींच वर्णनें येतात त्याचेंहि कारण असेंच असावें.

वीरयुगांत, वीरपुरुषांना आणि त्यांच्या पराक्रमकथांना जें महत्त्व येतें, त्यामुळें त्यांच्या चरित्रग्रंथांनाहि उधाण येतें. स्वराज्याच्या काळांत निर्माण झालेल्या बऱ्याच बखरींत चरित्रांना जें प्राधान्य मिळालेलें आढळतें तें त्यामुळेंच; परंतु येथें अशी एक शंका येऊं शकेल कीं, महाराष्ट्रांत यापूर्वींची अशी चरित्रपरंपरा नव्हती का? चरित्रग्रंथ या वीरयुगापूर्वीं महाराष्ट्रांत लिहिले गेले नव्हते का?

वस्तुतः प्राचीन मराठींत बखरींतील चरित्रपरंपरेहून निरांळी अशी चरित्र-

परंपरा होती. नाभाजीची 'ग्रंथमाला', नामदेवानें लिहिलेलें ज्ञानेश्वरचरित्र किंवा इतर बहुतेक संतांनीं एकमेकांचीं वा त्यांना गतकालीन असणाऱ्या संतांचीं लिहिलेलीं चरित्रें, किंवा दासोदिगंबर आणि महिपतीनें वर्णिलेलीं भक्तचरित्रें, इत्यादींची येथें आठवण होईल. परंतु तीं सारीं परमपवित्रांचीं होतीं; अध्यात्माची साधना करणाऱ्या साधकांचीं होतीं; मोक्षाच्या मार्गा-वरील मार्गदर्शकांचीं होतीं. या साऱ्या संतांबद्दल सामान्य जनाला आदर वाटे, भक्ति वाटे; परंतु त्यांत सामान्यांना आकर्षण वाटेल, त्यांच्या जीवनांत यांचेंहि मन समरसून जाईल अशा प्रकारच्या दृष्टीनें तीं लिहिलीं, गायिलेलीं नव्हतीं. त्यांच्या चरित्रकारांची त्यांच्याकडे पाहण्याची दृष्टिच निराळी होती. म्हणून या चरित्रांना फार तर अध्यात्मिक चरित्रें म्हणतां येईल. येथें महानु-भावांच्या 'गोविंदप्रभुचरित्र', 'लीलाचरित्र' इत्यादींची याद चुकली असें वाटेल; परंतु त्यांचाहि उद्देश केवळ पंथीयांना अध्यात्मिक मार्गदर्शन असाच होता. परंतु बखरींमधून चारित्रलेखनाला जेव्हां सुरुवात झाली, तेव्हां त्यांचें उद्दिष्ट निराळें होतें असें दिसतें. त्यांचें लक्ष्यकेंद्र बदललेलें होतें. 'पुरातन माहितगारांची माहितीहि' निराळ्या प्रकारची होती आणि नवीनांना त्यांतून मिळणाऱ्या मार्गदर्शनाचें स्वरूपहि निराळें होतें. ज्या विशिष्ट काल-खंडांत बखरींचें लेखन झालें, त्या काळाची म्हणजे वीरयुगाची आणि त्यांतून निर्माण झालेल्या बखरींची सामान्यतः संगति ही अशा प्रकारची लागते.

आतां बखरींना जें गद्य सारस्वताचें स्वरूप प्राप्त झालें म्हणून म्हणतात, त्याचा अर्थ काय, याचाहि थोडा विचार केला पाहिजे.

बखरींचें वाचन करतांना, निदान कांहीं बखरींचें वाचन करतांना आपणांस अशी एक शंका येते कीं, आपण एखादी कादंबरी तर वाचीत नाहीं ना? घडलेल्या घटनांचें आणि त्यांतील तपशिलांचें आपण वाचन करीत असतों; परंतु त्या निर्जीव घटना किंवा ते कोरडे तपशील (Bare facts) जणूं जिवंत होऊन चालूं बोलूं लागतात. म्हणजे त्या घटनांचें वर्णन करतांना बखरकार त्यांच्याशीं असा कांहीं तादात्म्य पावतो, आणि त्यांत आपल्या कल्पनांचे असे कांहीं रंग भरतो कीं, अखेर त्यामागील ऐतिहासिक सत्याचें काल्पनिकांत परिवर्तन होतें आणि तद्द्वारां कांहीं

एका भावनात्मकतेची जाणीव होते. 'भाऊसाहेबांची बखर', किंवा 'पानिपतची बखर' यांत असा अनुभव वरचेवर येतो. हें असें कां व्हावें? प्रत्यक्ष पाहिलेली, वा कर्णोपकर्णी ऐकिलेली किंवा जमविलेली माहिती संगतवार सांगूं इच्छिणाऱ्या बखरींतून कल्पनेनें निर्मिलेल्या कादंबरीचा प्रत्यय कां यावा? बखरकार हा कितीहि कुशल कथनकार असला तरी तो कांहीं कादंबरीकार नव्हे. म्हणजेच त्यानें आपल्या कथनाला, बखरलेखनाला सुरुवात करतांच अशा कोणत्या गोष्टी घडतात कीं, त्याच्या लेखणींतून ऐतिहासिक सत्याचें दर्शन होण्याऐवजीं वाङ्मयीन भावसत्याचें दर्शन घडल्याचा भास व्हावा? अर्थात् येथें एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं, बखरकार हा कांहीं जाणीवपूर्वक कलानिर्मिति करणारा कलावंत (Conscious artist) नव्हे; परंतु बखरींच्या एकंदर घाटावरून व त्यावर चढलेल्या कल्पनेच्या व भावनात्मकतेच्या रंगावरून बखरकार हा एक Unconscious artist आहे असें अनुमान केलें तर वावगें होणार नाहीं. कारण निर्जीव घटना, इतिहासवजा प्रसंग, मृत व्यक्ति इत्यादिकांचे जे कांहीं तपशील त्यानें गोळा केलेले असतात, म्हणजे इतिहासानें जी वस्तुस्थिति त्याच्या डोळ्यांपुढें उभी केलेली असते, तिच्यांतून तो संपूर्ण काल्पनिक सृष्टि निर्माण करीत नसला आणि त्यांतून अखेर कांहीं एक कलात्मक प्रत्यय देत नसला, तरी त्या ऐतिहासिक वस्तुस्थितीला चालती-बोलती करितो, हें खास. अर्थात् बखरलेखनामागची प्रक्रिया ही कांहीं ऐतिहासिक कादंबरीसारखी असते असें म्हणावयाचें नाहीं; किंबहुना ती तशी नसतेहि. कारण ऐतिहासिक कादंबरीकार जेव्हां इतिहासाचा उपयोग करतो, तेव्हां तो त्यांतील साराच्या सारा तपशील वापरीत नाहीं. तर उलट त्याला जो परिणाम साधावयाचा असेल त्याला सुसंगत अशांचीच फक्त निवड करतो. अर्थात् ही क्रिया त्याच्या कल्पनाशक्तीकडून आपोआप होत असते. याशिवाय त्या कल्पनाशक्तीकडून वास्तवाबरोबर कांहीं काल्पनिक प्रसंगांची नि व्यक्तींची निर्मितिहि होत असते. कारण त्याच्या दृष्टीनें ऐतिहासिक तपशिलाला महत्त्व असत नाहीं, तर मागच्या सत्याला, कल्पनेला (Idea) महत्त्व असतें; आणि त्या सत्याचा जसा त्याला भावनात्मक प्रत्यय आलेला असतो तसाच भावनात्मक प्रत्यय त्याला वाचकांनाहि द्यावयाचा असतो.

कलावंताच्या या साऱ्या प्रक्रियेंत वास्तव ( अर्थात् ऐतिहासिक वास्तव ) सृष्टि आणि काल्पनिक सृष्टि यांचें असें कांहीं बेमालूम मिश्रण झालेलें असतें कीं, अखेर त्यांतून इतिहासाऐवजीं इतिहासावर आधारलेली एक स्वतंत्र कलाकृति निर्माण होते. इतिहासानें जणूं वर्तमान-भविष्याला पालाण घातलेलें असतें. त्यांतील व्यक्ति या व्यक्ति न उरतां, साऱ्या व्यक्तिमात्राच्या त्या प्रतिनिधि बनलेल्या असतात. प्रसंगांनीं एका विशिष्ट स्थळकाळाची चौकट ओलांडलेली असते. सारांश, ती कलाकृति एका विशिष्ट ऐतिहासिक घटनेवर आधारलेली असली, तरी तिच्यांतून त्यामागील संगतीची व संपूर्ण अशा भावनात्मक सत्याची प्रतीति होत असते, म्हणजेच इतिहासाच्या तात्कालिकांतून कलेच्या शाश्वततेची जाणीव होते.

ऐतिहासिक व्यक्ति, घटना वा प्रसंग इत्यादिकांचें तपशीलवार व प्रसंगीं रंगतवार कथन करणाऱ्या बखरकाराकडूनहि असाच परिणाम साधला जातो असें सुतराम् म्हणावयाचें नाहीं. मात्र इतिहासाच्या रुक्ष तपशिलाहून निराळा आणि ऐतिहासिक कादंबरीला जवळ असणारा असा कांहीं एक निराळाच परिणाम साधला जातो हें खास. बखरींच्याकडे गद्य सारस्वताचा कांहीं स्वतंत्र विलास म्हणून पाहिलें पाहिजे तें यासाठींच; परंतु त्याआधीं, म्हणजे बखरींना स्वतंत्र प्रकार म्हणून मानण्याआधीं, त्यांच्या निर्मितीच्या वेळीं होणाऱ्या प्रक्रियेचा कांहीं विचार करतां येतो का पाहूं.

बखरकार हा जाणीवपूर्वक कला निर्माण करणारा कलावंत नाहीं, हें वर पाहिलेंच आहे; परंतु असें असलें तरी त्या इतिहासाबद्दल किंवा ऐतिहासिक पात्रप्रसंगाबद्दल त्याला एक प्रकारचा जिव्हाळा वाटत असतो. वर्णित व्यक्तीसंबंधानें नितान्त आदर असतो. ज्या वीरयुगाचा वर उल्लेख केला त्या वीरयुगाच्या विशेषानें त्याचें मन भारून गेलेलें असतें. शिवाय तो फार्शी-उर्दू शिकलेला, सरकारदरबारांत वावरणारा, रामायणभारतादि पुराणांचें श्रवण-पठण केलेला असा बहुश्रुत, आणि पुनः कथनकाराचें कौशल्य असलेला असा कथनकार असतो. इतिहासाचें काव्य बनलेल्या रामायणमहाभारताचे आदर्श जाणीवपूर्वक त्यानें समोर ठेवलेले नसले, तरी सूतशौनकादिकांप्रमाणें पृच्छक कथनकारांची एक जोडी निर्माण करून तसलाहि थाट आणण्याचा तो आव

आणतो. सारांश, बहुश्रुतता, कथनकाराचें कौशल्य, आणि शिवाय वर्णित व्यक्तीसंबंधीं आदरयुक्त प्रेम इत्यादीमुळें तो वर्णित विषयांत प्रथम स्वतःच रंगून जातो. साहजिकच त्याच्या मनांतील पात्र-प्रसंगांच्या चित्रांना एक प्रकारचा जिवंतपणा येत जातो. इतिहासाच्या रुक्ष घटनांना हालत्या-बोलत्या चित्र-पटाचें स्वरूप प्राप्त होतें. त्यांतील चित्रें उपमा-उत्प्रेक्षादि अलंकारांनीं नटून जातात. वीररौद्रादि रसांनीं बेहोष होतात आणि समरांगणावर झालेल्या संहाराच्या शोकानें व्याकुळहि होतात. नाहीं म्हणायला एक शृंगाराची रीत बखरींना ठाऊक नाहीं आणि तेंहि साहजिकच आहे. पराक्रमी पुरुषांशीं आणि रणांगणाशींच त्यांचा संबंध अधिक. पण एक शृंगार सोडला तर इतर रसांचा कमी-अधिक आविष्कार त्यांत झालेला आढळेल. अर्थात् वीर आणि करुण यांचा प्रत्यय त्यांतल्या त्यांत अधिक. परंतु हा सारा भावनात्मक परिणाम साधण्यामागें ऐतिहासिक कादंबरीची वा तिच्यासारखी कलात्मक प्रक्रिया घडत असेल, असें म्हणावयाचें नाहीं. तरीपण जमविलेल्या ऐतिहासिक तपशिलांची संगति लावतांना इतिहासाला कल्पनेचे पंख चिकटतात आणि त्यांची ऐतिहासिक कादंबरी झाली नाहीं तरी इतिहासाहून निराळी आणि कादंबरीला जवळची अशी बखर निर्माण होते.

बखरींचें ज्या कांहीं प्रकारचें एथवर विवेचन केलें, त्या प्रकारचा निकष साऱ्याच बखरींना लावतां येईल असें म्हणतां येणार नाहीं. तें सारें बखर-काराच्या मगदुरावर अवलंबून आहे. बखरकारांत जितक्या प्रमाणांत कुशल कलावंत असेल तितक्या प्रमाणांत त्याची बखर वर दिलेल्या बखरींच्या निकषाला उतरेल. असो. बखरींना गद्य सारस्वताचें जें स्वरूप प्राप्त झालेलें आहे तें या प्रकारचें आहे.

बखरनवीस हे मुख्यतः कारकुनी पेशांतील असत. कांहीं प्रमुख बखरकार तर चिटणीसच होते. हा वर्ग म्हणजे तत्कालीन मध्यम पांढरपेशा नोकरदार-वर्ग होय. त्यांच्या घरच्या बाळबोध वळणाला सरकारदरबारचा राजमान्य रुबाबहि आलेला होता. त्यांच्या मूळच्या सुसंस्कृत मराठी वाणीला फार्शी-उर्दूची जानपछानहि झालेली होती. किंबहुना त्यांची मराठी ' फार्शी-उर्दूला आपल्या पोटीं पचवून,' पुनरपि डौलदार, घाटदार आणि ऐटबाज झाली होती. लहान लहान साध्या वाक्यांपासून तो प्रौढ संस्कृतप्रचुर व लांबलचक

सदार वाक्यें पेलण्याइतपत तिला शक्ति आली होती. कारण पूर्वीच्या
ध्या कर्ता-क्रियापदांच्या ओक्याबोक्या संसारांत विशेषण-क्रियाविशेषणादींचा
रेवार जणूं डामडौलांत बसला होता. नवे प्रसंग, नवे अनुभव आणि
व्या भावना इत्यादींची सार्थ अभिव्यक्ति करण्याचें सामर्थ्य तिला आलें होतें.
बहुना ती अधिकाधिकच रसाळ, प्रौढ आणि रेखीव होत होती. ही अशा
कारची भाषा ज्यांच्या लेखणींतून संतत वाहात होती, त्या बखरकारांनीं
खरींतून जिवंत आणि रमणीय चित्रें निर्माण केलीं असतील तर नवल नाहीं.
तुतः बखरकारांचें मुख्य कार्य म्हणजे कथनकाराचें; पाहिलेल्या वा ऐकिलेल्या
संगांचें व व्यक्तींचें वर्णन करण्याचें; परंतु त्या साध्या वर्णनांत ते असा कांहीं
भरतात, आणि रस ओततात कीं, तो प्रसंग वा ती व्यक्ति जणूं प्रत्यक्ष
आपल्यापुढें उभी राहावी. बखरकारांच्या वर्णनाला रंग, रूप, आकार
यादि येऊन त्यांतून एक नवीन वाङ्मयीन मूर्ति निर्माण होते, ती
मुळेंच. अशा वाङ्मयीन मूर्तीचें दर्शन देणारी भाषा म्हणजेच ललित
ङ्मयाची भाषा होय. बखरकारांच्या लेखणींत अशा भाषेची किमया आहे
तें मानण्याला भरपूर आधार आहेत. विशेषतः भाऊसाहेबांच्या बखरीं-
ल युद्धाच्या तमाशाचें वर्णन वाचतांना स्फुरण होत नाहीं आणि पानिपतचा
पाहतांना गहिंवर येत नाहीं असा वाचक विरळा! मराठी गद्याला बखर-
रांनीं मोठीच श्रीमंती आणली याबद्दल वाद नाहीं. मात्र हें श्रेय साऱ्याच
खरींना आणि त्यांच्या बखरकारांना सारखेंच देतां येईल असें नाहीं; परंतु
कंदरींत बखरींतील भाषा ही साधी गद्य, नीरस, नुसतीच निर्जीव वर्णन
रणारी ललितेतर साहित्याची भाषा नाहीं; तर जिवंत, रसरशीत आणि
जोश अशा वाङ्मयमूर्तींचें दर्शन देणारी ललित वाङ्मयाची भाषा आहे.
मूर्तींच्या दर्शनानें जो आनंद होतो, तो केवळ इतिहासज्ञानाचा, नवीन
हिती मिळविल्याचा किंवा सामान्य कुतूहलपूर्तीचा आनंद नव्हे; बौद्धिक
नव्हेच नव्हे. तर ज्याला वाङ्मयानंद म्हणतात, तशाच प्रकारचा हा
नंद आहे. बखरींचा वाङ्मय म्हणून एक स्वतंत्र वाङ्मयप्रकार मानावा
सें वाटतें तें यासाठींच.

स्वराज्यकाळांत लिहिल्या गेलेल्या या बखरी म्हणजे प्राचीन मराठी
गाच्या परंपरेंतील एक महत्त्वाचा टप्पा आहे. चामुंडरायादींचे शिलालेख

इत्यादि किरकोळ गद्य लिखाण सोडलें तर ( कारण त्याच्यात अजून सारस्वताची शान यावयाची होती. ) महानुभावी गद्य ग्रंथांनीं मराठी गद्याचा पाया घातला असें मानावें लागतें. 'गोविंदप्रभुचरित्र', 'लीळाचरित्र', 'स्मृतिस्थळ' इत्यादि चरित्रग्रंथ (ज्यांचा उल्लेख चरित्रपरंपरेच्या वेळीं केला आहे) आणि 'दृष्टांतपाठ', 'सूत्रपाठ' इत्यादि तात्त्विक ग्रंथ यांचा या संदर्भांत उल्लेख केला पाहिजे. यांत चरित्र, आठवणी, दिनचर्या, तत्त्वचर्चा इत्यादि साहित्याचे अनेक प्रकार आढळतात. या यादवकालीन गद्यांत क्वचित्प्रसंगीं सारस्वताचा रसाळपणाहि भेटतो. तत्कालीन समाजस्थितीचें थोडेंफार दर्शनहि मिळूं शकतें; परंतु 'माझिया सामान्य परिवारू' साठीं म्हणून मुद्दाम 'मऱ्हाठीं' तून लिहिलेलें हें अगदीं प्रथमचें लोकसाहित्य केवळ पंथीयांनीं आपल्या पंथीयांसाठींच लिहिलेलें असल्यामुळें एकंदर उभ्या महाराष्ट्राचें व मराठी मनांचें प्रतिबिंब त्यांत उमटणें शक्य नव्हतें. त्यांत पुनः तें गुप्त लिपीच्या बासनांत ठेवल्यामुळें तत्कालीन वा तदनंतरच्या साहित्यावर सातत्याच्या दृष्टीनें परिणाम करूं शकलें नाहीं. त्यांत यादवांची राजवट मोडली नि इस्लामचा पाय रोवला गेला. मराठी गद्याचा विस्तार अधिकच रोडावला. 'महिकावतीच्या बखरी'चीं वेळोवेळीं लिहिलेलीं गद्यपद्य प्रकरणें आणि 'राक्षसतागडी'ची लढाई हीं दोन बखरस्वरूपाचीं प्रकरणें सोडलीं तर 'पंचतंत्रा'च्या कथा, पाद्री इस्तेवांचें 'ब्राह्मण मरास्ट्री' भाषेंत लिहिलेली बोटभर प्रस्तावना आणि एकनाथांची 'अर्जदास्त', 'कौलपत्र' यांसारखीं प्रकरणें, एवढेंच या काळचें उपलब्ध गद्य; परंतु शिवशाहीला आरंभ होतांच एकदम काळ पालटला. मराठी घोडा साऱ्या महाराष्ट्रभर नाचूं लागला. कृष्णाजी अनंत सभासदानें आपल्या सरळ, बिनपाल्हाळिक भाषेंत शिवचरित्र लिहिलें आणि ओजस्वी गद्याच्या बखरींना बहर आला. उत्तर पेशवाईत, विशेषतः पानिपतानें किती तरी बखरींना जन्म दिला. रघुनाथ यादव, कृष्णाजी शामराव, मल्हार रामराव वगैरे कित्येक बखरकारानीं आपल्या लेखणीचे विलास दाखविले ते याच काळांत. हा गद्य सारस्वताचा विलास अव्वल इंग्रजी सुरू झाल्यानंतरहि कांहीं दिवस टिकला. मल्हारराव रामरावानें किंवा कृष्णाजीपंत सोहनीनें आपल्या बखरी पेशवाईच्या अस्तसमयास सजविल्या, तर हरिवंशाची बखर त्यानंतरहि बऱ्याच वर्षांनीं म्हणजे

इंग्रज स्थिर झाल्यानंतर लिहिली गेली; परंतु असा एखाद-दुसरा अपवाद सोडला तर स्वराज्याच्या अस्ताबरोबरच बखरींचा विलासहि मावळला.

प्राचीन मराठी गद्याच्या परंपरेंतील एक महत्त्वाचा कालखंड येथें संपला; परंतु या कालखंडांत बखरींच्या बरोबरीनें आणखीहि एक गद्याची शाखा फोंफावली, तिचा येथें उल्लेख केला पाहिजे. ही शाखा म्हणजे तत्कालीन पत्रांची–पत्रात्मक गद्याची. यांत खाशा स्वाऱ्यांपासून तो त्यांच्या घरच्या-दारच्या जासुदांपर्यंत अनेक छोट्या-मोठ्या लोकांनीं लिहिलेलीं अक्षरशः असंख्य पत्रें सांपडतात. हीं पत्रें म्हणजे त्या त्या व्यक्तींचीं जणूं मानस-चित्रेंच होत. अत्यंत व्यावहारिक उद्देशानें जरी तीं लिहिलेलीं असलीं तरी त्यांतून पत्रलेखकाचें मन प्रतिबिंबित झाल्याशिवाय राहात नाहीं. अर्थात् हें सर्वच पत्रांना लागू पडणार नाहीं; पण त्यांतील बऱ्याच पत्रांत भावनांचे रंग आहेत, वर्णनाची रेखीवता आहे आणि वाङ्मयाचें मोल पण आहे. सारांश, स्वराज्यांतील गद्य सारस्वतांत बखरींच्याप्रमाणें या पत्रशाखेनेंहि फार मोलाची भर घातली आहे.

असो. मराठी गद्याची प्राचीन परंपरा येथें संपली; परंतु त्या परंपरेंत बखरींना असणारें महत्त्व स्पष्ट व्हावें, गद्य सारस्वताचा एक नमुना म्हणून त्यांच्याकडे पाहिलें जावें, एतदर्थ प्रस्तावनेचा हा प्रपंच केला. बखरींतील मराठीची भाषिक पाहणी होणेंहि अगत्याचें आहे. शब्द, त्यांचे प्रत्यय आणि वाक्यरचना यांची भाषाशास्त्रीय प्रक्रिया तपासल्यास मराठीच्या ऐतिहासिक व्याकरणालाहि तिचा उपयोग होईल. परंतु प्रस्तुत 'मराठी बखर गद्य' या पुस्तकांत बखरींतील कांहीं उतारे संग्रहित करण्यामागचा हेतु मात्र त्यांचें सारस्वतस्वरूप स्पष्ट व्हावें असा आहे. त्या दृष्टीनें त्यांचें वाचन व्हावें आणि तद्वारां मूळ बखरींचें सौंदर्य पाहण्याची स्फूर्ति व्हावी अशी येथें इच्छा व्यक्त करतों.

प्रस्तुत पुस्तक तयार करतांना श्री. कामत यांनीं केलेल्या मदतीचा येथें साभार उल्लेख केला पाहिजे.

**—गं. ब. ग्रामोपाध्ये**

---

# मराठी बखर गद्य

## क्रमांक १ : : माहिकावतीची बखर

### १. केशवदेव येशवंत जाला

राजा बिंब प्रमादला ।। राजाची राणी कामाई ।। पुत्र वरुषा ५ नावं केशवदेव ।। या उपरांत कामाईचा अभिळाष प्रधानें करों आदरिला ।। तेधवां कामाई आपले मनि खोंचली ।। जर यासि कैसें करावें ।। तेधवां माहिमाचा आपला अधिकारि बोलाविला ।। त्यासि वृत्तांत सांगितला ।। जरि प्रधान दुष्टबुद्धी त्यास कैसा येत्न करावा ।। हरद पुरो अधिकारि बोलिला ।। जर तुं आमाचि माता ।। तुज पाहे ऐसा कोण आहे ।। मग दिघिपाळिचे राउतासिं स्वज्ञा केलि देश मिळविला ।। वाडिया दाहा मध्यें परिवारु मेळावा मिळाला ।। खुशालि केलि ।। कुसुंबा भांग प्याले ।। सूर्य अस्त होतां च माहाल प्रधानाचा वेढिला ।। तेथें युद्ध जालें ।। पाहाल्या पाहाल्या प्रधान मारिला ।। सीर घेवोन कामाई जवळ गेले ।। राणि खुस्याल जाली ।। हरद पुरो आधिकारि आळंगिला देसला नावाजिला ।। मग देसायाला वृति दिधल्या ।। दीर्घिपाळिचे राउताला वृत्ति वाडिया दाहा बकसिस ।। प्रथम मान टिळा विडा अधिकारि यांस ।। सर्वैपणाचि प्रौढि तयाला ।। मग अधिकारियान देसायाला हंकारा केला ।। मरोळकर मालाडकरांला येकसरकर पोईसरकर उत्तनकर सिंधे ईत्यादिक सर्व देसाय मेळविले ।। आणि पळसवलिकर ब्राम्हण राजगुरु पाहाडकर वनेवाळकर समस्त ब्राम्हण बोलावोन ।। केशवदेवासि अभिषेक केला ।। राजासेंके गळा घातले ।। मग केशवदेवें कामाईस मिळोन देसायांला वाणे दिधलीं ।। मग केशवदेवें ठाण्यासिं राज्य केले वरुषें १२ ।। तेधवा धारेसिं भोज या जवळ गेला ।। राया केशवदेवाची पदें वाखाणिली ।। पिता मोहो यैसि गद्यपद्य म्हणता जाला ।। तेधवा राजा भोज कोपला ।। कालिचें पोर ऐसा अभिमान धरिला ।। दळवै बोलाविला ।। आज्ञा दिधली जर सेना सिद्ध करावी ।। हला ठाणे कोकाणि म्हणोन ।। दळ सिद्ध जालें ।। मुहिम केली ।। थेट कळव्यास

आले ॥ परदळ देखतां हाहाकार जाला ॥ येक केशवदेवा प्रति सांगो आले ॥ जर कटक भोजरायाचे आलें ॥ देसायांला हंकारा केला ॥ देसाय देसाय देस मिळाला ॥ सिंध्याचा जमाव थोर जाला ॥ नगाऱ्या घाव घातला ॥ करणे बांके सिंगे डफ काहाळा विराणी वाजली ॥ पाईकापाईक जालि ॥ कळऱ्या युद्ध थोर जालें ॥ तेधवां देवनरेचे विनायक म्हातारे याणे राया भोजाचें छत्रिची खिळ विंधोन छात्रि पाडिली ॥ दुसरे बाणे सीरिचा गंगाळटोप पाडिला ॥ युद्ध थोर जालें ॥ राजा भोज अपेसि जाला ॥ या नंतर भैसेदुर्गाचा राव त्या भोजासवें आला होता ॥ तो हि युद्धी मिसळला ॥ त्या वर येकसरकर पाईक उठावला ॥ तो सिंध्याहि वारिला ॥ मज असतां बापुडें म्हातारें युद्धी दबाजा करिताती म्हणोन संभाजी पाटेल शेषवंशि उठावले ॥ युध्या लागि प्रवर्तले महामारि पेटले ॥ दळ भोजाचें भंगिलें ॥ आणि भैस्यदुर्गाचा राव जीवंत धरिला ॥ मग आपले दळ आलें ॥ केशवदेवासिं भेटलें ॥ बंद हवाले केला ॥ या रिती केशवदेव येशवंत जाला ॥ भोजराजा शरण आला ॥ मग केशवदेवें तयासि बहुत मान केला ॥ पांच लुगाडि सीरपाव दिला ॥ तैसें चि आनंदरावासि पैराविलें ॥ तत्समइं भोजरायें भोगाईत ठाण्यासि रचिलें ॥ या उपरांत केशवदेवें सिमल म्हातऱ्यासिं वाहाते यंत्र आळा दिधला ॥ येकसारची पाखाडि बोखळि तेथिचा पाईक ॥ त्यासी विरगांठ दिधली ॥ आणि वृत्त पोमदे राउताला बकसिस ॥ आणि सिंध्यासिं अफदागीर दिधलें ॥ रायें केशवदेवाही ॥ सर्व आपुलें दळ पैराविलें ॥ मग राजा ठाण्या होऊन केझमरिस गेला ॥ ठिकाण कान्हेरिस केसें ॥ राजा कान्हेरि राहिला ॥ राजा भोज आज्ञा मागोन धारोसि गेला ॥ या नंतर येक दिवासिं भोजराजे आंबे केशवदेवासिं धाडिले होते ते मार्गी देवगिरिचे राया जश्वद्यान घेतले ॥ वेठे रिते दवडिले ॥ ते येवोन राया केशवदेवासि भेटले ॥ वृतांत सांगते जाले ॥ आंब्याचा वृतांत ऐकोन केशवदेव कोपला ॥ प्रधान बोलाविला जर यासि येत्न हा चि भाट पाठवावा ॥ ततक्षणि रवाना केला ॥ जर कोंनिमित्य आमची भेट लुटावी ॥ भले हो चोरि करावी ॥ बेईजाति लोक तुम्ही ॥ ऐसे जावोन भाट बोलिला ॥ आईकोन जस्वद्या कोपला ॥ त्याणे भाट परता केला ॥ जर माझ्या दुर्गास येवोन नाथ फोडावी ॥ या वचना भाट परता जाला ॥ येवोन केशवदेवांसिं भेटला ॥ वृतांत सांगितला ॥ आईकोन केशवदेव

कोपला ॥ देसाला हंकारा केला ॥ आला देस सर्व मेळविला ॥ सर्व जमा जाला ॥ नगाऱ्या घाव घातला ॥ निशाणे उभारिली ॥ सिंधे शेषवंशि आपले निशाणे आले ॥ सूर्यवंशि आपले निशाणे आले ॥ सोमवंशि आपले निशाणे सन्निध जाले ॥ नाईकराव आपले परिवारे साह्ये जाले ॥ दळ हंकारले ॥ भैस्यादुर्गा वरि चालिले ॥ वेढा घातला ॥ चौऱ्यासि दुर्गे पालटिली ॥ किल्ला अवगड हाति येत नाहिं ॥ म्हणोन डेरा दुर्गा खालिं घातला ॥ राज्याचा निश्चये ऐसा जर गड घ्यावा ॥ वरषे भरली १२ ॥ चिंचवाणि खादले ॥ त्या चिंचोऱ्याचे वृक्ष जाले ॥ त्याच्या चिंचा खादल्या ॥ ईतके दिवस राहिले ॥ परि गड हातिं येत नाहिं ॥ या नंतर आंधेरिचा म्हातारा त्याचि वृत देसल्यान काढिली ॥ म्हणोन ता पळोन त्या गडा वरि पाईक राहिला होता ॥ त्याणे राजयास पालती दिधली ॥ नाथ पडे ऐसें उपक्रमे केले ॥ घरचा भेदु म्हणोन पालत जाली ॥ द्वादश वरुषा उपरांत पाईका पाईक जालि ॥ भैस्यागड घेतला ॥ राजा जश्वंद्या जिवंत सांपटला ॥ शरणांगत म्हणोन रक्षिला ॥ आपले ताबि मध्यें ठेविला ॥ आणि त्या आंधेरिचे गोजबासि म्हातारा पद दिधलें ॥ वृति तीन बकासिस केल्या ॥ कापासे ॥ सिवार ॥ डोंगरी ॥ ऐशा वृति दिधालिया ॥ मग सर्व मिळोन नवसारिस आले ॥ तेथ राजा मदमस्त गोदराव त्यासिं युद्ध थोर जालें ॥ त्यासि ही हारविलें ॥ नवसारि घेतली ॥ तेथे आपले सेनेला नावाजिलें ॥ वाणे थोर थोर वांटिलीं ॥ सिंधे शेषवंशि यांसि तुरे मोत्याचे दिधले ॥ सिर पाव बहुत वांटिले ॥ आणि माहिमकर विनाजि म्हातारा ॥ त्यास हि वाण दीधलें ॥ थोर नावाजिलें ॥ देवनरकर गोपाळाजि म्हातारा तो हि नावाजिला ॥ तेथे चि पोईसकर त्यासि काहाळा दोन श्रृति ॥ साहारकर बळकट म्हणोन पटे दिधले ॥ उत्तनकराला मोहोरिसिंग ॥ गोहारिकराला विरगांठ आणि सर्वेपणाचि प्रौढि ॥ येक-सारकरांला ॥ मोहोरिसिंग तयाला ॥ येसांवकराला नावाजिलें ॥ येरगणकर बावनवीर यैसे सर्व आपले परिवारेसिं ठाणयांसि आले ॥ देसाला आज्ञा दिधली ॥ सर्व आपले घरोघर गेले ॥ [ पृ. ३८–पृ. ४१ ]

२. माहाराष्ट्रधर्मरक्षिका ॥ तुम्हां सुप्रसंन्न असो ॥

नायकोराव देसला मालाडचा ॥ त्याणे मज केशवाचार्यास नेऊन सर्व आतवांर्गीक व देसक व मांडळिक यावत् केळवें पासुन मुंबैई परियंत मुख्य-

मुख्य गावोंगाविचे जातिजातिचे गोत्रिगोत्राचे खलक जमा तीन हजार सातें पंचावन्न गणति येकवीस दिवस परियंत माल्हजापुरि योगेश्वरि स्थानकि मंडप रचोन जमाईत तेथे महाप्रेत्न मनुष्य पाठवोन बोलावणि करोन समुदाये ब्राह्मण खलक संख्या पांचसें येकवीस नायक देसाये प्रोहित कुळगुरु आचारे उपाध्ये जोशि वृतिवंत देशस्त या उपर गोवर्धन गंधर्विक ते हि सर्व मेळविले ॥ नायको–रावें फार सन्मान करून सर्वांस यथामहत्वें फार आतिथ्य करोन सर्वांस सुखि केलें ॥ समुहुर्ति दीवस ठराव केला होता त्या दिवसि हा प्रयोग वंशावळिचा केला ॥ जर मुख्य वडिलांच्या किर्ती ॥ हा देश यावत् दवण पासोन श्रीमुंबै परियंत काबिज करायास राजा प्रतापबिंब दाहा सहश्र घोड्याचि फौज घेवोन अहिनळवाड्या होउन येउन हा देश काबिज करून राज्यधाम श्रेष्ट माहिम देश घेतल्या वर जागोजागी आपले स्वसमागामिक सेनायिक बैसविले ॥ जाहागिरा वतने वृती ईनाम सर्वांस यथामहत्वें दिधल्या ॥ त्या आज पावेतों चालतात व पुढें ईश्वर आपलें वंशिकासिं चालविल ॥ परंतु येक मनि भाव जाला ॥ जर येक दिवस अवघ्यां देशाईक या देशि समुदाई मिळवोन नवसभोजन देईन ॥ हे ईच्छा मनी उत्पन्न होतां श्रीकुळस्वामिणीन स्वप्न दिधलें जर मनिचा हेत मी पुरवितो ॥ तुं सर्व जे पुर्वि आले व या साशष्टि पासोन दुसरे केळवे परियंत फांकले आहेत त्यांचा समुदाये करुन येक वंशपत्र करणे ॥ हें स्वप्न मज केशवाचार्या मुखि आपण नायकोरावें साष्टांग सभेस घालोन सांगावेला ॥ हे सर्व विप्र व देशिक देखोन व आई-कोन जयजयकार उदो बोलिले ॥ समस्त उभे राहिले ॥ विप्रवर्गि लक्ष्मीसुक्तीं दुर्गा योगेश्वरि भगवति स्तउन नायकोराव देसला देशकि आळंगुन विप्रि आशिर्वाद दिधला ॥ जर तुं भला सोमवंशि धर्मवंत उदार प्रौढिप्रतापसागर, जर तुज देवि प्रसन्न जालि, हें कर्म वंशिक पध्यतिचें, तु जवळ होउन सर्व समुदाय मेळउन, जुने खते आज पावे तवं हिसाब पाहातां बिंब प्रारंभा पासुन वरुषें तीनसे जालिं ॥ या मध्यें हे राज्यकुळ खलक सैनिक ईनामक सर्व रईत अजम सेक आलावदिनाचि जालि ॥ या उपर देसा मध्यें ते हि बहुत यवन जाले ॥ राज्य अभिमान सांडला ॥ शस्त्रें सोडली ॥ कृषि धरिली ॥ सोमवंशिं कारकोणि गांवखोति ताडमदिरेस उदिम धरिला ॥ सिंधि काहिक असाति धरोन आपालि वतने ॥ काहिक सेवा करुं लागले ॥

काहिक नष्टले ॥ बहुत आचारहिन जाले ॥ बहुत गोत्र प्रवर कुळस्वामिण कुळगुरु ठिकाणे सांगतां विसरु लागले ॥ जाणोन देविने धर्म माहाराष्ट्र रक्षाया कारणे राजश्री नायकोरायास स्वप्न दिल्हें ॥ जर हा जाति मेळवा करावा ॥ आम्हास ब्राह्मणास भूदेव प्रसिद्ध जाणोन ही मेळवावें ॥ तर हा आशिर्वाद आमचा ॥ श्रीदेवि आद्यशक्ति जगदंबिका ॥ माहाराष्ट्रधर्म-रक्षिका ॥ तुम्हां सुप्रसंन्न असो ॥ श्रीरस्तु ॥ हा आशिर्वाद आयिकोन व केशवाचार्याचें वचन ॥ स्वधर्म रक्षणार्थ श्रीदेविचें स्वप्न ॥ तीन हजार सातें छपन्न सर्व जे राजकुळि सैनिक मिळाले होते त्याहि फार ब्राह्मणासि पहिरावण्या दक्षणा दिधली ॥ ते येकयकांचि नावें सांगतां ग्रंथ वाढेल ॥ परंतु अवघि द्रव्यसंख्या च्याळिस हजार दाहा बोळी धर्म जाला ॥ शतचंडि नायकोरावें करायास संकल्प केला व प्रणाम्य करून सर्वांप्रति विनाविलें जर कृपा करुन माझें मानसिक पुरें होये हें करा ॥ तो सर्वांसी मानला ॥ नाईकोरावे आपले मझरे लीहिला ॥ हे सहि ॥ छ ॥ मझर लेख हस्ताक्षर ॥ केशवाचार्य दप्तर-कलमि चतुर ॥ या हस्तीचे पट लेहविले ॥ यक बाबत श्रीमहिबिंबसूत प्रतिबिंबसंमत्तें पूर्वीचि राजसिकेचिं अष्टप्रधानसंमतें श्रीकुळगुरुचें हस्तलेख त्या तालुका प्रमाणे राजपूर्वि वर्णण तैसे च रिती व नुतन अनुसंधान सर्व वरिष्ट वर्गिक अनुमत्त प्रोहितार्चे संमत ॥ ते समई हे वंशपद्धतिलेखा संमत देउन वेदमूर्ति विप्रकुळिं ब्राह्मणसंख्या पांचसें येकवीस मुख्य मुख्य धौंडि नायक व तथा आंब नायेक याहि समस्त विप्रमेळा यांसि स्वमुखें म्हणितलें ॥ जे तुम्ही सर्व वृतिवंत वृति चालविता अष्टाधिकार तुम्हास आहेत ॥ तर नुतन–राज्ये–समागामिचे विप्र ॥ व पुरातन यादेशिचे स्थळ–गुरु यजुर्वेदि गोवर्धन व गंधर्विक ॥ तर यांस सत्ता ॥ स्थळीं घटिका पाटा अंत्रपट गौदानमोक्ष पुजनमात्र कर्मकर्मादिक याहि संपादावि ॥ यांस हे सत्ता स्थळगुरुत्वाचि ॥ हे कोणाच्यान अमान्य करवत नाहिं ॥ व जे अमान्य करितील व वृतिलोप करितील तरी कर्ता व करविता उभये येगपुरिस जातिल ॥ जे ज्या स्थळिचे स्थळगुरु त्यांस त्या स्थळि लोक वसति त्यांहि त्याचे हास्तें कर्मे संपादावीं ॥ निर्विकल्प तर तीं कर्मे उत्तम सांग होति ॥ नाही तर अकर्मदोष पदरिं पडे ॥ कां जे समई शंकराचार्य उत्पन्न जाले श्रीजगद्गुरु धर्म माराष्ट्राचे षोडशकर्माधिकारी ॥ महादेवाचा अवतार ॥

कलयुगांत प्रकटला ।। कारण जंन्मेजय–राज्य प्रमादलें ।। विक्रमशकाधिकारि–समयिं यवनिधर्म मुळ पश्चमि रमिदेशि उत्पन्न जाला नुतन ।। अक्षरें भाषा पैराब सर्वभक्षक हा शोध राज्या विक्रमास वेताळें सांगितला ।। हें आईकोन सभा–मजकुर येक ट्ढाव केला ।। जर यां वर चाल करुन नीःपातावें ।। हा निश्चये संपुर्ण करुन सैनिक नायक यांस राज आज्ञेन सैन्य मुस्तेद करउन मुहुर्त उत्तम जोतिषी गुरुदिनि चाल करावी हा निश्चये केला ।। यैसें असतां राजा निजधामी सुखशयनि नीद्रिस्त असतां स्वप्न जालें ।। जर तुज तया म्लेंछासि जैत नाहिं ।। व तुम्ही ईछा धारिलि असे तर आवंत शकाधिकारि याचा येईल तो तुज जिंतिल ।। हें स्वप्न होतां राजा जाग्रत जाल्या वर चिंतातुर फार जाला ।। जर हें स्वप्न काये विपरित ।। शीव शीव नामस्मराणि जाग्रत राहिला ।। पुरोहितास बोलाउं पाठविलें ।। सेवकिं पुरोहितास निरोप दिधला ।। जर राजाज्ञा तुम्हास बोलाविलें असे ।। हें श्रुत होतां स्नान देव-पूजा संपादुन नित्यकर्मीहि सत्वर पुरोहित राजालयिं आला ।। राजयानं देखतां साष्टांग प्रणिपात करोन आसनि बैसविला ।। अर्घ्य पाद्यपूजा संपादुन संनिध जाला ।। ते समईं प्रोहितें आसनि राजयास बैस म्हणितलें ।। आशिर्वचन सुक्त उच्चारोन आशिर्वाद दिधला ।। पानपट्या विडे पुरोहितास दिधले ।। ते समईं पुरोहितें पुसिलें जर किंनीमित्य राउळिं सत्वर बोलाविलें ।। हें वचनि राजयान पूर्ववर्तमानकथा व रात्रिस्वप्न तें मुखवचानि साकल्य पुरोहिता प्रति सांगितलें ।। हें पुरोहित आईकोन मनी आणोन ज्ञानि पाहोन भविष्य वोळखोन राजेंद्रा प्रति म्हणितलें ।। जर शास्त्रसंमाति कलयुगिं सा शकाधिकारि भविष्योतरपुराणिचे ऋषिवाक्य आहे ।। यास अन्यथा कोण करिल ।। तर तुम्हा मागें शकाधिकारि शाळिवाहन जाणुन मज दिसोन येतें ।। जर निर्माण जाला तर शोधिस वेताळास आज्ञा दिजे ।। हा शब्द आईकतां च चित्ती राजयान वेताळ स्मरतां च वेताळा प्रगट जाला ।। राउळिं प्रणिपत्य करोन बध्वांजुळि काये आज्ञा ।। हे विनंति राये आईकोन वेताळास आज्ञा दीधलि कीं ।। पृथ्वी शोध करावा ।। कोठे शाळिवाहन उत्पन ।। हेर घेऊन येणे ।। आज्ञेप्रमाणें तो हेरिस गेला ।। मागें म्लेंछा वर स्वारिचें पुरोहितें सांगितलें ।। जर ते पश्चमदिसे बहुत राजे आहेत ।। तेथे फार तयांचि युद्धें परस्परि होतिल ।। सांप्रत या देशिं न येतिल ।। सर्वास निर्वाह इश्वरि इछा ।। ऐसें म्हणत आहेत

तवं वेताळ हेर पैठणा होउन आणिली ।। शाळिवाहन सेने सहित मुस्तेद तुम्हा वर चाल केलि ।। हें आईकोन दळ मुस्तेद केलें होतें तें ।। स्वारि ईकडे जाली ।। दोघांचा आदळ जाला ।। श्रीविक्रमादित्य शाळिवाहन हस्तें मृत्य पावला ।। कांहि मध्यें काळक्रमल्या उपर देविशापें शाळिवाहन अश्वारुढ समुद्रि प्रवेशले ।। छत्रपतिपद वरुणावति राज्याधिकारि जैदेवराणा यास पद असे ।। देशोदेशिं राजे आपले राज्य धरोन आहेत ।। यैसें असतां मध्यें लोहोळें श्रावक जती नानकपंथ साबरिपंथ रुमिपंथ तुरकी महमदी ईभ्रमी ईसाइ सिस्नछेदक केशछेदक सर्वभक्ष तांत्रिक पध्यत ऐसि मेदिनि याहि वरुषेंशता १२ मध्यें व्याप केला ।। फार अनाचार प्रवर्तला ।। विप्रांस देवांस विरोधी ।। बहुत जन भ्रष्टविले ।। ऐसें असतां श्रीमहादेव धर्मरक्षणिक रंडाकोल्हापुरी अवतार घेतला ।। वादि लोहोके श्रावके जती जिंतिले ।। अकार्मि त्यास जिंतिलें ।। पण केला होता जर जो हारेल तयास तैलाचे कढयेत टाकावें ।। सोम आपा राजयाचे मदसित घटांत सर्प कोण्हा न कळतां घालुन आछादिला होता ।। राजा लोहोक्या याहि वस्य केला होता ।। येक राणि द्वीजा कडे व काहि प्रजा ।। सेवट वृति द्विजांचि बुडावी ।। ऐसा पण जाला ।। राज्यान म्हणितलें जर जो तुम्हा उभयां मधुन या घटा मध्ये जे वस्तु आहे ते प्रसिद्ध नावं सांगेल व काढुन या प्रजेस दाखविल तो वृतिचा अधिकारी ।। व त्याचें रुप ईश्वरि ।। तो आम्हास मान्य ।। हें राजवचन सर्वांस मानलें ।। वेत्रकरिं विप्रांसिं व लोहिकीयांसि सांगितले ।। तर लोहिकीं विप्रांस म्हणितलें जर तुम्ही भूदेव वृतिवंत पुरातन विद्येची सत्ता अभिमान वेदशास्त्रपरायण तर हें वृंद आज पावे तवं सांगता त्याचि प्रचित आज खरि करा ।। हें वचन आईकोन जोतिषी विध लग्न पाहातां अंधयोग जाणुन फार चिंता वर्तालि ।। आपले मंडळिकी विचार करुन दाहा दिवसाचे अवधिन सांगु हा जाब दिधला ।। तो रायास व सर्वांस मानला ।। विप्रास आज्ञा केली ।। येर समस्त येक नेमे देविद्वारि येउन उपोषाणि बैसले ।। तेथे सदा उपोषणे होतां शंकराचार्य अवतार उत्पन जाला ।। त्याणे सर्व विप्रवर्गास अस्वासन दिधलें ।। दाहावे दिवसी आपण समागमे सर्व ब्राह्मणसमुदायिं वेदध्वनि करित राजसभा प्रवेशले ।। राजे आद्येकरुन समस्ती प्रणाम्य करोन बैसकार विप्रास दीधला ।। विप्रि वेदघोष सूक्त आशिर्वचनि संपादिला ।। घट शंकराचार्यें नेत्रि अवलोकिला । वेत्रधारिं पुन्हा मजकुर केला ।। ते समइं

शंकराचार्य म्हणितलें जर लोकि प्रथम या सभेंत जे घटात आहे त्याचें प्रगट उच्चार करावा ॥ जर तयाचें वचन प्रचित येईल तर आज पासुन वृति तयांस व आम्हास तैलकढय अवलोकणे ॥ जर त्याचे शब्दा मागें आम्हि मुर्खी म्हणु तें च घटांतुन दाखउं तर सत्य भूदेव स्थाईत अनादिसीद्ध ब्राह्मणवृतिचे स्वामी राजयाचे व प्रजेचे श्रीगुरु ॥ हें खरें च साक्षेस येतां लोहिक यांस जे त्या कढय मध्ये प्रवेश करवावा ॥ हा शब्द सर्वांस मानला व राजयाचे चित्तास आला ॥ लोहोक्यांहीं मानिला ॥ ते समई सर्प आहे घटा मध्यें हे लोहिकि यांचे गुरुन बोलिलें ॥ तें राजयाचे चित्ती आलें ॥ व राजयान राणिस अवलोकिलें ॥ उभयता समजलीं ॥ राजयान श्रीशंकराचार्यजि यां प्राति म्हणितलें जर आतां तुम्ही सांगा ॥ कीं सांगितला शब्द खरा करा ॥ तर वृतिचे स्वामी ॥ हें आयकोन श्रीशंकराचार्य हिरण्यशुक्त म्हणोन अक्षता घटा वर टाकिल्या न आपले मुखवचानि श्रावकगुरुस पुसिलें जर या घटांत काय असे ॥ तरी तो म्हणे सर्फ फणिधर कृष्ण असे ॥ हें आईकोन राजयास व राणिये प्रति व समस्त प्रजे प्राति म्हणितलें जर लोहोकें असत्य म्हणितलें ॥ घटामध्यें नवरत्नाचा हार असे ॥ हें आईकोन राजाराणी विस्मित जालीं ॥ ते समई श्रीशंकराचार्यी म्हणितलें जर भूदेव वचन खरें घट सोडुन पाहावें ॥ राजयान आज्ञाशब्द म्हणितला जर तुम्ही घट सोडावा ॥ सत्वर सोडिला ॥ मधुन नवरत्नखचित हार काढिला ॥ सर्व जानि देखतां जयजयकार जाला ॥ राजा-राणि फार संतोषली ॥ येवोन चरणि लागलीं ॥ शंकराचार्यें अस्त्रासिलीं ॥ सत्वर राजसत्तेन सेवकांस आज्ञा केली ॥ जतीः लोहकेंः श्रावकधार्मिक गुरु-समुदायः तैल कढयेत घालविले ॥ ऐसे दंडस्थानि केले ॥ बहुत राजे शंकराचार्य श्रुद्ध केले ॥ स्वधार्मि रक्षिलें ॥ ब्राह्मण वृति स्थापिल्या ॥ वर्णावर्ण भेदाभेद निराळेनीराळे अनुमत्तें ॥ वेदिककर्म विप्रासि ॥ पौराणिकमंत्र व्याशोक्त क्षेत्रियांसी ॥ तांत्रिक पध्यत शुद्रादि करोन ईतर ज्ञाति अष्टादशपर ॥ लोमक प्रलोमक क्षतार यांस ब्राह्मणवचनि कर्म तें मान्य ॥ ते शब्दीं देविरुप तयास मानावें ॥ ब्राह्मणहस्तें पूजा ॥ पार्थिव विष्णु शिव सूर्य गणपाति अंबाघट यंत्र ब्राह्मणहस्तें पूजाविध करावी ॥ पूजा आराध्यदैवताचि संपुर्ण मंत्र–पुष्पांजुळी संपादुन ब्राह्मणपुजन करावें ॥ आमान्यदक्षणा दानसंकल्प सोडुन ॥ विप्रचरणअंगुष्टोदकतीर्थ घेउन ग्रहस्तें अभिवंदन करावें ॥ सर्वग्रहि संप्रदा ॥ त्रित्रीआच्मानि सर्व शुद्ध होती ॥ येक

मासाचें प्रायश्चित टळे विप्रोदकी ॥ सामासाचें प्रायश्चित जाये स्थळगुरु-चरणोदकीं ॥ संवत्सराचें प्रायेश्चित जाये कुळगुरुचरणोदकें ॥ तीर्थगुरुचि तीर्थी महिमा ॥ स्थळगुरुचि स्थळी महिमा ॥ कुळगुरुचि सर्वत्र महिमा ॥ जाणुन कुळगुरुस न विसरावें ॥ तयास बहुत मान्य असे ॥ हे कथा धौंडि-नायक सांडोरे व तथा आंबनायक कावळे याहि मुखवचानि नायकोराव देशाय आद्य करोन गृहस्त–समुदाय विप्रसमुदाईकास श्रृत केलि ॥ हे आईकोन नायकोराय आद्य करून श्रीकुळगुरु शोमसूर्यवंशाचे व शेषवंशाचे यासी म्हणितलें ॥ जर बरवि कथा श्रुत आम्हास केलि ॥ तर सेवट आमची यें गोपविर्ते छेदिलीं ॥ तांडल्या करितां व उभयवंशि वैर वाढुन परस्परें युद्ध, करून कुळक्षय केला ॥ प्रतापश्या मुक्तेश्वरिं स्नानास जातां आंधेरिस देशक मिळोन मारिला ॥ आमचे जातिचीं यज्ञोपविर्ते छेदिलीं म्हणोन ॥ व पोश-नायक स्वामिचे वंशिकाचे चांपानेरी जाउन सुलतान दिनास सांगुन जर कावळयाचा वंश शमला ॥ आम्ही भाचे त्याचे ॥ त्यासि वृत ईनाम आम्हास पावे ॥ या रितीन पत्रे घेउन आले ॥ सरदेसाई–पदमदें मस्त होउन दुःकर्में केलिं ॥ तीं तुम्हास ठाउकि ॥ जाणुन देसक मेळउन त्यास मारिलें ॥ त्याच्या स्त्रिया हि पाहाडिन गृहास अग्न लाउन त्यामध्ये निमाल्या ॥ येक यका बंधुचि स्त्रिस गर्भ ॥ आगासिकर गौतम–गोल याचि कन्या ते माहिमास नळदव याचे गृहि राहिली ॥ तेथे ते प्रसूत जाली ॥ तयाचा विप्रवंश हेमटे तेथे असेत ॥ यैसि ब्राह्मणहत्या व ब्रह्मस्त्रिहत्या व राजहत्या या आमचे शिरीं जाल्या ॥ व पुरो पैकिं राणे पैकि दरणे पैकि प्रभु पैकि सूर्यवंशियांचिं यज्ञोपवितें गेलिं होति तर तुम्ही तयांस मंत्र–उपदेश केला व आम्हास नाहिं ॥ तर याचा निर्वाह करा ॥ सर्व ब्राह्मणमंडळिक असा ॥ ऋषिवर्य ॥ या उपर समस्त कुळादिक ग्रहस्तजात आहेत ॥ तर हा आमचा मजकुर नीट करुन दिजे ॥ हें वचन धौंडिनायकें व आंबनायकें नायकोरायाचें आयकोन प्रतिवचन केलें ॥ जर पुरातन कर्में स्थापायास बहुत द्रव्य पाहिजे ॥ जातशुद्धतेस ॥ कां जर शास्त्र-मार्ग ॥ द्वादशवरुषें क्रमलीं ॥ येक प्रायश्चित्तास ॥ म्हणजे तो निराळा मंडळिक जाला ॥ तर येथे दो हा शता वरुषाचि गणणा जाली ॥ तर सत्य मेव आयिकाल तर शैयाद्रिखंडिचे संमतें शास्त्राचे आधारें श्रीशंकराचार्य जगद्‌गुरुहि जैं कर्म स्थापिलें असे, यावत् श्वेतबंधरामेश्वरा पासन यावत काशि

व द्वारका श्रीतुळजापुर परियंत, मध्यें देश पुण्यक्षेत्र, देवांचि दशावतारिक जागा, माहाराष्ट्रधर्माचें स्थान ।। कोटि तीर्थाचें महिमान ।। येथें हा धर्म ।। कल्की नारायण अवतार धरिला ।। तेथ परियंत राहेल ।। दुसरे देश केवळ म्लेंछमये होती ।। ब्राह्मण पंचायतनाचे नावं विसरती ।। येउन याहि देशि मीसळती ।। व या धर्माचा द्वेष करितील ।। कित्येक आपले त्याच प्रमाणे होतिल ।। या स्तवं धर्म सुगम शास्त्रधारिकांस स्थापिला तो सर्वी आईका चित्त देउन ।। पश्चम-देशीं गुजरात प्रांति खंबैत परियंत उत्तर हेंदुस्थान राठवड देश घेतला ।। या रितिन ते राजे सूर्यसोमवंशि ब्रह्मक्षेत्रि ।। परब्रह्म उत्पन तयाचे वंशि ।। जाणुन ब्रह्मक्षेत्रि म्हणिजे तयांचा नेम ।। कुकुट शब्दापासोन उठावें ।। शौच्य स्नान संपादावें ।। देवपुजन नित्यकर्म आचार्य-संयुक्त-पंच ब्राह्मण-संयुक्त भोजन-नैवेद्य ब्राह्मण-उचिष्ट ।। धर्म-निति-शास्त्र-अनुमत्तें पंडितमुखीं न्याय संपादावा ।। हा खटाटोप करायास पुराण प्रत्यहि आयकावें ।। ऐशा प्रसंगि यवन आपुले समुदाई युद्ध करायास संनिध होउन कावित्रें करुन हेर काढुन या ऐशा प्रसंगिं राज्यास मारावें व राज्य हिरोन घ्यावें येसें करुन बहुत देश नेला व आपला केला ।। हें पाहुन दुसऱ्या राज्याहि आपले पुरोहितीं मजकुर केला जर आचार्य आपले हस्तीं पुजाविध संपादुन श्रेय राजयांस द्यावें ।। साह-सहस्र मुस्तेद होउन आपले मंडलिकीं मिळोन भोजन संपादावें ।। येक मात्र स्नान ।। खुणेस यज्ञोपवित ।। राणे ठकर सींग इत्यादिकीं शस्त्र कमर बांधुन भोजनास बैसावें ।। यैसा नेम केला ।। ते समइं म्लेंछाचे तयांसि चालत नाहिं ।। मागें बहुत युद्ध संपादिलीं ।। म्लेंछ तहास आणिले ।। जागो जागेचे रागे आपले बळकटिन तुर्क इरिस आणिले ।। परंतु दिलिपतितक्त तयांचे हस्तिं पडलें ।। तेधवां तह जाला ।। जर रजपुत्रांचि कंन्या यवनास द्यावि ।। वाम अंगुष्ट कुकुंमटीळा सवा फतेसिंगि राजमहाराजनाम तयां कुळिं त्याहि करावा ।। ते समइं तो छत्रधर सार्वभोम नाम तयास ।। या रिती उभयराज्य येकमत्तिं वर्तु लागालिं ।। ऐसा संकळित-मात्र स्वज्ञा ।। कां जर बहुत देशदेशिंच्या कथा लीहितां फार विस्तार होईल ।। या मध्यें बहुत पेढ्या तुर्कांच्या गुजरल्या ।। यैसे प्रसंगि धर्म शंकराचार्यी रक्षिला ।। श्रींगेरिस मठ स्थापिला ।। दुसरा मा + संप्रदाय मठस्थापना श्रीपाद कनोजि ब्राह्मण मठाधिकारि व धर्मरक्षणार्थ शंकर अवतारी दक्षणप्रांति राहिले ।। कानडा

रामराजा कुटुंबस्था तयाचा पाळेकर असतां दैवि इछा पंचवरुणा मध्यें वैर उत्पन्न होतां नवा लक्षाच्यि सैनिक समागमें असतां तया हस्तें मृत्य जाला ॥ सेवट ठीकाणे ठिकाणी जे जेथे होते ते राज्य अधिकारि जाले ॥ यैशा कथा वर्तल्या ॥ सर्व देश बहुत राजे जाले ॥ ते शाहाणव कुळिंचे ॥ तुन्हेरि भोसले चव्हाण जाधव घोडपडे दाहाबाडे कावरे बुधले कवाड इत्यादिक जागोजागि पाटलिका देसमुख्या वतनदार जमीदार ठीकाणदार ते तयाचे मंडाळिक राजे च जाले ॥ या आपले देशिं देसाये पाटेल चोधरी वतनदार इजारदार महालदार कुळावि कुळुंबि म्हतारे चवघले साहाणे ॥ ऐसे रीतीन उद्यमी ताडमाड–सरा कादायास राउत सिंधे पैकि आचार धरिला ॥ किंतिक कडु म्हातारे पाटेल चोधरि चोरघे ठाकुर परभु ऐशा नवकुळया हा उदिम धरिला ॥ नीमित्या यां शस्त्रधरियांस कबिले वाढले ॥ उपार्जित थोडि ॥ समुदाय खर्चिस वतने न पुरत ॥ या करितां हा उद्यीम धरिला ॥ कौळी सवे सावे यूरी चोधरी राउत वर्तक म्हातारे देसमुख नायक भोईर माळी या बारा कुळया ॥ याहिं वाडिमळे–केचा उदिम धरिला ॥ कोळायसिलायचे कुळिंचे यांहि सिल्पिक उदिमि आणिक दुसरे मध्यें प्रवेशले ॥ पुरो राणे दरणे प्रभु याहिं कारकोन–मत्त धरिलें ॥ शेषवंशि बहुत कुळे ॥ शोमवंशि देशले म्हतारे नायक रुत राउत चोधरी पाटेल वर्तक पुरो ठाकुर साण्हे कौळी माळी सुतार दरणे पुरो यात हि असत ॥ यैस्या या कुळया ॥ या समंति कृषि धरिली ॥ हा संप्रदाय निराळा जाला ॥ सेति संप्रदाये निराळा ॥ कांसार संप्रदाय निराळा ॥ तांबट पोगार निराळे ॥ लोहार गाडघडे निराळे ॥ बाहारे निराळे ॥ मासि नीराळे ॥ वैति नीराळे ॥ कोळि सोनकोळि नीराळे ॥ ढारे कोळि नीराळे ॥ आगरि खुम नीराळें ॥ खारु नीराळे ॥ डोखळें निराळे ॥ सर्वा वर्णावर्ण नट भाट बुरुड चर्मक अंत्यज जाति ॥ यास सर्व माराष्ट्र ॥ सर्वांस ब्राह्मण श्रेष्ट ॥ वर्णभेद, गोताचि कर्मे भिन्न, वर्तणुक आचार भिन्न, पहिराव भूषणे भिन्न, भाषा भिन्न ॥ भीन्न भीन्न देशिंचे देशाचार आहेत ॥ कुळाचार आहेत ॥ वंशाचार आहेत ॥ देवशास्त्राचार आहे ॥ तो श्रेष्ट व कुळाचार देशाचार श्रेष्ट ॥ श्लोक ॥ स्वधर्मे परमं श्रेष्टं परधर्मो भयावहः ॥ ऐसे हे भगवद्गीतेचें वचन ॥ तें असे ॥ जर आपआपले धर्मि असावें ॥ गुरुवाक्ये गुरुसिं मानावें ॥ देव गुरुरुपें सर्वांसरक्षिता ॥ सुख देता ॥ दुष्कर्मे दुर करिता ॥ अंति सायुज्यता मुक्ति

देता ॥ तरि हा धर्म सर्वधर्माचा जीव ॥ मुळधर्म माराष्ट्र स्नान गुरु–उपदेश मंत्रजप प्रत्यहि करावा ॥ जे गुरु संख्या सांगेल त्याप्रमाणें सुर्यास नमस्कार सूर्यव्रत आचरावें ॥ विशेषें करोन सूर्यवंशि व सोमवंशि गणेशचतुर्थि संकष्टि यथानेमे कराव्या ॥ शेषवंशिं सोमवार–व्रत महादेवाचें करावें ॥ कुळस्वामिची तीथ यथानेमे उपोषण ब्राह्मणहस्तें पुजन तयांस आमान्य दक्षणा द्यावी ॥ कामिकव्रतें आचरावी ॥ वार्षिकी नवचंडिका उपोषणे करावी ॥ घटस्थापना ब्राह्मणभोजने घालावीं ॥ जाती भोजने घालावी ॥ सोहोळे गर्भाधान पुंसवन चौळ चुडाकर्ण मंत्र उपदेश व्रतबंध विवाह महोत्छाव कीलालकर्म गृहशांतिक गृहप्रवेश विद्यारंभ वाणिज्य कृषि सर्व हि कर्मे प्रारंभ ॥ श्रीगुरु कुळाचा ॥ व स्थळगुरु स्थळाचा ॥ तीर्थगुरु तीर्थिचा ॥ त्रिगुणात्मक गुरुमूर्ति ॥ ब्रह्मा-विष्णुमहेश इति त्रिगुणात्मकरुप ॥ परब्रह्म परमेश्वर अनादिरुप परमेश्वर याखिला विरंचि श्रृष्टि ॥ हा धर्म सर्व–ब्राह्मण अनुमत्तें नायकोरावास व सर्व समुदायास संनिद्ध ॥

[पृ. ५२–पृ. ६१]

### ३. ज्याची भाख जाईल तो निरर्थक जन्मी

राया नागरस्याने विना कष्टि राज्य स्वहस्ति केलें ॥ शालिवाहान शके १२६९ पावेतों ॥ त्या नंतरे सोमवंशि क्षेत्रियाहि बहिस्कृत केलें व रायाने त्यांसि दंडिलें ॥ तें चि ऐसें ॥ जें राया नागरस्याचा पाळकपुत्र जईतचुरि होता ॥ त्याचा पुत्र नामे भागडचुरि ॥ द्वालिबंद नाईकवाडा येशवंत होता ॥ बहुतां युद्धा मध्ये जयो पावला ॥ ह्मणोन रायाने सेनाधिपाति केला ॥ तेणे किती येक कार्ये रायाचि बहुते प्रकारें उतमान्वयें यथा पुरषार्थि सिद्धि पावविली ॥ ऐसें जाणोन राय ॥ नागरस्याने साष्टिचा कारभार दिधला ॥ तेणे करोन भागडचुरि आपलि स्वतासी कामाविस करों लागला ॥ त्यानंतर सेताचि मोजणि केली ॥ काटि हात ७ सात करोन जामिन मोजिली ॥ १२ ॥ काठियांचा बिघा १ येक त्यास धारा ॥ २ बिघे यांसि हारा १ त्याचे फरे ४ राजरयतेने दिवानास द्यावे यैसा तह केला ॥ येकसें आठाविसा बिघ्या चावर येक केला ॥ या प्रकारें कामाविस करों लागला ॥ तें राया नागरस्यासि मानलें ॥ की हा आपले हितार्थि उत्तम प्रकारें दिवस प्रतिष्ठा वाढली ॥ यैसि

कामाविस वरुषें १२ अधिकोत्तर भरलीं ॥ ते समई ईश्वरी ईछा म्हणोन भागड-चुऱ्याचि बुद्ध फिरली ॥ स्त्रि वेशानि प्रवर्तला ॥ कित्येकां भल्या ॥ भल्यांच्या स्त्रिया बलत्कारें भोगिल्या ॥ भल्या भल्यांच्या ईजति घेतल्या ॥ कित्येकां पासोन द्रव्य घेतलें ॥ आणि अभिळासवृत अद्‌भुत ह्मणोन गाऱ्हाणि राया नागरस्यास गेलिं ॥ तेधवां अतिशयें गाऱ्हाण्यास रायान म्हणितलें कीं आपण त्यास सिक्षा लाविन, तुम्ही चिंता न करणें ॥ यैसिया प्रकारें भागड-चुरि उन्मत होउन शत्राचि हि चिंता मनी नाहि ॥ जीवास उदार म्हणोन राजा हि माने दचके ॥ जर बळाढ्य आणि जीवास उदार ॥ म्हणोन राजा तत्रास दुखवित नसे ॥ परंतु आशंकित असे ॥ जर यैसिया दुष्ट-कर्मास दंड करावा ॥ परंत त्यासि जें महत्व दिधले होतें ते पाळित गेला ॥ यैसें असतां मालाड माहालिचा सोमदेशला सोमवंशि त्याचे बंधुचि स्त्रि अतिसुंदर जाणोन तजविज भागडचुऱ्यान मांडिलि ॥ जर ते स्त्रि बळत्कारें हरावि ॥ ह्मणोन तो सोमदेशला व त्याचा बंधु व घरांतील पुरुष अवघे आणोन बंध केले ॥ बंदिरखानी दिवस पांच होते ॥ तेधवां त्यास वर्तमान कळला जर आज्ञा भागडचुऱ्याची सिपायास जालि जर जावोन ते स्त्रि काढोन आणावि ॥ ते आईकोन सोमदेशल्यान ताबडतोब सेवक रवाना केला जर ते स्त्रि उतावळ पळवावि ॥ तेधवां तो सेवक घरि जावोन समाचार सांगितला ॥ जर ऐसें होणार ह्मणोन ते स्त्रि त्या सेवके समागमि घेवोन कुऱ्हारास नेलि ॥ तेथे रात्र क्रमिली ॥ तेधवां हे सिपाये घरि येवोन पाहों लागले ॥ तेधवां ते स्त्रिला न देखत ॥ ह्मणोन भागडचुऱ्या जवळ गेले ॥ जर ते पळविली ह्मणोन भागडचुरि कोपला ॥ मग त्या सोमदेशल्याचा बंधु ते स्त्रिचा भ्रतार ताबडतोब मारिला ॥ तो वर्तमान कुऱ्हारास कळला ॥ मग तेथोन भाईदरा मात्रुपक्षि नेलि ॥ तेते मास येक होति ॥ तेधवा ते माईबापास चिंता वर्तलि ॥ जर हे सगर्भ चहुमासाचि ॥ हे येथे ठेविता कामा नये ॥ जर प्रसूत-काळि प्रगट होईल आणि त्या भागडचुऱ्यास कळेल तर आपणास वाईट होईल आणि ईलाहि काढोन नेईल ॥ ह्मणोन समागमि बाप घेवोन भिवंडी मायार पक्षि घेवोन गेला ॥ तेथे ते ठेविली ॥ मग तेथें ते प्रसूत जालि ॥ पुत्र जाला ॥ तो वाढला ॥ वरुषे १२ भरालि ॥ तेधवा तो मुल शास्त्रीविद्या-पूर्ण जाला ॥ तेधवां येक दिवस त्या मुलास वर्तमान मातेन

सांगितला जर तुझा पिता भागडचुऱ्यान मारिला॥ तें आईकोन तो मुल मनी विस्मित होउन अभिमानी पडला॥ जर त्याण्हे माझा पिता मारिला॥ त्यास मी मारिन॥ हा निश्चये करीन आपले कुटुंबि बैसोन विचार केला॥ तेधवां ते सर्व मामारपक्ष त्यास साह्ये जाले॥ हा अभिमान आमचा॥ ह्मणोन दिवस दिवस आपले समंधि भाव त्यांस पाचारोन विदित केलें॥ ते हि साह्ये त्या मुलास जाले॥ मग थोरथोर ठीकाणि अवघ्याचि समंते घेवोन पत्र नागरस्यास पाठविलें॥ जर मला देशलिक देसिल तर आपण पित्याचा सुड घेईन॥ भागडचुरि मारिन॥ तुझी आज्ञा असेल तर आपण तुझे चरण देखावयास येतो॥ आणि जी सेवा भागडचुरि करित असे ते द्वीगुण म्या करावि॥ ऐसें पत्र प्रविष्ट माहिमा राया प्रत जालें॥ राये वाचोन अभिप्राव मनासि आणिला जें रायाचे मनि होते तें तें चि होऊन आलें॥ जर दुरात्मा घातकि भागडचुरियाचा परस्परे घात होईल आणि तो राजाज्ञा मन्य करिल ह्मणोन परस्परें कार्यें होवोन येतें ह्मणोन रायाचे चित्तास आलें॥ मग तें पत्र गुप्त प्रकारें मरोळ माहालि कान्ह देसल्यास पाठविलें॥ तें पत्र त्या देशलें वाचोन पाहिलें॥ त्यासहि संतोष जाला॥ मग तें पत्र मालाड माहालि साष्टि मध्यें दाखविलें आणि सर्व मिळोन निश्चये केला॥ जर भागडचुरि मारावा॥ ह्मणोन सर्वांचे समंते पत्र त्या मुलास पाठविले॥ तो मुल तेथिल आपला समुदायि समागामि घेवोन रात्रौ मरोळास आला॥ तेथें सर्वांस भेटला॥ तेथे जमा सर्व केला॥ तेथोन रात्रि पाचंबा देविस दवा मारिला॥ उदय सोमवार महड-देविची यात्रा॥ ते समई भागडचुरि मोहटे पाहाटि उठोन येसाण्यास गेला॥ मुक्तेश्वरी श्रान करोन देवळामध्यें देव-दर्षन घेवोन राहिला॥ ते समई घेवोन बाहेरि पडला॥ समागमी बारा अश्वार स्वांग जिवाचे॥ अवघे येतां देशकें काहाळा भेरिवाजाविल्या॥ हा हा शब्द होतांच हे अवघे तुटोन पडले॥ तेधवां घाबरे प्रकारे बारा श्वारा मघोन दोन स्वार तेथेच ठार जाले॥ मग ते दाहा जण आड घालोन पळो लागले॥ ते अश्व चिखलांत न चालत म्हणोन पाये उतारा जाले॥ पळो लागले॥ तेधवा त्या मुलान निर्वाण घोडा टाकिला॥ तो आला ह्मणोन उड्या खाडित टाकिल्या॥ पोवंत चालिले॥ तेच संधी त्याच खाडित होडे होते॥ त्यावर तांडेल कैवर्तक बैसला होता॥ त्यास त्या मुलान हडकिलें जर तो निळे पागाडिचा

भागडचुरि मारिसिल तर जें तुं मागसिल तें मी देईन ॥ माझे सत्यवचन ॥ यैसें यैकोन तो तांडेल बोलता जाला जर मला आपणा सारिखें कराल व जातित घ्याल तर मी मारितो ॥ अड तैसाच जाणोन त्याणे आपलें सत्यवचन दिधलें की कबूल केलें ॥ तेधवां त्या तांडेलें पालकोईती ह्मणोन भागडचुरि मारिला ॥ सिर घेतलें ॥ आणि ते निजंग भागडचुऱ्याचे पैलपार जाले ॥ त्याचि कथा मोह्योरे आहे ॥ मग त्या तांडेलें भागडचुऱ्याचें सीर आणोन त्या मुलास दिधलें ॥ तें घेवोन सर्व जमा मुक्तेश्वरि आले ॥ तेथे खुशालि करों आदरिली ॥ काहिक धर्महि केला जर हा मुल लहान वयेसे मध्यें येशवंत जाला ॥ आणि पदाधिकारी सर्वेपणे प्रौढि वाढली ॥ मग तेथें जातिभोजन आरंभिलें ॥ ते वेळि सर्व सोमवंशि आणि सूर्यवंशि मेळवोन भोजन आरंभिलें ॥ तो प्रसंग जाणोन हा तांडेल सोंवळे नेसोन तेथे आला ॥ ह्मणो लागला कीं भाष उतिर्ण करावि ॥ ते यैसि कीं पंक्तिपावन मज करावें ॥ तेधवां सर्व बोलते जाले की आम्ही द्रव्य तुं जे मागसिल ते तुज देतो ॥ आम्हा सारिसा करितों ॥ ते आईकोन तो तांडेल बोलता जाला कीं मला द्रव्याचि ईछा नाहि ॥ तस्मात् द्रव्य चिरकाळ नव्हे ॥ म्हणोन आपलि भाष उतिर्ण करणे ॥ असेल तर जातित घेणे ॥ जे माझे पेढो पेढिस राहेल ॥ म्हणोन हा निश्चये ॥ यैसा हढाव जाणोन कठोर वचन आईकोन समस्त विचारि पडले ॥ तेव्हा हा मुल बोलिला कीं मला भाष उतिर्ण करणे लागेल ॥ न केल्यास पूर्वज हांसतिल ॥ ज्याची भाख जाईल तो निरार्थक जन्मी ॥ आणि पूर्वजांस अधःपात ॥ ह्मणोन कबुल केले ॥ तेधवा कित्येक ईश्वरिभये धरोन उठोन रिघाले ॥ काहिक त्यांचे समागमि गेले ॥ आणि बहुतांहि त्या मुलाचा अभिमान धरोन त्या प्रसंगि राहिले ॥ मग तो तांडेल पंक्तिस बैसविला ॥ यैसे प्रकारे तांडेल जातित सरता जाला ॥ भोजन संपादलें ॥ मग तेथोन सर्व समुदाये तो मुला सहवर्तमान राजदर्शनास माहिम बिंबस्थानि गेले ॥ जावोन तो मुल राया नागरस्यासि भेटला ॥ त्यासि देखोन रायाने बहुत मान्य दिधला ॥ बैसकार जाले ॥ ते समई वर्तमान ॥ रायाने पृछा आदारिली ॥ कीं तुज देखोन फार संतोष जाला ॥ परंतु हा समाचार कळला कीं तुम्ही कैवर्तक जातित घेतला ॥ हे अनकृत्य आचरलेत ॥ कर्मबाह्य म्हणोन राजगुरु पोशनायक बोलावोन धर्मशास्त्र पाहों लागले ॥ तेधवा निवाडा जाला कीं अकृत्यास दंड कर्मबाह्ये

यज्ञोपाविते वर्जावीं ।। तेधवां त्या मुलान ह्मणितलें कीं ज्यास भाष देणे ते पाळणे आह्मास ।। ऐसा निश्चयो त्या मुलाचा जाणोन रायाने यज्ञोपविते काढाविलीं ।। तो प्रसंग जाणोन क्रोधि फार जाले ।। ते पाहाता राजा बोलिला कीं पंचरात्रि परस्परें निघातिल ।। मग त्या मुलास सीरपाव दिधला ।। साशष्टिचा देसाय केला ।। मालाड माहालचा फरमास दिधला ।। देसलिकिचा विडा देवोन आज्ञा केली ।। मग ते सर्व तेथोन मालाडास आले ।। त्याचे मागें प्रधानास आज्ञा केलि की त्या साशष्टि मध्ये जीतके त्या तांडला समागमे जेविले असतिल ते त्यांचि येज्ञोपवितें हरणें ।। ते आज्ञा प्रधान वंदोन २०० अश्व घेवोन साष्टि मध्यें आला ।। येवोन ढांढोरा पीटिला कीं जे त्या भोजनि जेविले असतिल त्याहि यज्ञोपवितें वर्जावीं ।। जे न यैकातिल त्यांस राजदंड आणि कर्मबाह्ये कैवर्तक ।। यैसें प्रतिपादिलें ।। धर्मशास्त्रसंमति कैवर्तक कर्मबाह्ये जाले ।।

[पृ. ९८–पृ. १०२]

## क्रमांक २ : : राक्षेस तागडीचा रणसंग्राम

रात्री राजभुवरा(नें) स्वप्न देखीले जे आपुले कानीचे मोती तोडून घेत होते बैसले सिहासन हिरोन घेत असे आपणासी दूत येऊनु वोढीत असे ऐसे पाहुनु घाबीरा होऊन ऊठीला सवेची थोर थोर जोइसी व पंडीत व वेदशास्त्री व ग्रामजोसी आपुले वडीलाचे वेले आदीखानी बहुता दिवसाचे होते त्यासी बोलाऊ पाठविले मग त्यापुढे स्वप्न सांगीतलेवरी त्यांनी राजभुवराची मन समाधान केले जे तुझे शत्रु जे कोण्ही येताती ते नास होऊ(नु) जातील तुवा क्षेत्रपती मार्कंडी (आ)उश होऊनु राजसिहासनी रा(ज्य) करीसील म्हणोन बोलिले मग आप(ण) आले लोकासी असावलिया व करनाटकी चादरा देऊनु दोहडावले मग राजयाने बैसोन पांच हजार होनु ब्रामणासी वाटिले. मग राजयाने बरवे मोहूर्त पाहुनु घोडा सारंगा अमृतनिधान राजाबैसता आणऊन त्यावरी बसोन अकरावे तासी तख्त विज्यानगराहोऊनु बाहीर येऊन उतरतर्फेसी नवगोजी देऊनु उतरीले पागा व पीलखाना व उस्तरखाना व थट्टी व सिकारखाना व जमदारखाना व शरबतखाना व कोठी व फराशखाना व अंबारखाना व तमाम येऊनु नऊगजी आसपास येऊनु उतरीले शाहार विजयानगरामधें धांडोरा फिरविलें कीं येक घोडा व राऊत न राहाता लस्केरासी चालणें म्हणोनु ताकीद केली. तमाम बाहेर येऊनु उतरीले.

या खेरीज मनेवरानी व पुंडानीं पालेगारानी व लिंगारीयानी व अलकुरानी व राजबिडीयानी व हिबलकारानी मोबलग गणती सापडीत नाहीं जंगलोजंगल व डोंगरेडोंगर व दरेखोरे जागा जागा उतरले असे नजरेने पाहतां करनाटकी लसकेर सांत आ(ठ) गांव जमीन उतरले असे राजभुवराने नडगोजी तुंगभद्रातून पुढें दिधले. णेसखाना जाऊनु कुस्णानदी कडका धरून उतरले राजयानें हत्तीस आणऊनु पाहुन सीले करवीले. हतीचे नावें पिनावे बीता*............

* येथें ९० हत्तींचीं नांवें दिलीं आहेत.

तमाम हत्ती सीले संदुती करून हत्तीवरी जंबुरे जबरजंग लाऊन अलाहिदा पेशनामाजाद कृस्णा नदी तटाकी उतरवीले राजभुवरानें का तावरगीरी व कुंदरापिवयेल बरगे दरमायाने येऊनु नडगजी देऊनु उतरले पेशनामजादी लस्केर व बाजारबुणगा येऊनु मुसकीनजीक उतरीले नीजामशाहा पादशाहा बहीरी मऱ्हाटा तख्त दौलताबाद याने भीमरथीस येऊन उतरोन सुलतान पेरोजाबाद नजीक उतरला व अकबरजलालदीन पादशाहा शहादुर्गानजीक उतरला व इभराइम कुतुबशाहा तेलगण तख्त गोलकोंडें याने मुदगल व रायेचूर दरम्याने उतरला चहुतर्फेने मुसलमान पादशाहायानी लस्कर व लुटावरे व पेढारे व वणजारे व चोरपाईक नदी धरून उतरले राजभुवराचे मुलुकामधे चिधींचोली बं(हा)द धरून आणु लागले तमाम मुलुक हुलीं होऊन चालीले राजभुवरानें आपले लस्करासी ताकीद करून बाजारबुणगा नजीक च्यार हजार घोडा व पावप्यादे पनास हजार ठेऊनु तमाम वजीराने व राजबिडीयानी व राजकोमारानी व येकांगधीरानी व सपरीगारानी व रजपुतानी व क्षेत्रीयानी व दलवीयानी व मनेवारानी हे अवघे जाऊनु राक्षेसतागडीस जाऊन नजीक उतरले अराबा भांडी फिरंगी गाडीयावरी मुस्तेदी करून जोडुनु बाण तमाम पावसुर बाणाईत बैलावरी दर बैलासी बाण सुमार २८* येकुन बाण सुमार ८०००० व राजबाण व कोमारबाण यैसे उष्टावरी अराब पुढें उतरवीणे व बारु गेलोले व तुव खिजतना इ ने सांगाते घोडा राऊत व पावपाद्ये असपास दरम्याने ठेवणे व बिसलया नाईक त्रिवेंगलपा नाईक व कार्तीकविरपा नाईक हे तीघेजणासी राजभुवरी कपडे देउनु मुसलमान पादशाहीसी झगडा करावे पेस(यास) नामजादी पाठविलेवरी त्यानी येउनु आपुले करनाटकी कुल लस्केर देखील राक्षेसतागडीनजीक उतरीले हे खबरी जासुदानी व कालबा(दा?)रानी व हरकारेयानी यैसे जरजरा तिलतिल खबर घेउनु आपुले पादशाहासी सांगितले मग मुसलमान पादशाही गांव पांच कोसावरी येउनु उतरले वरी निजामशाहा मऱ्हाठा पादशाही व ईभराईम कुतुबशहा तेलंगण पातशाही हे दोघेजण फुटोन अलाहिदा लस्केर येउनु तलावा फिरो

---

* प्रत्येक बैलास फक्त २८ च बाण कसे? प्रत्येक बैल १००।२०० बाण सहज वाहील.

लागले ते पाहोन राजभुवरानें लस्कर पायदल फौज करून भार रचिले अलीयेदलशाहा पादशाहा कन्नडजाण याने आपुले कुल लस्केर घेउनु येक फौज करून उभा राहिला इमामनमुळीक पादशाहा वराड देश आपुले कुल लस्केर घेऊनु येकभार रचिले असे तीनी च्यारी पादशाहा च्यारोतर्फ भार करून राहिलेवरी करनाटकी पाऊप्याधे व घोडेस्वारानी येकदुमाल होउनु अरोबा मधे रचून पुढे चालुनू निजामशाहा बहीरी पादशाहा व कुतुबशाहा तेलगणे तर्फे झगडा केले बाणाबाणी जहाले व त्यामधे व यामधे लस्केर बहुत जाया जाला दोहीतर्फेचें लस्केर जखमी बार जहाले निजामशाहा बहिरी पादशाहा व कुतुबशाहा तैलगण याने दीडकोस माघारे जाऊनु अलीयेदलशाहा कन्नडजाण व ईमामनमुळीक वराडदेश पादशाहा याने आपले जागा मुस्तैद दोनी फौजा होते त्यानी येउनु झगडा दिल्हे जखमी व पाडाऊ जाहाले वीतपसील............*

हे रणजखमी व पाडाऊ जाहालेवरी राजभुवराने अैकोन अपुले तरफेचे वजीरास व लोकासी व बाजे खलकासी कपडे पाठविले आपुले लोकासी सागोन पाठवीले जे अपण येईजे तो झगडा न करणे लोक बहुत जाया होतांती तमाम जमा जाहालीयावरी शर्तमर्दीने झगडा केला जाईल यैसे भोसल्या दलवीयासी पाठउनु दिल्हे अलीयेदलशाहा पादशाहा कनडजाण या पासी छरीयेपा नाईक जामदार याला हेजीबातीस पाठविले जे तुवां अपण चालोन येउनु अम्हापासी येउनु मांडीवरी बैसून फर्जंद म्हणवीले कि तुम्हा-कडे अपण न येऊ म्हणोन यैसे शर्तनामा केलेवरी रायेचूर व अदवानी हे दुदलोणी बद्दल दिल्हे आपुले सद्देमधे पादशाही जमजम करुनु असावे यैसे असता तुम्ही अपुले मुलुकामधून तिघ पादशाचे लस्केरासी वाट देउनु अपण कुल लस्केरसहीत येउनु मदती होउनु उतरले असे बहुत बरे चार पादशाही मिळुन आलीया काय होणार असे पेस्तर तुमचे मुदा काय कैसे असें म्हणोन मग अलीयेदलशहा याने जबाब दिल्हे जे तिघे पादशाही लस्केर जोरावार होउनु माझे मुळुकामधून आले मज पासी जोरावार नाही कुल लस्कर व मुलुक खराब केले हे राजवटे मधे आम्ही पडलो नाहीं हे तो जैसे फर्जंद

* येथें जखमी व ठार झालेल्यांचीं नांवें दिलीं आहेत.

म्हणोन मांडीवरी बैसोन सव सफध दिल्हे असे त्यासी खता नाही तुम्ही काही दिलगीर न होणे येसे हेजीबा सांगाते खलबत करुनु हेजीबासी शाल व आसावली ५ तेजी व हस्तकडग व कुडकीयासी मोती जोडा १ दिल्हे व हत्ती छावा येक १ दिल्हे व हेजीबा सांगाते मोख्तसर दाहजण आले होते त्यासी शाला येक येक देउनु हेजिबासी पाने देउनु दोहडावीलेवरी हेजीब जाउनु राजभुवरासी हे हकीकती बयाण अर्ज केले हेजीब सांगाते आलीयेदळशहाचे हरकारे सीवाजी गोपीनाथ जमारीकादा होता त्या सांगाते तीन तास पासुनु पांच तास परीयंतर खलबत करुनु हरकारा मशारनुलेसी येक दुस्त कपडे दिल्हे व मोतीयाचा तुऱ्हाइ येक १ व कमरशाल १ दिल्हे बहुत मेहमानी केली अलीयेदलशाहासी फिरंग व कमर गुर्दा थोर मोलाचा देउनु पाठविले हे खबर निजानशाहा बहीरी व कुतुबशाहा तेलगण व अकबर जलालदीन मोगली पादशाहा यासी दिदवानी हरकारे यानी लिहून पाठविले जे अलीयेदल शाहा सांगाते राजवटा लावीली असे म्हणोन मग तिघे पादशाहा यानी येदलशाहापादशाहा नजीक हरकारेसी पाठविले अम्ही अवघे मिळोन राजभुवराचे मुलुकगीरी कराव्या आलो असो दरम्याने तुम्ही त्या सागाते राजवटा करीता हे तरी बरे नव्हे अवघे येकवट होउनु गोशमाल देणे लागते अलाहिदा राजवटा केलीयाने काम होऊन येत नाही तरी तुम्ही त्यामधे मिलालीया आम्ही काही फिरोन जाणार नाही शर्तमर्दीने मुलुकगीरी करून तुम्ही आम्हा बराबरी मसलतीस येणे म्हणोन तरी येदलशहाने सांगोन पाठविले कीं तुम्हाबरोबरी असो जे काये दिलचे मुदा असेल ते कबुल म्हणोनु मग हरकारेसी तश्रीफ देउनु रवाना केले राजभुवराने आपण येऊन राक्षेसतागडी नजीक उतरले रणथाबा चौघार राक्षेसतागडीचे मैदानामधे घातले करनाटकी लस्केर तमाम येउनु उतरले झगडेसी सुरु जाहाले मुदती रोज २७ झगडा जहाला जलालदीन अकबर पादशाहा तख्त जालनापूर याने मोगल व कर्ण रजपूत राहाठोड हे नालतवाडी दरम्याने उतरले यामधे व त्यामधे रायबागा नजीक झगडा रोजबरोज होऊं लागला करनाटकी वजीर व येनलमुलुक व अंकुशखान बारगीर वजीरानी पारखे होउनु येदलशाहा तर्फेसी आले जलालदीन अकबर पादशाहा व निज्यामशाहा पादशाहा बहीरी व कुतुबशाहा तेलंगण हे तिघे मिळुनु राज-

फौज करून चालोन आले राजबिडे पाऊपाये हसम झगडा दिल्हे पहिले तास पासून अकरा तास पावेतों झगडा जहाला रण दुतर्फे पडिले राजभुवरानें राज-बिडे व बाजे वजीरासी व लोकासी बोलाऊन खलबत केले सदरहू वजीर अवघे मिळून राजभुवरास अर्ज केले जे मुसलमानु पादशाही लस्केर येकवट होउनु येताती आम्ही त्याचे तोंडेसी उभे रहातो जैसे मारावे तैसे झगडा फत्ते करीतो अलीयेदलशाहा व इमामनमुळीक हे दोघे पादशाही लस्कर आपुले जागा होऊन पुढे येताती दोघे पादशाही झगडा देत असे रोजबरोज रण पडीत असे ह्यानी दगा देउनु सांपडवीतील ह्याचे पतेरा नाहीं ते तर्फेसी मुदाम दाहा हजार घोडा व पन्नास हजार पायेदळ त्याचे तोंडेसी राखणे आम्ही दिलपाखीनें मशाकत करून दोन्ही पादशाही लस्कर दगा देतील येसे सिर-भोई ठेऊन रोशन केलेवरी राजभुवरानें वजीरासी कपडे देऊन दोहडाविले जागा जागा आपुले गड कोटासी इतबारी लोकासी राजभुवरानें पाठविले बीतपशील* ............

येणेप्रमाणें कपडे देउनु पाठविले राजफौज झगडा जहाले निज्यामशाहा बाहिरी व कुतुबशाहा तेलंगण मोडा जहाला अकबर जलालदीन मोगलावरी झगडा घातला त्याचे मदतीस कोण्ही आले नाहीं निज्यामशाहा बहिरी व कुतुबशाहा तेलंगण हे मोड जहाले मोड होउनु येकजागा मार रचिले होते लस्कर करनाटकी झगडा करुनु परतुन येता मागुती हे फौज लस्कर झगडा दिल्हे हे करनाटकी लोकानी ४०००७०० हजार बाण येकायेकी ब (हा?) त्ती लाविले त्याखाली दोघे पादशाहाचे लस्कर मोबलग झगडीयात पडीले कच खाऊन आपुले जागेसी उतरले मोगली लोक मागुती येउनु अलाहिदा झगडा दिल्हे करणाटकी लोक बहुत पडीले इतुके झगडा देउनु राजभुवराचे लस्केर जाउनु आपुले जागा उतरले राजभुवराने आपण राजहौश मुस्तेदी रामहत्तीवरी बैसोन कुल लस्कर दोघे तिघे पादशाहावरी चालिले भांडे थोर थोर भरुनु भांडेचे बहुत मार जहाले बहुत कच होउनु लस्कर मोड जाहाले त्यावरी राजभुवराने बहुत खुषीहाल होऊन नडगोजीस परतून येउनु उतरले करनाटक लोक तिनी पादशाहा लस्करासी झगडा करून भागोन बेहुशार

* येथें १५ सरदार पंधरा ठिकाणीं पाठविले, त्यांची यादी दिली आहे.

होऊन लस्केर उतरले होते अलीयेदशाहा व इमामनमुलीक वराडदेश पादशाहा हे दोघेजण पादशाहा येकायेकी मुस्तेदीहून राजभुवरावरी घोडे केला त्याचे जिना उतरुन बेखबर होते पाऊप्याद्ये लोक रोटीपोळी करून घेत होते तो येही जाऊन सभा पडोन खतर केले राजभुवर रामराज अलीयेदलशाहा पादशाहा कन्नडजाण हाताखाले पाइन जाब बोलिला जे तुवा माझे लेक म्हणोन बोलीली होतासी तुवा येकायेकी दगा करुनु मजवरी सभा पडिलासी आता माझे काये ततबीर चालणार असे माझे लस्केर तमाम पडीले म्हणोन ताजा कपडे पुरतकालीक दाईव टोपीस हिरा मोती माणीकाचे कुलाब घालून मावीशाला पांघरुन अपुले देवासी स्मरण करून अलीयेदलशाहासी सांगोन पाठविले जे तुवा आपण फिरंग घेऊन येकांग लढाई करावे दुसरीयाने आपुलीयावरी हात देऊ नये म्हणौन त्यापासी सौगंद घेतले मग अलीयेदल-शाहाने अपण्न येकांगी भिडीतां नजीक उभे राहुन डोसकी कापिले हे खबर च्यारो पादशाहासी जाहीर जाहाले करनाटकी लस्केर तमाम चिंदीचोल जहाले पलोन हत्ती व घोडे उट बारु गलोले व बाण सुमार व खजाना तमाम लुटालुटी जहाले कुल लस्कर मिलोन विज्यानगरासी गेले राजभुवराचे माये व तिघीजण बाईला हे खबर ऐकोन माहालासी आगी लाऊन दिल्हे माणीक मोती व हीरा रत्न तमाम मुसलमान लस्कर पादशाहा जाऊन कटकबंद उतरोन मुदाम १४ रोज शहरामधे सोदासोदी केले मोबलग माल सांपाडिले मुलुकगिरी तिनी पादशाहा यानी केले.

[भा. इ. सं. मं. द्वितीय संमेलन वृत्त, पृष्ठे १७२ ते १८१]

क्रमांक ३ : : शिवछत्रपतींचें चरित्र

## १ अफझलखानाचा वध

विजापूर [ येथे ] अल्ली इदलशहा पादशाही करूं लागले व बडी साहेबीण सुलतान महंमद याची बायको ही कारभार कुल् करीत असतां त्यांस हें वर्तमान कळून बहुत कष्टी जहाली. पातशाही किल्ले घेतले. देशही काबीज केला. एक-दोन राज्यें बुडविलीं. हा पुंड जहाला. त्यास मारून गर्दीस मेळविण्याचें कसें करावें, म्हणून विचार करून, राजश्री शहाजी राजे बेंगरूळाकडे होते त्यांस पत्रें लिहीलीं. महालदार रवाना केले कीं, "तुम्ही पादशाही चाकर आणि शिवाजी लेंक पुण्याकडे पाठवून यांणीं पादशाहाशीं बदलून हरामखोरी केली. चार किल्ले पादशाही घेतले. देश मुलुख काबीज केला व मारिला. एक-दोन राज्यें बुडविलीं, व दोन राजे पादशाही रुजुवात होते ते मारिले. आतां लेकांस कैदवार ठेवणें. नाहीं तरि पादशाही हवाला घेतील." असें लिहून पाठविलें. मग महाराजानी उत्तर दिलें कीं, "शिवाजी आपला पुत्र, परंतु आपणाजवळून पळोन गेला. तो आपल्या हुकुमांत नाहीं. आपण तो पादशाहाशीं रुजुवात एक निष्ठेनें आहों. शिवाजी आपला पुत्र याजवरि हल्ला करावी, मन मानेल तें करावें, आपण दरम्यान येत नाहीं." असें उत्तर पाठविलें.

त्याजवरून बडी साहेबीण हिणें कुल् वजीर उमराव अदलशाही बोलावून आणून शिवाजी राजियावरि रवाना करावें म्हणोन पुसतां कोणी कबूल केलें नाहीं. अफजलखान वजीर याणीं कबूल केलें कीं, "शिवाजी काय? चढे घोडियानिशीं जिवंत कैद करून घेऊन येतों." असें बोलिलियावरि पादशाहाजादी खुशाल होऊन वस्त्रें, अलंकार, हत्ती, घोडे, दौलत इजाफा देऊन नावांजीक बरोबर उमराव जमाव बारा हजार स्वार खेरीज पायदळ रवाना केलें.

तेव्हां अवघी फौज एकत्र होऊन औरस चौरस लष्कर उतरलें. आणि पुढें तुळजापुरास आलें. तेथें येऊन मुक्काम केला. श्रीभवानी कुलदेवता महा-

राजांची, तीस फोडून, जातियांत घालून, भरडून पीठ केलें. भवानीस फोडतांच आकाशवाणी जहाली कीं, "अरे अफजलखाना, नीचा, आजपासून एकविसावे दिवशीं तुझें शीर कापून तुझें लष्कर अवघें संहार करून नवकोटी चामुंडांस संतृप्त करितें." अशी अश्रुणी जहाली. पुढें लष्कर कूच करून श्रीपंढरीस आलें. भीमातीरीं उतरलें. देवास उपद्रव देऊन वांईस आलें. तेथें येऊन विचार केला कीं, "राजियाकडे हेजिबीस पाठवून, सल्ला करून, पातेजून जिवंत हातीं धरावा" अशी मनांत योजना करून कृष्णाजी भास्कर हेजीब यास बोलावून आणून सांगितलें कीं, "तुमचे बाप महाराज त्यांचा आमचा भाईचारांत पुरातन स्नेह चालला आहे. त्याजमुळें तुम्ही कांहीं आपणास इतर नाहीं. तुम्हीं येऊन आपल्यास भेटणें. आपण पादशाहा जवळून तुम्हांस तळ कोंकणचें राज्य व जहागिरी देववितों. गडकोट घेतले ते करार करवितों. वरकड ही नावांजितो जितकें तुमचे मनांत असेल तेणे प्रमाणें सरंजाम देववितो. पादशाहाशीं भेट घेणें तरि घ्या नाहीं तरि मुलाजमत माफ करवितों. ऐशा कित्येक गोष्टी सांगोन सल्यांत राजासि भेटीस आणावें. अगर आपण येऊं." असें कृष्णाजीपंतापाशीं सांगितलें आणि त्यास पुढें रवाना करावें. (असें केलें)

तों या खबरी राजियासि पावल्या, कीं, "विजापुराहून अफजलखान बारा हजार स्वारांनिशीं नामजाद जहाला. हें कळून राजानें आपली कुलफौज लष्कर मुस्तेद करावें, आणि जावलीस युद्ध करावें, आपण प्रतापगडास जावें, हा विचार केला. तेव्हां सर्वांनीं निवारिलें कीं, झुंज देऊं नये, सल्ला करावा. त्यास राजे बोलिले जे संभाजी राजियास जसें मारिलें तसें आपणास मारितील. मारितां मारितां जें होईल तें करूं. सल्ला करणें नाहीं." हा विचार केला. तों रात्रीं श्रीभवानी तुळजापूरची [इणें] मूर्तिमंत दर्शन दिलें आणि बोलिली कीं, "आपण प्रसन्न जहालों सर्वस्वें साह्य तुला आहे. तुझे हातें अफजलखान मारवितों. तुजला यश देतों. तूं कांहीं चिंता करूं नको" म्हणून धीर भरंवसा देऊन अभय दिलें. राजे जागे होऊन जिजाबाई आऊस बोलावून आणून स्वप्नाचें वर्तमान सांगितलें. व गोमाजी नाईक पानसंबल जामदार व कृष्णाजी नाईक व सुभानजी नाईक असे मातबर लोक व सरदार व सरकारकून मोरोपंत व निळोपंत व अण्णाजीपंत व सोनोजीपंत व गंगाजी

मंगाजी व नेताजी पालकर सरनोबत व रघुनाथ बल्लाळ सबनीस व पुरोहित असे बोलावून सर्वांस स्वप्न सांगितलें. श्री प्रसन्न जहाली आतां अफजलखान मारून गर्दीस मेळवितों" [असें म्हणाले.] हें सर्वांचे मते कठीण कर्म, सिद्धीस गेलें म्हणजे बरें, नाहीं तरि कसें होईल? ह्मणोन विचार पडला. मग राजे बोलिले कीं, "सल्ला केलियानें प्राणनाश होईल. युद्ध केलियानें जय जाहलियास उत्तम, प्राण गेलियानें कीर्ति आहे. येविषयीं श्लोक.

जितेन [जयेन] लभते लक्ष्मी मृत्युनापि सुरांगनाः
क्षणविध्वंसिनी काया का चिंता मरणे रणे? ॥ १ ॥

असा नीतीमध्यें विचार सांगितला आहे. त्याज करितां युद्ध करावें हें खरें. आतां एकच तजवीज करावी. संभाजी राजे पुत्र व मातोश्री आहेत हीं राजगडीं ठेवावीं. जर अफजलखान मारून जय जहाला तरि माझा मीच आहे. एखादे समयीं युद्धीं प्राणनाश जहाला, तरि संभाजी राजे आहेत, त्यांस राज्य देऊन यांचे आज्ञेंत तुम्हीं राहणें, अशी निर्वाणूक करून, सर्वांस सांगून, मातुश्रीच्या पायावरि डोई ठेवून, निरोप घेतला. मातुश्रीनीं आशिर्वाद दिला कीं, "शिवबा विजयी होशील."

असा आशिर्वाद घेऊन मग राजे निघोन प्रतागडाने गेले. नेताजी पालकर सरनोबत यास लष्कर घेऊन वर घाटावरि यणें म्हणोन सांगितलें. आणि "अफजलखानास जावलीस बोलावितों, सल्ला करून भेटतों, विश्वास लावून जवळ आणितों, तें समयीं तुम्हीं घाटमाथां येऊन मार्ग धरणें." असें सांगितलें. त्याजबरोबर रघुनाथ बल्लाळ सबनीस दिले व मोरोपंत पेशवे व श्यामराव निळकंठ व त्रिंबक भास्कर त्यांसही समागमे घेऊन तेही कोंकणांतून यावे असें केलें.

इतक्यांत कृष्णाजीपंत हेजीब खानाकडील आले. त्यांस प्रतापगडावर घेतलें. राजियाची भेट जहाली. कित्येक खानांनी गोष्टी सांगितल्या होत्या त्या विदित केल्या. लौकीक बोलणें जहालें. राजे बोलिले कीं, "जसे महाराज तसे खान आपणास वडील आहेत. त्यांची भेट अलबत्ता घेऊं." असें बोलून कृष्णाजीपंत यास बिराड एक घर दिलें. तेथें जावयास निरोप दिला. दुसरे

दिवशीं राजे सदरेंत बैसले. सरकारकून सर्व सरदार असे सर्व ही बोलावून आणिले व पंताजी गोपिनाथ म्हणवून राजियाजवळ विश्वासू मातबर होते, त्यांस बोलावून आणून एकांतीं महालांत खलबत बैसले. राजे पंताजीपंतास बोलिले जे, खानाचे हेजीब कृष्णाजीपंत हेजिबीस आले आहेत, त्यांस निरोप देऊन रवाना करितों. व तुम्हांसही अफजलखान याजकडे रवाना करितों. तेथें जाऊन, खानाची भेट घेऊन बोलीचाली करणें. खानास क्रिया शपथ मागणें. तुम्हीं ते शपथ मागतील तरि देणें. अनमान न करणें. हरप्रकारें जावलीस घेऊन येणें. या खेरीज सैन्यामध्यें युक्ति प्रयुक्तीनें ज्या रीतीनें शोध मनास आणावयाचा त्या रीतीने आणा. खानाचें चित्त आमच्या बरियावरि किंवा वाइटावरि आहे असा शोध करणें." इतकें सांगून, राजे सभेस आले. कृष्णाजीपंतास बोलावून आणिलें. राजे म्हणों लागले कीं, "खानाची क्रिया पाहिजे. याजकरितां आमचे पंताजी गोपिनाथ यांस तुम्हीं आपणांसमागमें खानाच्या भेटीस नेणें. याजवळ हस्तपंजराची आण देववणें. खानास जावलीस घेऊन येणें. काकाची भेट घेऊन येऊं. आमच्या मनांत कांहीं कपट नाहीं." असें सांगितलें. त्यांस ही गोष्ट मानली. मग कृष्णाजीपंतास वस्त्रें देऊन रवाना केलें. तसेच पंताजीपंतास वस्त्रें देऊन अफजलखानाकडे रवाना केलें.

त्यांणी जाऊन खानाची भेट घेतली. खानांनी सन्मान केला. कृष्णाजी भास्कर यांनीं अर्ज केला कीं, "शिवाजीनें हेजिबीस पंताजीपंतास पाठविले आहेत. एकांतीं बैसून बोलावें." असें सांगितल्यावरि खान, एकांतीं बैसून कृष्णाजीपंत व पंताजीपंत यांस बोलावून आणून, वर्तमान पुसिलें. कृष्णाजीपंत बोलिले कीं, "राजे तुम्हांवेगळे नाहींत. जसे महाराज शहाजीराजे तसे तुम्ही, म्हणून शपथ दिली. राजे निर्भय होऊन जावलीस येतील. खानानें ही शंका न धरितां जावलीस यावें. त्यांची तुमची मुलाजमत होईल. तुम्ही सांगाल तें ऐकतील." हा भावार्थ खानास कळल्यावरि मनांत नष्टाई धरून शपथ दिली. खान बोलिले कीं, "राजा हरामजादा काफर, जावली कुबल जागा, येथें भेटीस म्हणोन बोलावितो यास्तव तूं ब्राह्मण मध्यस्त होऊन शपथ देशील तरि शिवाजी राजियाचे भेटीस येईन. मुलाजमत घेऊं." त्यास पंताजीपंतीं क्रिया दिली जे "राजे तुमच्या वाइटावरि नाहींत. संदेह न धरणें.

भेटीस यावयाचें करणें." ऐसें खानास सांगून सैन्यांत लांचलुचपत देऊन, मुत्सद्दी वजीर याजवळ शोध करून विचारलें. त्यांनी सागितलें कीं, "शिवाजी हरामजादा आहे यांसि युद्ध करिता सांपडणार नाहीं. याजकरितां राजकारण लावून भेटी घ्यावी. [ आणि ] भेटीचे समयीं धरावा, ऐसी खानांनीं तजवीज केली. [ आहे ]" म्हणून कळलियावरि दुसरे दिवशीं पंताजीपंत खानाकडे येऊन, राजियाकडे जातों म्हणून हुकुम मागितला. खानानें बहुमान करून राजाकडे पाठविले.

पंताजीपंत प्रतापगडास आले. राजाची भेट जाहली. ते समयीं पंताजीपंतास घरीं जावयास निरोप दिला. रात्रीं एकले पंताजीपंत भेटीस बोलविले राजे व पंत दोघे बैसून आण शपथ घालून, एकांतीं वर्तमान पुसिलें कीं, "यथार्थ करीणा सांगणें. खानाच्या मनांत कसें काय आहे हें सांगणें. आम्ही तुम्ही वेगळे नाहीं. आपलें राज्य संरक्षिलें म्हणजे सर्व कारभार तुम्हांस देतों. द्रव्यही बहुत देतों. आम्हांस वर्तमान यथार्थ सांगणें." ऐसें घरोबियांत घेऊन राजांनीं पुसिलें. तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, "खानाच्या मनांत दुष्ट बुद्धि आहे सल्ला करून, तुम्हांस भेटीस आणून, दगा करून, कैद करून, विजापुरास धरून न्यावे ऐसें आहे. जर तुम्हांस हिंमत असली तरि खानास नानाप्रकारें भेद करून जावलीस घेऊन येतों. तुम्हीं हिंमत धरून एकांतीं एकांगी करून मारणे आणि लष्कर सर्व लुटणें. राज्य सर्व आपलें करणें." ऐसा विचार सांगितला. [ तो ] राजाच्या मनांत आला. तेव्हां पंताजीपंतास पाच हजार होन बक्षीस दिले. आणि खानास सांगणें जे "राजा बहुत भितो वाइस भेटीस यावयास धीर पुरत नाहीं. खान वडील आहेत, मेहेरबानी करून जावलीस येऊन भेट देतात तरि आपण भेटीस येतों. आपण यास हातीं धरून, धीर भरंवसा देऊन, पादशहाचे मुलाजमतीस घेऊन जाऊन उर्जित करतील. तरि थोरपण आहे. ऐसे कित्येक मजकूर सांगून घेऊन येणें." म्हणोन विचार सांगोन पंताजीपंत यास रवाना केलें.

ते जाऊन वांईस खानास भेटले. करीणा जाहीर केला. "राजा कचदिल आहे. येथें भेटीस येतां शंका धरितो तुम्हींच तेथें जावलीस चलणें तेथें भेटीस येतील. दिलासा करून बराबर घेऊन जाणें." असें सांगितलें. त्यावरून खान बहुत खुशाल होऊन, कूच करून, जावलीस रडतोंडीचा घाट उतरून

आला. तो प्रतापगडाखालीं डेरे देऊन राहिले. आसपास चौगर्दी बारा हजार लष्कर व बंदुकी अराबियाच्या गाड्या, हत्ती, सुतारनाल्याच्या गाड्या, जागां जागां पाणी पाहून उतरले. पंताजीपंतास गडावरि राजियाकडे पाठविले. कीं, "भेटीस येणें."

त्याजवरून ते राजियासि जाऊन भेटले. लौकिक बोलणें जें बोलावयाचें तें बोलले. एकांतीं मागती सर्व वर्तमान सांगितलें कीं, "आपण बोलल्याप्रमाणें खानास घेऊन आलों. आतां तुमची त्यांची भेटी एकांतीं खांसे खांसे यांची करवितों. तुम्ही हुरीफी करून कार्यभाग करणें तो करावा." म्हणोन सांगितलें. भेटीस एक दिवस आड करून दुसरे दिवशीं भेटावें असें केलें. "राजे गडावरून उतरावे, खानांनीं गोटांतून पुढें यावें, उभयतांनीं दरम्यान डेरे देऊन खांसे खांसे भेटावें," ऐसा निवाद करून राजाचा निरोप घेऊन खानाजवळ गडाखालीं माचीस उतरून गेले. खानास वर्तमान सांगितलें. खानानेंही मान्य केलें.

मग दुसरे दिवशीं गडाखालीं राजियानीं सदर केली. डेरे बिछाने व असमानगिरी, तिवाशिया व मोतियाच्या झालरी लाविल्या चित्रविचित्र बाडें व लोडें, गाद्या, पडगाद्या टाकिल्या. सदर सिद्ध केली. घाटमाथा लष्कर [ सुद्धां ] नेताजी पालकर आणविले होते. त्यांसि इशारत सांगोन पाठविली कीं, "उद्यां खानाचे भेटीस जातों. फत्ते करितों, आणि गडावरि येतों. तेव्हां एकच आवाज गडावरि करितों. तेव्हां तुम्ही घाटाखालीं उतरोन लष्करांत खानाच्या चालेन येऊन मारामारी करणें." तसेच कोंकणांतून राजश्री मोरोपंत पेशवे आणविले. त्यासही गडावरील आवाजाची इशारत सांगितली. आपण निवडक लोक गडावरून उतरोन जागां जागां झाडींत ठेविले. आणि खांसा राजियांनीं जरीची कुडती घातली. डोईस मंदील बांधिला त्यांत तोडा बांधिला. पायांत चोळणा घालून कास कसली व हातांत एक बिचवा व वाघनख चढविलें आणि बराबर जिऊ महाला म्हणून मरदाना होता त्याजवळ एक पट्टा व एक फिरंग व ढाल. तैसाच संभाजी कावजी महालदाराजवळ पट्टा व फिरंग व ढाल ऐसे दोघे माणसें मर्दानी आपणा बराबरि भेटीस घेतली. वरकड आसपास धारकरी लोक जागां जागां जाळींत उभे

केले. आणि राजियानें स्नान करून भोजन केलें. सिद्ध होऊन गडाखालीं भेटीस जावयास उतरले.

गोटांतून भेटीस यावयास खानही सिद्ध होऊन चालले. बराबरि लष्कर हजार दीड हजार बंदुकी मुस्तेद होऊन चालिले. मोठे मोठे धारकरी लोक समागमें निघाले, चालिले, इतक्यांत पंताजीपंत पुढें होऊन अर्ज केला कीं, "इतका जमाव घेऊन गेलियानें राजा धास्त खाईल. माघारा गडावरि जाईल. भेटी होणार नाहीं. शिवाजी ह्मणजे काय? यास इतका सामान काय करावा? राजा दोघां माणसानिशीं तिकडोन येईल. तुम्ही इकडोन दोघांनिशीं चालावें. दोघे बैसोन भेटावें. तेथें तजवीज करणे ते करा." असें सांगितल्यावरि अवघा जमाव दूर बाणाचे टीपयावरि उभे राहून खासा खान एक पालखी, दोघे हुद्देकरी व कृष्णाजीपंत हेजीब असे पुढें चालिले. सैदबंडा म्हणोन पटाईत एक लष्करी समागमें घेतला. पंताजीपंतही बराबरि आहेत. असे सदरेंत गेले. सदर देखोन खान मनांत जळाला कीं, "शिवाजी ह्मणजे काय? शहाजीचा लेंक वजीर यास असा जरी बिछाना नाहीं! अशी मोतीलग सदर म्हणजे काय? पादशहास असा सामान नाहीं, येणें जातीचा त्यानें सामान मेळविला" असें बोलतांच पंताजीपंत बोलिला जे "पादशाई माल पादशहाचे घरीं जाईल, त्याची इतकी तजवीज काय?" असें बोलून सदरेत बैसले. राजियास सिताब आणवणें म्हणून जासूद हरकारे रवाना केले.

राजे गडाचे पायीं उभे होते. तेथून हळु हळु चालिले. समाचार घेतां खानाबरोबर सैदबंडा मोठा धारकरी आहे हें ऐकून, उभे राहिले. आणि पंताजीपंतास बोलावूं पाठविले ते आले त्यास म्हणूं लागले, जे "जैसे महाराज तैसे खान. आपण खानाचा भतीजा होय ते वडील. सैदबंडा खानाजवळ आहे त्याकरितां शंका वाटते. हा सैदबंडा इतका यांतून दूर पाठविणें," म्हणोन पंताजीपंतास सांगितलें. त्यावरून पंताजीपंत [ याणीं ] जाऊन कृष्णाजीपंताकडून खानास सांगोन सैदबंडाही दूर पाठविला. खान व दोघे हुद्देकरी राहिले. तेव्हां राजेही हिकडून जिऊ महाला व संभाजी कावजी दोघे हुद्देकरी [ यां ] सहित गेले. खानही उभा राहून, पुढें सामोरा येऊन राजियास भेटला. राजियानें भेटी देतां खानानें राजियाची मुंडी कवटाळून खांकेखालें धरिली. आणि हातीची जमदाड होती तिचें मेण

टाकून कुशीस राजियाचे चालविली. तो आंगांच जरीची कुडती होती त्यावरि खरखरली, आंगास लागली नाहीं. हें देखोन राजियांनीं डावे हाताचे वाघनख होतें, तो हात पोटां चालवला. खानानें आंगांत झगाच घातला होता. वाघनखाचा मारा करितांच खानाची चरबी बाहेर आली. दुसरा हात, उजवे हातचे बिचवियाचा मारा चालविला. ऐसे दोन वार करून, मुंडी आंसडून, चौथरियाखालें उडी घालोन निघोन गेले. खानानें गलबला केला कीं, "मारिलें! मारिलें! दगा दिधला! बेगी धांवा!" असें बोलतांच भोयांनीं पालखी आणिली आणि पालखींत घालून, उचलून चालविला. इतकियांत संभाजी कावजी महालदार याने भोयांचे पाय मारिले. आणि पालखीखाले भोयांस पाडिलें. खानाचे डोचकें कापिलें. हातीं घेऊन राजियाजवळ आला. इतक्यांत सैदबंडा पाटाईत धावला. त्यानें राजे जवळ केले. पटयाचे वार राजियावरि चालविले. तो राजियानें जिऊ महालियाजवळ आपला हुद्दियाचा पट्टा [होता तो] घेऊन, पट्टा व बिचवा असे कातर करून सैदबंडा याचे चार वार ओढिले. पांचवे हाताने राजियानें सैदबंडा मारावा तों इतकियांत जिऊ महाला याणें फिरंगेनें खांद्यावरि सैदबंडियासि वार केला. तो पट्टियाचा हात हत्यारा समेत तोडिला. आणि खानाचें शीर घेऊन राजे सिताब गडावरि जिऊ महाला व संभाजी कावजी महालदार असे गेले.

[पृ. ९-१७]

## २. राजियाचें देहावसान

कांहीं दिवसानी राजास व्यथा ज्वराची जाहली. राजा पुण्यश्लोक, कालज्ञान जाणे. विचार पाहतां आयुष्याची मर्यादा झाली असें कळून जवळील कारकून व हुजरे लोक होते. त्यांमध्यें सभ्य भले लोक बोलावून आणिले. मग त्यांस सांगितलें कीं, "आपली आयुष्याची अवधी झाली. आपण कैलासास श्रीचे दर्शनास जाणार. शरीर क्षीण देखून पन्हाळियावरि संभाजी राजे वडील पुत्र यांस सांगितलें कीं, तुम्ही दोघे पुत्र आपणास त्यांस राज्य वांटून देतों. आणि उभयतां सुखरूप राहणें. म्हणोन सांगितलें. परंतु वडील पुत्र संभाजी राजे यांनीं ऐकिलें नाहीं. शेवट आपला तो निदान समय दिसताहे. राज्य म्यां शिवाजीनें चाळीस हजार होनाचा पुणें महाल होता,

त्यावरि एक क्रोड होनांचें राज्य पैदा केलें. हे गड कोट व लष्कर पागा ऐसें मेळविलें. परंतु मज माघारें हें राज्य संरक्षण करणार ऐसा पुत्र दिसत नाहीं. कदाचित् धाकटा कुंवार राजाराम वांचला तर तो एक हें राज्य वृद्धीतें पाववील. संभाजी राजे वडील पुत्र जाणता आहे, परंतु बुद्धि फटकळ आहे. अल्पबुद्धि आहे. त्यास काय करावें ? आपण तो प्रयाण करतों. तुम्हीं कारकून व हुजरे मराठे कदीम या राज्यांतील आहां. तुम्हांस या गोष्टी कळल्या असाव्या. आपणा माघारें संभाजी राजे पराक्रमानें राज्य सर्व आटोपतील. लष्करही थोरला राजा संभाजी म्हणून त्याजकडे डौल देऊन मिळतील. राजाराम धाकटा म्हणून याजकडे लष्कर येणार नाहीं. सरकारकून राजारामाचा पक्षपात करून उभयतां बंधूंस राज्य वांटून दोन राज्यें करूं म्हणतील. शेवट लष्करचे मराठे कारकुनाचे विचारांत येणार नाहींत शेवट अवघे सरकारकुनांसि विश्वास देऊन धरतील. संभाजी राजे हे आपले वेळचे थोर थोर ब्राह्मण यांस मारील. ब्राह्मणहत्या करील. पुढें मराठे यांस लष्करचे सरदारांसही मारील, धरील, इजत घेईल. लहान माणसें, गुलाम, यांचा पगडा पडेल. आणि थोर लोकांची चाल मोडील. संभाजी कैफ खाईल, गांज्या ओढील. इषकबाजी करील. गडकोट देशामध्यें अनाइक होईल. राजा परामृष करणार नाहीं. द्रव्य खजीना सर्व उडवील. सर्व राज्य गमावील. संभाजीचे गुण ऐकून औरंगजेब दिल्लीहून चालून येईल. भागानगर विजापूर मोंगल घेईल. हें राज्यही घेतील. आणि संभाजी शेवट दगा खाईल. जे गति मलिक अंबर निजामशाहा त्याचा पुत्र फत्तेखान मलिका माघारा जाहला, आणि पातशाही बुडाविली, तैशीच संभाजी राजा करील. मग राजाराम राज्य करूं लागेल. तेव्हां गमाविलें राज्य साधील. मजपेक्षां पराक्रम विशेष करील. ही पुत्रांचीं लक्षणें. आतां कारकुनामध्यें माझे वेळचे थोरले कारकून यांस तो संभाजी वांचूं देणार नाहीं. त्यापैकीं एक प्रल्हादपंत निराजीपंताचे पुत्र व रामचंद्रपंत निळोपंताचे पुत्र हे दोघे ब्राह्मण पराक्रमी होतील. निळोपंत प्रधानाचा पुत्र हाही नांव धरील. या वेगळे कोणी होणार होतील. मराठ्यांमध्यें बहुतेक संभाजी मोडील. उरल्यापैकीं संताजी घोरपडे व बहिरजी घोरपडे व धनाजी जाधव हे जरि वांचले तरि हे तिघे मोठे पराक्रम करतील. मोडिलें राज्य हे तिघे ब्राह्मण व तिघे मराठे सांवरतील ” असें बोलले. येणें प्रमाणें राजे

बोलिले. सर्वांचे कंठ दाटून नेत्रांपासून उदक स्रवूं लागलें. परम दुःख झालें. त्या उपरि राजे बोलिले कीं, "तुम्ही चुकूर होऊं नका. हा तो मृत्युलोकच आहे. या मागें किती उत्पन्न झाले तितके गेले. आतां तुम्हीं निर्मळ सुखरूप बुद्धिनें असणें. आतां अवघे बाहेर बैसा. आपण श्रीचें स्मरण करतों." म्हणोन अवघियांस बाहेर बसविलें. आणि राजियांनी श्री भागीरथींचें उदक आणून स्नान केलें. भस्म धारण करून रुद्राक्ष धारण केले. आणि योगाभ्यास करून आत्मा ब्रह्मांडास नेऊन दशद्वारें फोडून प्राणप्रयाण केलें. शालिवाहन शके १६०२ रौद्रनाम संवत्सरे चैत्र शुद्ध १५ रविवारीं दोन प्रहरीं काळ रायगडीं झाला. त्या नंतर शिवदूत विमान घेऊन आले. आणि विमानीं बैसून कैलासास गेले. हें जड शरीर मृत्युलोकीं त्याग केला.

राजियाचें देहावसान झालें. ते दिवशीं पृथ्वीकंप जाहला. गगनीं धूमकेत उदेला. उल्कापात आकाशाहून झाला. रात्रीं जोड इंद्रधनुष्यें निघालीं. अष्टदिशा दिग्दाह होऊन गेल्या. श्री शंभुमहादेवीं तळ्याचें उदक रक्तांबर झालें. पाण्यांतील मत्स्य बाहेर पडून अमासवणी [?] उदक जहालें. ऐशीं अरिष्टें जाहली. मग राजियाचे कलेवर चंदनकाष्टें व बेलकाष्टें आणून दग्ध केलें. स्त्रिया राजपत्न्या कारकून व हुजरे सर्व लोकांनीं सांगितलें कीं, धाकटा पुत्र राजाराम यांनीं क्रिया करावी. सर्वांनी खेद केला. राजाराम यांनीं अत्यंत शोक केला. त्या नंतर उत्तरकार्य कनिष्ठांनीं करावें असें सिद्ध केलें. वडील पुत्र संभाजी राजे वेळेस नाहींत. याजकारितां धाकट्यानीं क्रिया केली. ऐसें राजियांचे चरित्र आख्यान उत्पन्न काळापासून देहावसानापर्यंत जहालें.

राजा साक्षात् केवळ अवतारीच जन्मास येऊन पराक्रम केला. नर्मदापासून रामेश्वरपर्यंत द्वाही फिरली. देश काबीज केला. अदलशाई, कुतुबशाई, निजामशाई, मोंगलाई ह्या चारी पातशाहा व समुद्रांतील बेवीस पातशाहा असे जेर जप्त करून नवेंच राज्य साधून मराठा पातशाहा सिंहासनाधीश छत्रपति जाहला. प्रतिइच्छा मरण पावून कैलासास गेला. ये जातीचा कोणी मागें जहाला नाहीं. पुढेंही होणार नाहीं. असें वर्तमान महाराजांचें जहालें. कळलें पाहिजे.

चरित्र पुण्यश्लोक राजियाचे जे घरी लिहून ठेवतील त्याच्या भाग्यास पारावार नाहीं. व जे वाचतील त्यांस मोठें पुण्य जोडेल. निपुत्रियास पुत्र होतील व दरिद्रि यांस लक्ष्मीवंत होतील. व अपेशी यांस यशवंत होतील. व पुण्यश्लोक पराक्रमी होतील. जे पुत्रवंत असतील त्यांसही पुत्र होतील. जे लक्ष्मीवंत असतील ते विशेष भाग्यवंत होतील. यशस्वी असतील ते दिग्विजयी होतील. येणेंप्रमाणें सर्व मनोरथ पूर्ण होतील. बरें समजणें. ही बखर संपूर्ण जाहली.

[पृ. ८२-८४]

---

## क्रमांक ४ : : आज्ञापत्र

### मराठ्यांचें आरमार

आरमार म्हणजे स्वतंत्र एक राज्यांगच आहे. जसें ज्यास अश्वबल तसी त्याची वृद्धीप्रथा आहे, तद्वतच ज्याजवळ आरमार त्याचा समुद्र. याकरितां आरमार अवश्यमेव करावें. चालीच्या गुराबा[1] बहुत थोर ना बहुत लहान, ऐशिया मध्यरीतीनें सजाव्या. तशींच गलबतें करावीं. थोर बहुत वारसे जागांत जे वाऱ्याविणें प्रयोजनाचेंच नव्हे असें करावयाचें प्रयोजन नाहीं. कदाचित् एक दोन सलाबतीमुळें केलें तरी जें आरमार करावें त्यावर मर्दानी मारक माणूस, भांडीं, जंबुरे, बंदुका, दारूगोळी, होके आदिकरून आरमारी प्रयोजनी सामान यथेष्ट बरें सदुतें[2] करावें. त्याचे प्रत्येक प्रत्येक सुभे करावे. दरै सुभ्यास पांच गुराबा, पंधरा गलबतें करून द्यावीं. इतकियासीं एक सरसुभा करावा, त्याचे आज्ञेंत सर्वांनीं वर्तावें. आरमारास तनखा मुलखांत नेमून द्यावा. पैदास्तीवरील नेमणुकीमुळें साहुकारांस उपद्रव होऊन साहुकारी

१. तारू. २. सिद्ध.

बुडेल. बंदरें राहिलीं पाहिजेत. प्रयोजनिक वस्तु परस्थळींतून आणावी तेव्हां येत्ये. असें जाहलियामध्यें राज्याचा भ्रम काय उरला? तसेंच जकाती आदिकरून हांशीलही बुडालें. लुटीमुळें गोरगरिबांचा सत्यानाश होऊन अपरिमित पापही वाढलें. आरमारकरीही बे-लगाम होऊन मनःपूत वर्तो लागले, तरी नेहमीं तनखा मुलखांतून देणें घडतें, तरी इतका अनर्गल प्रसंग न होता. कदाचित् आरमारास सारा नेहमीं तनखा कैसा अनकूल पडतो म्हणावें तरी जितका अनकूल पडेल तितकेंच आरमार सजावें. साहुकारी वाढवावी. साहुकारीमुळें जकातीचेंच हांशील होईल. तितकियावरी कितेक आरमार करूं नये. या रीतीनें आरमार सजीत सजीत सजावें. आरमारकरी यांणीं हमेषा दर्यांत फिरून गनीम राखावा. जंजिरियाची सीमा जवादा[1] वरीचेवरी पावीत जावा. येविषयीं जंजिरेकरी बोभाट हुजूर येऊं न द्यावा. सर्वकाळ दर्यावर्दी गनिमाचे खबरेंत राहून गनीमाचा मुलूख मारावा. हवी पाळती घालून गनिमाचे स्थळाचे लाग करावे. दर्यांत कोळी साहुकारी तरांडीं यांची अमदरफ्ती[2] करावी. कोळी साहुकारांचे वाटेस जाऊं नये. त्यांस कोणाचे उपद्रव लागत असेल तरी तो परिहार करावा. गनीमाचे मुलुखाखेरीज विदेशींचे गैरकौली[3] असे साहुकारांचीं तरांडीं येतां जातां असलीं, तरी तीं परभारें जाऊं न द्यावीं. नयेंभयें हाताखालीं घालून, त्यांचे दसोडीस[4] हात न लावतां, दिलासा करून बंदरास घेऊन यावीं. बहुत प्रकारें त्यांणीं व मुलूखगिरीचे कारभारी यांणीं जाऊन त्यांचें समाधान करावें. लांकडें पाणी घेतील तें घेऊं द्यावें. नारळांचीं शाळीं आदिकरून जो त्यांस पाहिजे जिन्नस असेल तो त्यांस विकत अनुकूल करून द्यावा. याविरहित आणखी खरेदी प्रोक्त आत्मसंतोषें करितील तो अल्पस्वल्प जकात घेऊन सुखरूप करूं द्यावा. थोर मनुष्य साहुकार कोणी असला तरी त्याचे योग्यतेनुरूप दिवाणचे तर्फेनें त्याची थोडीबहुत मेहमानी करावी. तो खर्च दिवाणांतून मजुरा घ्यावा. कोणी एका प्रकारें त्या परकी साहुकारास सौख्य दिसे, माया लागे, तें राज्य अमदरफ्ती करीत, असें करावें. गनीमाचे मुलुखांतील साहुकारी

१. बंदोबस्त. २. दळणवळणांचें संरक्षण. ३. बिनपरवाना. ४. क्षुद्र वस्तूसही.

तरांडीं दर्यांत असलिया कस्त[1] करून घ्यावीं, धरून बंदरांस आणावीं. मालांत काडीइतकी तसनस[2] न करितां तमाम माल जप्त करून महालचे कारकुनांनीं व आरमारकरी यांणीं हुजूर लिहून पाठवावें; आज्ञा होईल तशी वर्तणूक करावी. आरमारास गनीमास गांठ पडोन झुंज मांडलें तरी सर्वांनीं कस्त करून एक जमावें. गलीम दमानी[3] घालवून झुंजावें. वारियाचे बळें गनीम दमानी नयेत, आपण दमानी पडलों, आपलें गलबत वारियावरी न चालेल असें जाहलें, तरी कसेंही आपलें बळ असो तरी गनीमास गांठ न घालितां, गांठ तोडीत तोडीत आपले जंजिरियाचे आश्रयास यावें. तरांडियांस वं लोकांस सर्वथा दगा होऊं देऊं नये, आपणांस राखून गनीम घ्यावा. गनीम दमानी पडोन हारीस आला, जेर जाहला, तरी एकाएकीं उडी घालूं नये. दुरूनच चौगीर्द[4] घेरून भांडियांचा मार देत असावें. दगेखोर गलीम आपण जेर झालों असें जाणून दगाबाजीनें कौल घेतो, म्हणून जवळ बोलावूं नये. आपल्या अथवा जवळ बोलाविल्याच्या पायाळास आगी टाकून तरांडें जायां करितो. याकरितां त्याचा विश्वास न मानितां कौलास आला तरी दुरूनच कौल देऊन त्याचेच बतेल्यावरून सरदार लोक आपणाजवळ आणावे. मग त्याच्या तरांडियावरी आपलें लोक चढवावे. नाहीं तरी मालबिसातीची तमा न धरितां भांडियांचे माराखालीं तरांडें फोडून टाकून सलाबत पाडावी. आरामाराची छावणी करणें, दर्यास तुफान होणार तों आठपंधरा दिवस अगोदर करावी. तेही प्रतिवर्षीं एकाच बंदरीं अथवा हरएक जंजिऱ्याखालीं किंवा उघड्यामार्नीं सर्वथा न करावी. प्रतिवर्षीं एक्याच बंदरीं छावणी केलियानें, आरमाराचे लोक वारंवार ताकीद केली तरी कांहींएक मुलखास उपसर्ग थोरच आहे तो एकाचे मुलखास होणार, तो होऊं न द्यावा. उघड्यामार्नीं आरमाराची छावणी केली तरी छावणी कारणें आरमार घड्यावरी वाढावा लागतो. वरती छावणी, तशामध्यें दगेखोर गनीम, चोरी छपीनें तात्काळ आगीचा दगा करणार, असेंही होऊं न द्यावें. केवळ किल्ल्याचे बंदरांत छावणी करावी, तरी आरमारचे मनुष्य बहुत, प्रायशः अविंध आणि उन्मत्त, एखादे बोलीचालीमुळें कचकलागत होऊन लोक जायां होणार.

---

१. पराकाष्ठा. २. विध्वंस ३. वाऱ्या समोरची बाजू. ४. चहूंकडून.

कदाचित् परस्परें संकेतस्थळांत फितवाही होऊ सके, हें बरें नव्हे. याकरितां आरमारची छावणी करणें तें प्रतिवर्षी नूतन बंदरीं, ज्या बंदरास मोहरी किल्ला, किल्ल्याचे दहशतीनें गनीम खाडींत शिरों न शके, अथवा खाडीस खाडींत आरमाराची छावणी करावी. तेंही सारें आरमार एकाच जागीं न ठेवावें. जागां जागां छावणी ठेवावी. रात्रौ खाडींतील घस्त, खुष्कीची घस्त आरमारासभोंवतीं करवीत जावी. सुभेदारानें आपला कबिला देखील दोन महिने त्या जागां राहून आरमारची ताबिनार्ती[1] करावी. जें लागेल सामान ते विषयी हुजूर लिहून विले[2] करून घ्यावी. मुलखांत अवाढावी[3] सर्वथा होऊं न द्यावी. आरमारास तक्ते, सोंट,[4] डोलाच्या काठ्या आदिकरून थोर लांकडें असावीं लागतात. आपले राज्यांत अरण्यांत सागवानादि वृक्ष आहेत त्यांचें जें अनुकूल पडेल तें हुजूरचे परवानगीनें तोडून न्यावें. याविरहित जें लागेल तें परमुलखींहून खरेदी करून आणवीत जावें. स्वराज्यांतील आंबे फणस आदिकरून हेही लांकडें आरमाराच्या प्रयोजनाचीं, परंतु त्यांस हात लावूं देऊं नये. काय म्हणोन कीं, हीं झाडें वर्षां दोन वर्षांनीं होतात असें नाहीं. रयतांनीं हीं झाडें लावून लेंकरांसारखीं बहुत काळ जतन करून वाढविलीं. तीं झाडें तोडिल्यावर त्यांचे दुःखास पारावार काय? एकास दुःख देऊन जें कार्य करीन म्हणेल तें कार्य करणारास हित स्वल्पकाळचें बुडोन नाहींसेंच होतें; किंबहुना धनियाचे पदरीं प्रजापीडण्याचा दोष पडतो. या वृक्षांच्या अभावें हानिही होत्ये. याकरितां हे गोष्टी सर्वथैव होऊं न द्यावी. कदाचित् एखादें जें झाड बहुत जीर्ण होऊन कामांतून गेलें असलें तरी त्याचे धन्यास राजी करून घेऊन द्रव्य देऊन त्याचे संतोषें तोडून न्यावें. बलात्कार सर्वथैव न करावा. याप्रमाणें हुजुरात, गड, किल्ले आदिकरून परम सावधतेनें वर्तत, मातुश्रीसाहेबांचे सेवेशीं कोणेंही अर्थे अंतर न पडे, तुम्हीं केले सेवेचा मुजरा होय आणि या दिग्भरीत यशास तुम्हीं पात्र होऊन स्वामींनीं जो तुम्हांवर संपूर्ण अखत्यार दिला आहे, आणि स्वामींची अनुपम्य दया तुम्हांवरी आहे, ती दिनप्रतिदिनीं अभिवृद्धीस पावे ती गोष्ट करणें. तो योजिला संपूर्ण उद्योग सिद्धीस पावून सत्वरच स्वामींचें आगमन त्या प्रांतीं

१. व्यवस्था. २. मागणी. ३. बेबंदशाही. ४. न कापलेले बुंधे.

होत आहे तदोत्तरीं तुमच्या विचारें आणखीही कितीएक नाजूक धंद्याचें नियम जे परंपरेनें राज्याभिवृद्धीस उपयुक्त आणि इहलोक परलोक साधन, ज्यांस संपूर्ण कीर्ति, ते सर्वही यथान्यायें करून दिले जातील.

---

## क्रमांक ५ : : पाणिपतची बखर

### १. कलियुगींचें भारत

पहांटेची दोन तास रात्र उरली तेव्हां सरकारी साहेबनौबत लढाई-प्रसंगाची करून नकीबांस ताकीद करावयास सांगितली. नकीबांनीं सर्व लष्करांत फिरून ताकीद केली. प्रातःकाल होतांच तमाम फौजेसुद्धां सरदार शिलेपोस तयार होऊन आले. एकापरीस एक, भीमार्जुनासारिखे महावीर, दर रिकीबीस तरवार गाजविणारे, अंगीं वीरश्रीचीं वारीं, रणांगणाचा शृंगार करून, घुग्या व बखतरें व टोप, चिलखतें, बिन्या व बिरजे व वस्त्रें तकटी व मुक्तमाला व मस्तकीं तुरे व कलग्या व अंगींचे बारा अलंकार व जरीचे अबदागिरें करून शोभायमान, हातीं पट्टे व गरगुज व फिरंगाणा व बिचवे व कटारा व पेशकब्जे व वाघनखें व भाले व कोयते व परीघ व पट्टीश व फरश व गारमांडीं व सांगा व बरच्या व बंदुका कटीतटीस शस्त्रसंभार बांधून आपआपलाले वाहनारुढ होऊन, अंगीं स्फुरणें अतिशय, युद्धास जावयास अति उदित, स्वामिसेवेशीं तत्पर, अशा आवेशाचे पुरुष हाजारों हजार सिद्ध झाले. अनसूट, नव्या उमेदीचे, शिपाईगीरीची शर्थ व्हावी म्हणून उमेदवारीनें बिरदे बांधून, शिरीं समले सोडून, घोड्यास जडावाचे अलंकार करून, एकाहून एक आगळे, जीवित्वास तृणप्राय मानणारे असे शहाण्णव कुळींचे मराठे घोड्यास नटनागर, जरीबादली पाखरा व शिऱ्या व सडका व पायीं तोडर बांधून घोड्यांस थापटून उभे राहिले. तसेच हवदे व अंबाऱ्या व नवरत्नांच्या मुक्ताभरणी झालरा याप्रमाणें गजभार सिद्ध जाहले. जुंबरे व ऱ्हेकले व जेजाला व सुतारनाले व थोरलीं भांडीं येकूण आवाज

दीड हजार, याप्रमाणें आराबा पसरून व बाणांच्या कैंच्या उंटांवर लादून, बाण लावणारे सहवर्तमान एकदांच सकल समुदायानिशीं सिंहनादें गर्जना करून रणास जावयास निघाले.

नंतर सैन्याचे चार भाग करून दक्षिणचे बाजूस खांसे विश्वासराव साहेब वीस हजार एकांड्यांनिशीं, त्यांचे डावे बाजूस मल्हारराव होळकर पन्नास हजार फौजेनिशीं, पूर्वेस भाऊसाहेब साठ हजार फौजेनिशीं, व पश्चिम दिशेस जनकोजी शिंदे पन्नास हजार फौजेनिशीं, व उत्तरचे बाजूस तोफखाना साठ हजार पायदळासहित इभ्राईमखान गारदी याजकडील लोकांनीं मस्तकावर ढाला घेऊन, नग्न हत्यारें करून, सावधतेनें, जुम्मस न खातां, मांडीस मांडी देऊन, एक घोडा राऊत न मिसळे अशा बेतानें निशाणांचे फरारे सोडून उभे राहिले.

इराणी दुराणी व हस्तनापुरवासी व दिल्लीपत बादशहा यांनीं फौजेच्या चार टोळया केल्या. एक्या टोळीस खांसे अबदअल्ली पन्नास हजार फौजेनिशीं व दुसरे टोळींत सुजातदवले पन्नास हजार फौजेनिशीं व तिसरे टोळींत मनसूरअल्ली तीस हजार फौजेनिशीं, मध्यभागीं मुख्य इराणी पाऊण लक्ष फौजेनिशीं, याप्रमाणें आपआपले सरदारांस व पायदळांचे जमातदारांस निक्षूण ताकिदी रणप्रसंगाच्या होऊन बेलाशक चालून घेतलें. तोफखान्यावर जाऊन पडले. एक रंजकेंची सरबत्ती होतांच दोहोदळांत धुंधःकार होऊन एकमेकांस दिसेनासें जहालें. धुरानें दिवाकर अगदींच आच्छादित जहाला. आपपर कोणी ओळखेनासें जहाले. दोन प्रहरपर्यंत एकसारिखा तोफखाना उभयतांकडील सुरू होता. धूर निवारण होतांच पाहूं लागले तों अमित्राकडील पठाण वीस हजार कामास आले, व सदाशिवपंत भाऊंकडील लोक पायदळ घोडेस्वार अजमासें वीस पंचवीस हजार कामास आले. श्रीमंत विश्वासराव साहेब व सदाशिवपंत भाऊ व मल्हारजी होळकर व जनकोजी शिंदे व यशवंतराव पवार व अंताजी माणकेश्वर व अप्पाजी जाधवराव व विठ्ठल शिवदेव विंचूरकर, समशेरबहादूर वगैरे धारकरी व हुजरातीचे लोकांनीं व एकांड्यांनीं एकदांच सर्वांनीं श्री जाश्वनीळाचें स्मरण करून व शाहू महाराज छत्रपति यांचें नांव घेऊन, हरहर महादेव !! ही गर्जना करून घोडे घातले. इराणी दुराणी व अबदल्ली व सुजादौला व मनसूरअल्ली व अबदल्ली नादरशहाचे बेटे व दिल्लीपद बादशहा-

कडील खांसे खांसे बादशहाजादे व राठोड, रांगडे व रजपूत व मेवाती व हस्तनापूरवासी यांणीं "या अल्ला! खुदा या रहिमान रहिम!" याचा उच्चार करून एकदांच नीट कमरग्यांत शिरले. तेव्हां तीस हजार फौजेनिशीं जनकोजी शिंदे व समशेर बहादूर यांनीं त्यांजकडील सर्व फौज पोटीं घालून घोडे घातले. तेथें मोठी झोटधरणी होऊन वरकड हत्यारांची लढाई व तिरंगाजी ही राहिली. लढाईची हातघाई झाली. भाला व बिचवे व गुरगुरजे व जमदाडा व वाघनखें यांचे चपेटे फार झाले. एकमेकांच्या गळयांस मिठ्या मारून पुढचे पाय पुढें टाकूं लागले. कोणी मागें फिरेना. सक्रोध होऊन, अवसानें धरून एकमेकांवर पर्जन्यप्राय कोसळूं लागले. मल्लयुद्धाचें मारणेंच कडोविकडीचें परस्परें दाखवूं लागले. या युद्धांत वांचून पुनः दक्षणेंत जाऊन संसार करावा ही अरुता कोणीं ठेविली नाहीं. कोणी महाकाल, कोणी कृतान्त असे भासले. कितीकांस मूर्च्छना येऊन रणभूमीस निचेष्ठित पडले. कितीकांचीं शरीरें त्या गर्दीच्या रंवदळींत चिरडून गेलीं. कितीकांचे हात पाय तुटून नुसते कोथळे रणांत राहिले. कितीक वीर भंबाळ होऊन भयंकर दिसूं लागले. कितीक वीरांच्या पाठींतून भाला हृदयापार होऊन आपआपले पुण्यानें कोणी विष्णुलोकास गेले, कोणी कैलासास गेले, कोणी सत्यलोकास गेले, कोणी इंद्रलोकास गेले. याप्रमाणें दुसरी लढाई सात तासपर्यंत झाली. मोठे मोठे सरदारांहीं व शिपायांनीं लढाईची शर्त केली. रक्तोदकें भूलिंगास अभिषेक झाला आणि शिरकमलें हींच भूलिंगास कमलें अर्पण जाहलीं. मल्हारराव रामचंद्र त्या रणांत आक्रंदत पडले होते. तें दुःख त्यांचे चिरंजीव गणपतराव मल्हार यांणीं डोळयांनीं पाहून, आपले पित्यास पुरे करून, आपण आपला शिरच्छेद करावयास उदित झाले. ते समयीं सदाशिवपंतांनीं पाहून सगद्गद होऊन उत्तर केले कीं, "आत्महत्या करूं नये. उदईक सर्व आपण इंद्रसभेस जाऊं." असें म्हणून राहविलें. सदाशिवपंतांकडील व शत्रूकडील एकंदर माणूस पस्तीस हजार ठार पडलें. दहा बारा हजार घोडा मोकाट फिरूं लागला! मदोन्मत्त हत्ती पाउणशें रणप्रसंगीं पडले. इराणी दुराणी वगैरे शत्रूकडील उंट नफर दोन हजार कारखान्याचे जायां झाले. याप्रमाणें संग्राम महाधुरंधर जाला. या युद्धांत बळवंतराव गणपतराव मेहेंदळे यांजवर वार पडला. त्यांचे मुर्दावर मोठी गर्दी गुजरली. ते सदाशिवपंतभाऊनीं पाहून, घोड्याखालीं उडी टाकून,

दोहों हातीं पट्टे चढवून, जिवाची तमा न धरितां धीट होऊन नीट फौजेंत चालून घेतलें. कत्तल करीत चालले. ते समयीं जनकोजी शिंदे व त्र्यंबकराव मार्तंड व सदाशिवपंत पुरंधरे व महिपतराव चिटणीस व विठ्ठल शिवदेव व फकीर महंमद व फिरंगोजी पवार व राणोजी जाधवराव, आपाजी जाधवराव व धर्माजी पासिलकर व संताजी आठोळे व नरसोजी खैरात व हैबतराव सालसकर व सयाजी पायघुडे व नरसाजी बिरजे व गुणाजी भापकर व लिंगोजी केशव सदाशिव आप्पाजी व जानमहंमद व भागोजी डफळे व इंद्रोजी रसगळ व रस्तुमराव पांढरे व इंद्राजी कदम व बळवंतराव सासवडकर या सर्वांनीं घोड्याखालीं उड्या टाकून पाय उतारा झाले. मागें पुढें पाहिलेंच नाहीं. तेथें मारामारी कांहीं सामान्य झाली नाहीं. ते समयीं स्वर्गी इंद्रलोकींचे इंद्र सुद्धां सुरगण विमानांत बसून अंतराळीं पाहावयास आले. धन्य त्या वीरश्री वैभवाची! बळवंतराव यांचा मुर्दा बळजोरीनें सदाशिवपंतांनीं आपले जमातींत आणिला. मर्दुमकीचा वहमा इराणीचा जिरला. त्या सपाट्यांत सदाशिवपंत भाऊंकडील व इराणीकडील व दिल्लीपत बादशहाकडील व सुजातदौले व मनसूर अल्ली व हस्तनापूरवासी यांजकडील खासा खासा मोहोरा एका ताटांतील जेवणारा साडेसातशें कामास आला. यांणीं इराणी दुराणीचा मोहोरम केला. वीरांच्या मर्दुमीचा कळस जाहला! एवढी लढाई जाहली परंतु कांहीं तफावत पडली नाहीं! याजकरितां इराणी दुराणी अंतरीं दिलगीर होऊन म्हणूं लागले कीं, "दखनी मराठे लोक बडे हरामजादे! तरवारीस आपणास ऐकत नाहींत. बादशाही लियाबिगर हं बी पीछे जानेके नही. सब सलतनत समेत हक्क होना ये अच्छा." असें म्हणोन फिरून चालू येण्याची उमेद धरावी तों एवढ्यांत सदाशिवपंतांनीं कुतरतोड करून सर्व शत्रूंस आपल्या लष्करांत शर्तबेशर्त करून दामटून घातलें.

इकडे सदाशिवपंत आपल्या लष्करांत जाऊन नामी नामी धारकरी व सरदार व पाग व पतके व गाड्यांतील जमातदार पडले होते ते रणांतून शोधून काढून कोणास पुरविलें, व कोणास अग्नि-डाग दिले, व ज्यांची ओळख पुरली नाहीं असे जे सरदार चाकरमाने होते त्यांस एकेक्या गर्तेंत शेंपन्नास व शेंदोनशें घालून त्यांचा बुजविल्या. ब्राह्मण मंडळीस शेले दीड हजार कफनास लागले. या कलियुगीं दुसरें प्रत्यक्ष भारती युद्ध झालें. इराणी दुराणी व दिल्लीपत

बादशाह वगैरे यांजकडील व सदाशिवपंत भाऊंकडील लोकांविषयीं व घोडे-स्वारांविषयीं व तोफखान्यांविषयीं व पायदळाविषयींची बहुत खराबी जाहली ती लिहितां पुरवत नाहीं. पेशवे बहादूर यांजकडील थोर थोर सरदार व मानकरी व एकाण्डे व धारकरी व हुजरातींतील लोक पडले, त्यांची नांवनिशी मात्र लिहिली. इराणी दुराणी दिल्लीपत बादशहा वगैरे यांजकडील लोक पडले त्यांची नांवनिशी ल्याहावी तर या कलियुगीं दुसरें भारत होईल, याकरितां श्रीमंतांकडील लोक लिहिले गेले त्यांची नांवनिशी तपसीलवार अशी कीं:—

१ बळवंतराव गणपत.
१ गंगाधर नारायण.
१ बाळाजी भोईर.
१ नारायणसिंग रेडे.
१ शिवराव अंबीकर.
१ अमृतराव चवळे.
१ जयाजी भालेकर.
१ दयाळ सिंग.
१ सिधोजी भोंसले रुजू शेवळे.
१ तुकाजी गाढवे.
१ सयाजी थोरात.
१ हणमंतराव शितोळे.
१ हरंजी रणदिवे.
१ हणमंतराव मोचले.
१ पदाजी मोहिते.
१ लक्ष्मणराव मानगिरे.
१ रहिमान गोरी.
१ नरसिंगराव चोपडे.
१ भिकाजी रासळे.
१ भिवराव पवार.

१ कृष्णाजी मोरे.
१ चिमणाजी वाळके.
१ लखमाजी गोडे.
१ सिदोजी घारघे.
१ मल्हारराव कोतकर.
१ बहिरराम रजपूत.
१ मानाजी रणदिवे.
१ गिरजोजी देवळे.
१ आनंदराव माने.
१ मलकोजी माने.
१ लखमाजी सांवत.
१ जावजी दमेकर.
१ बयाजी शिरके.
१ गंगाजी दाभाडे.
१ रामराव साटम.
१ येशवंतराव वाघ.
१ सिदोजी थोरात.
१ कर्णोजी पाळेकर.
१ हटेसिंग.
१ शंकराजी कांटे.
१ संताजी वाघ.

१ सोनजी सिरके.
१ नारो हरी.
१ समजाजी वागवे.
१ मोराजी पडवळ.
१ अमृतराव मोरे.
१ निळकंठराव माने.
१ रामराव राणे.
१ यमाजी शिरोळे.
१ भुजावरसिंग.
१ धोंडजी पवार.
१ शिवजी शेलके.
१ पिलाजी नवरे.
१ दुल्लभजी पालेकर.
१ मानाजी रणनवरे.
१ अप्पाजी जिरगे.
१ रामराव काळे.
१ यमाजी राजेगिर.
१ लखमाजी गाजरे.
१ सयाजी माने.
१ रामराव माने.
१ तुकाजी थोरात.

| | | |
|---|---|---|
| १ भिकाजी नळवडे. | १ रामराव शिरके. | १ बापुजी काटेकर. |
| १ कृष्णाजी विष्णू. | १ शिवराव कडु. | १ सयाजी गुजर. |
| १ कमाजी सुरवे. | १ रामराव घुगरे | १ लिंगोजी थोरात. |

## २. भाऊ कल्पांतींचा आदित्य भासला

तेव्हां युद्धास तोंड लागलें, दारूण संग्राम झाला. हवद्यांस हवदे, राउतांस राऊत, एक मेळ जहाला. व सुतरनाले बाणाच्या कैंच्या व करोलाच्या गोळ्या व गरनाला व तोफांचा मार एकदांच जहाला. एकच रणधुमाळी दोन्ही सैन्यांत माजली. धुरेंकरून दिनमणीचा अस्त झाला असा भास पडला. घे घे हीच गर्जना उठली. उमास घ्यावयास अवकाश पडेना. पुढचा पाय पुढें. कोणास कोणी हरेना. एका परीस एक आगळे. इराणीची जात अरबुज, आपपर म्हणावयाची नाहीं. महाबली, महा पराक्रमी, मोगल, पठाण व रोहिले, रांगडे व रजपूत व पंजाबी, बिलंदे, माळवी व काठेवाडी वगैरे नाना जातीचे त्यांनीं संग्रामाची सीमा केली. बहुत मराठे दळ खपलें. रक्तोदकाचे पाट रणभूमीस वाहूं लागले. बिभित्स शरीरें दिसों लागलीं. देहाभिमान कोणांत उरला नाहीं. चौफेर लढाईची बेहद्द होऊन गेली. थोर थोर अमिरांचे हौदे खालीं जहाले. इराणी हांवभरी होऊन फिरून नीट फौजेंत चालून घेतलें. तेव्हां मराठी फौज कच खाऊन माघारी सरली.

तें पहातांच भाऊसाहेबांनीं फौजे सुद्धां आपला अंबारीचा हत्ती फौजेंत लोटला. तेव्हां डावी टोळी विश्वासराव साहेबांची होती, ती बेजरब उठली. उजवेकडून जनकोजी शिंदे कमरग्यांत शिरून मोठी मारामार जहाली. शरसंधान अगदींच राहिलें. निमचे व समसेरा चालूं लागल्या. तीन चार तास पर्यंत एकच घाई शस्त्रसंधानाची झाली. मुर्दावर मुर्दे पडूं लागले. वीरांच्या नजरा फिरोन गेल्या. आपपर कोणी ओळखेनासे जाहले. वीर रणांमध्यें माजले. रणमद चढला. खांशा खांशांचे हौदे एकास एक लागून जोरावारीनें लढों लागले. केवळ दशाग्नी शताग्नीशीं मारूं लागले. ते समयीं सदाशिवपंत [ यांणीं ] अंबारींतून उतरून, दोहों हातीं पट्टे घेऊन, नीट फौजेंत चालून घेतलें. तेव्हां नामी नामी सरदार व धारकरी नांवाबिनांवाचे यांणीं जीवित्वाची तमा न धरतां बेलाशक हैदोसच केला. कोणास क्षतें वर्मीं लागलीं,

ते विष्णुलोकास गेले. व कोणीं रणांगणीं मुर्च्छित पडले. व कोणांचीं शिरें तुटोन घडांवेगळीं झालीं. व कोणाचीं उदरें फुटोन अंतरमाळा लोंबूं लागल्या. परंतु अणुमात्र कोणीं लढाई विषयीं कसर केली नाहीं. एकच गर्दी होऊन गेली. खांसे विश्वासराव साहेब अगदींच गर्दींत गर्द होऊन गेले. तेव्हां सदाशिवपंत पाय उतारा होते ते घोड्यावर स्वार होऊन सैन्यांत मिसळले. मोठी तरवार करून विश्वासराव साहेब अंबारी सुद्धां संभाळून माघारे आपले जमातींत पाठविले. परंतु कायम आहेत किंवा वैकुंठवासी जहाले याचें वर्तमान पुरतेपणें लागलें नाहीं. आपण तसेच पुढें चालून गेले. तेथें नामी नामी लोक दोन हजार ठार पडले. इराणीनें नामोहरम होऊन पाठ दिली.

त्या युद्धात इकडील व तिकडील एकंदर चाळीस हजार लोक कामास आले. खेरीज केवळ जखमी लोक दहा हजार. याप्रमाणें युद्ध जहालें. या मागें या कलियुगीं असा य[illegible]ा कोणीं जहाला नाहीं. पुढें ही होणें जरूर. भारती युद्धा समान सदाशिवपंतांनीं युद्ध केलें. या कलयुगीं मानव कृतींत ब्राह्मण कुळांत जन्म घेऊन पराक्रम थोर केला. धन्य त्यांची जननी कीं, असा पुत्र प्रसवली! येणें करून सप्त पुरुष उद्धरून विष्णुलोकास गेले. धन्य त्या पुरुषाचा पिता! त्यास साम्यता दशरथाची, किंवा पंडूची! चिमाजी आप्पाची धन्य कीं, हा पुत्र रामाप्रमाणें निर्माण जहाला. हें युद्ध पाहून स्वर्गीं इंद्र व देवगण व गंधर्व स्तुति करूं लागले कीं मानवी होऊन, जातीचा विप्र असतां, प्रताप कर्णाप्रमाणें केला!! केवळ राम रावण यांच्या युद्धा समान युद्ध झालें. इराणीकडील लोक तीस सहस्र कामास आले व आठ हजार जखमी जहाले. शिवाय घोडीं वीस हजार, उंटें सातशें व हत्ती दोनशें येणें प्रमाणें अमित्राकडील तळावर राहिले. भाऊसाहेबाकडील नामी सरदार व धारकरी, एकाण्डे हुजरातीचे लोक वीस हजार ठार पडले. शिवाय उंटें पांचशें व घोडे पंधरा हजार व हत्ती नग सव्वाशें ऐसा संग्राम जहाला. मुख्य अबदलीचा पुत्र तेजूरशहा बहादर व नजीमखां वगैरे मातबर पठाण व रोहिले हक्क होऊन गेले. खांसे सुजातदौले यास चार जखमा जहाल्या. इराणीचे फौजेनें शिकस्त खाऊन माघारी फिरली. अवसान अगदीं खत्ता जालें. भाऊंनीं सेना सहित पिच्छा पुरविला आणि इराणीच्या गोटांत फौज नेऊन घातली. एकीकडे पठाणांची टोळी होती ती नेस्त नाबूद केली. सदाशिवराव

भाऊ अभिनव यश पावले. आनंदसागरास पारावार नाहीं. शत्रु पराभवातें पावून, भाऊसाहेब व विश्वासराव साहेब उभयतां आपआपल्या अंबारींत बसून, महागर्जना करून रणतुरें व नौबती आणखी जय वाद्यें वाजवीत आपले गोटांत चालिले. एकच सिंहनाद झाला. त्यांची फौज शिकस्त खाऊन मागें गेली. त्यासंधींत मागें अबदअल्ली पन्नास हजार फौजेनिशीं आपले गोटांत तयारच होता, त्याचे पुत्र उभयतां लढाईंत हक्क जहाले, त्यांचें वर्तमान श्रवण करून वाईटपणाचें ऐकताच अबदल्ली यानें फौजेसहवर्तमान या अल्ला! या खुदा! या रहिमान! याप्रमाणें देवाचा धांवा करून, जीवित्वाचा संकल्प सोडून, एकदांच वाद्यें वाजवून फिरून सदाशिवपंतावर चाल केली. तेव्हां भाऊसाहेब यश संपादून आपले गोटांत जात होते. इतक्यांत शत्रु पाठीवर आला, हें वर्तमान कळतांच महातास सांगून खांशाचे हत्ती माघारे फिरविले. तें संपूर्ण फौजेनें पाहून सर्व लढाईच्या प्रसंगीं नीट चालिले. लढाई सुरू होतांच विश्वासराव साहेब अंबारींतून तिरंदाजी करीत होते, एवढ्यांत कोणी दुष्टानें बंदुकीची जोडगोळी घातली. ती हृदया पार होतांच विश्वासराव साहेब लागलेच वैकुंठवासी जहाले. तेव्हां त्या महातानें व जो खवासखान्यांत चौरीबारदार होता त्यानें कमरेचा दुपेटा काढून, विश्वासराव साहेबांस अंबारीचे खांबाशीं दृढ बांधून बसलेचे बसले वीर कमाणी सुद्धां तसेच ठेविले. पुढें लढाई होतच होती. या आकांताचें वर्तमान उजवे बाजूस भाऊसाहेब होते त्यांस विदित जहालें.

नंतर भाऊसाहेबांनीं आपला अंबारीचा हत्ती खालीं बसवून, विश्वासराव साहेब यांचे हत्तीजवळ जाऊन, तो हत्ती बसवून, रायाचें शरीर छिन्नभिन्न जहालें होतें तें दृष्टीनें पाहून परम दुःख जहालें. तें पत्रीं लिहिणाराची कल्पना कुंठित जहाली. श्रीराम अयोध्यापूर सोडून वनवासास जावयास सिद्ध जहाले, तें वर्तमान ऐकतांच दशरथानें कैकेयीच्या मंदिरांतच अंतर्धान केलें, तसेंच भाऊसाहेबांस जहालें. तेव्हां मल्हारजी होळकर यांस आज्ञा जहाली कीं, "तुम्ही पुण्यास जावें. बराबर आमचें कुटुंब व इतरांचे कबिले घेऊन जाऊन, श्रीमंत नानासाहेबांस व श्रीमंत सौभाग्यवती गोपिकाबाई साहेब यांस माझे साष्टांग नमस्कार सांगून विज्ञापना माझे तर्फेनें करावी. तुमचे चिरंजीव विश्वासराव साहेब व भाऊ साहेब तीन लक्ष सेनेसहित इंद्रलोकीं

सुखरूप आहेत. कांहीं चिंता न करावी. उभयतां वडिलांनीं आजपासून लोभ चिरंजीव माधवरावसाहेबावर करीत जावा. पुढे कांहीं दिवसांनीं त्यांचे हातून संपूर्ण शत्रू लयास जाणार. मी परशुराम अवतार आणि चिरंजीव माधवराव साहेब केवळ अर्जुनाचा अवतार. आमचा संकल्प यांचे पराक्रमानें परिपूर्ण होणार. याप्रमाणें सांगितलेलें वर्तमान नानासाहेबांस व सौभाग्यवती वहिनीबाईस श्रुत करावें. कदाचित् शत्रूंनीं तुमचा पिच्छा पुरविला असतां आमच्या कुटुंबाचा शिरच्छेद तुम्हीं आपले हातीं करावा, परंतु शत्रूंचे हातीं जीवंत लागूं देऊं नये." तसेंच जनकोजी शिंदे यांस सदहू अन्वयें निरोपण जहालें. शिंदे मजकूर यांणीं उत्तर दिलें कीं, "मी पुण्यास माघारा जावयाचा नाहीं. खावंद जर माघारे पुण्यास येतील तर मी जाईन. नाहीं तर जेथें खावंदाचा जोडा पडेल तेथें माझें शिरकमल पडेल! यांत तिळमात्र अंतर नाहीं." तें ऐकून समागमें स्वारी बरोबर गंगोदकाच्या कुप्या चालत होत्या त्या सदाशिवपंत भाऊंनीं आणवून, खालीं गाशा घालून शेलापागोटें, जामानिमा, ढालतलवार,. सुद्धां सैचल स्नान करून, एके कुपीचें उदक प्राशन केलें आणि उत्तर केलें कीं, "आमचें पारणें जहालें!" मग मल्हारराव होळकर यांस रामराम करून, "आतां लोभ असो द्यावा," असें बोलोन हयपान घोडा अबी होता. तो आणवून, वर स्वार जहाले. एवढ्यांत होळकर वगैरे यांणीं विनंति केली कीं, "एवढे हट्टास पडावयाचें कारण नाहीं. आपण उज्जनीस साल मजकुरीं छावण्या कराव्या. पेस्तर सालीं शत्रु आपण पहातच आहों. पुण्यास जावयाची खावंदास शरम वाटेल तर आलीकडे गंगा अथवा नर्मदा अथवा क्षिप्रा एवढ्यास्थळीं मुक्काम वर्ष सहा महिने करून, सर्व सरदार, घोडे, हत्ती व उंट व तट्टें, पायदळ, व तोफखाना यांचे बैल व अवांतर सेना खाऊन पिऊन हुशार होऊन पेस्तर सालीं रूमशामची खबर घेऊं! हिंदूचे मुसलमान होऊं परंतु छत्रपतीचें नांव राखूं यांत अंतर नाहीं!! आणि आपण कांहीं पदरचे सरदार यांचें ऐकत जावें. कारण पेशजी साष्टी, वसई कैलासवासी चिमाजी आपा यांणीं फत्ते केली. आणि प्रतिज्ञा मोठीच केली होती परंतु चौघां सरदारांचे मतें कोणतीही एखादी गोष्ट शेवटास नेत. तसेंच आपण वर्तावें." तेव्हां भाऊसाहेबांनीं उत्तर केलें कीं, "चिरंजीव विश्वासराव साहेब गोळी लागून कामास आले. आतां आपण

मोठा पराक्रम जरी करून पुण्यास गेलों तरी सौभाग्यवती गोपिकाबाई साहेब माझें मुखावलोकन करणार नाहींत. कारण त्यांचे केवळ जिवाचे जीव विश्वासराव साहेब ते लढाईंत पडले असतां त्या वडिलांचे भेटीस आपण जावें हें अयोग्य."

एवढ्या संधींत मलका जमानीन बिबीसाहेब, दिल्लीश्वराची बादशाहा जादी, हिणें जी फौज रूमशामचे बादशाहाकडून कुमकेस इराणी व दुराणी, गिलचे नादिरशाहा व तंबूरशाह वगैरे आली होती त्यांस पदर पसरला कीं, "तुम्हीं जर लढाईस कमकसर केली तर दिल्लीचे बादशाह फकीर होऊन देशांतरास जातात. हें समजून एक वेळ आणखी लढाई रणखंदल करावी. त्यांत खुदानें यश दिल्यास पुनः दिल्लीस जाऊं. नाहीं तरि दिल्ली सोडून परागंदा होऊं. तुमचे लष्करासन्निध उतरलों आहों. मुसलमानी बादशाहीची शरम ठेऊन बुजरख लढाईस भिडावें. बारग्यांची फौज दरवर्षी येऊन बादशहास इजा देऊन, घासदाण्याचे ऐवजीं खंडण्या घेतात, आणि रात्रंदिवस बादशहा दिलगीर होतात, हें दुःख सोसवत नाहीं. आपण बादशाहत करूं अथवा बारगे करतील हाच संकल्प!" तेंव्हां सरदारांनीं तसलिमात करून, बिबीसाहेबांचा हुकूम घेऊन, एकदांच घोड्यांच्या अनीना उठवून मोहळांच्या माशा उठतात त्याप्रमाणें सर्वत्रांनीं उडी घातली. तोफा व बंदुका आणि बाणांच्या कैच्या व गरनाला आदि करून अगदींच राहिल्या. तरवार चालती जहाली.

तेंव्हां राव भाऊंनीं त्या रोहिल्याप्रमाणेंच उडी घातली. पहिल्या लढाईच्या वेळेस सव्वा चार लक्ष फौज गणतीस लागली होती. त्या आलीकडेस सर्व सैन्य लढायांत खपून तीस सहस्र घोडा स्वार शिलक राहिला. त्या सुद्धां भाऊसाहेबांनीं उडी घातली. तेंव्हां [भाऊ] केवळ कल्पांतींचा आदित्य भासला. ग्रीष्म ऋतूच्या दिवसांत मेघाचे ढग उठतात आणि विद्युल्लता चमकून लागलीच नाहींशी होते, त्याप्रमाणें भाऊसाहेबांनीं संग्रामांत उडी घातली ते समयीं सर्वांस दिसले. तिकडील खांसा अबदल्ली व मनसूरअल्ली व सुजातदौले, इराणी कडील नादिरशाह, तंबूरशाह वगैरे उरल्या फौजे सहित त्यांणींही उडी घातली. ते समयीं श्रीहरी त्या अमित्राकडील फौजेस सन्मुख जाहला. श्रीमंत पेशवे बहादूर यांस विन्मुख झाला. याजमुळें सर्व नाश जाहला.

## क्रमांक ६ : : भाउसाहेबांची बखर

### १. बचेंगे तो और बी लढेंगे

इकडे दत्ताजी शिंदे यांस बयाजी शिंदे याजकडील स्वार धांवत आला आणि सांगितलें कीं, "पाटील, बयाजी शिंदे तो ठार पडले. मुर्दा त्यांनीं नेला. आणि घाट घेऊन फौज जमावून उभी आहे." असें ऐकतांच नगार केला. दत्ताजी शिंदे घोड्यावरि स्वार जाले तों फौज अगोदरच सिद्ध होती. जनकोजी शिंदे यांनीं आंगांत बक्तर घातलें. दत्ताजी शिंदे यांनीं रागास येऊन आंगांतील सामान काढविलें. आणि बोलले कीं, "आज कांहीं आम्ही युद्ध करीत नाहीं, मल्हारराव होळकर नजीक आले आहेत, एका दोहों रोजांत येऊन पोंचणार, तों पावेतों काव्यानेंच दुरून राहावें." म्हणोन रागास येऊन आंगांतील सामान काढविलें. आपण घोडियावर स्वार जाले. घाटाचे सुमारें चालिले, तों फौज जमून मुजऱ्यास आली. मुजरा करितात तों त्यांस आज्ञा केली कीं, "निशाणाबराबर चालावें" म्हणोन फौज निशाणाबराबर लाविली. तों यमुनातीरीं अडचण भारीं, शेरण्यार्ची बेटें होतीं. दिसेनात असे अडचणींत शिरले. मराठियांस पाठीवर काठी उडत असली तरच हिंमत होते. त्यांत दैवयोगें करून दडण भारी. कोणाची शरम कोणास नाहीं. तों निशाण जाऊन युद्धास थेटलें. ते समयीं दोहीं तर्फेनें तोफांचा, हस्तनाले व सुतरनाले व जेजाला व गंजिफियाच्या गाड्या वगैरे गारभांडीं व बंदुकांचा मार ऐसा जाहाला कीं, जैसे भडबुंजे लाह्या भाजतात, कीं विद्युल्लतापात होतो. तैसा एकच धडाका जाहाला. मोठी गर्दी जाहाली. बाणांचा वर्षाव मेघमालांप्रमाणें होऊं लागला. थोडे मनुष्य धुंद जाहाले. धुराची गर्दी जाहाली. तेणेकरून कोणी कोणास दीसेनातसे जाहाले. मोठे मोठे वीर, त्यांच्या वीराश्रिया उतरल्या, आलीकडे मराठियांनी झुंज याप्रमाणें पाहिलें नाहीं. न भूतो न भविष्यति, ते समयीं प्रसंगीं होते त्यांस मात्र अनुभव असेल. असें दोन घटिकापर्यंत जाहालें. तेथून दोन कोसांवर घाट होता, तेथें गोविंदपंत बुंदेले होते. तिकडून त्यांनीं यमुना उतरून परस्परें गोविंदपंत बुंदेले यांस तिकडेच ताण

बसविला. ते तिकडेच राणेंभरी जाहाले. यांजकडे यावयास फुरसत जाली नाहीं. पांच सातशें खाशियांचीं डोचकीं कापून नेलीं. तैसेच दिल्ली नजीक राजघाटावर मालोजी शिंदे तेही घाटावरून उधळून, शाहाधड्या नजीक घाट उतरून, तिकडूनही फौजा आल्या. मालोजी शिंदे याची फौज झाडून पोटाशीं सांपडली त्याजमुळें ज्याचें आयुष्य पुरतें ते मात्र वांचले. खांसा मालोजी शिंदे बाणाची खास्त निघाले होते, तो चित्तांत योजना केली कीं, "दत्ताजी शिंदे आम्हांदेखतां बहुतांची टीका कारितात. आतां आम्हीं त्यांस तोंड काय म्हणून दाखवावें? म्हणोन घोडे घातले. त्यांतच गैबत जाले. त्यांचा मुर्दा देखील कोणीं दृष्टीनें देखिल नाहीं. इकडे दत्ताजी शिंदे यांजकडे तुंबळ युद्ध होतच होतें. निशाणापाशीं पांचशेंही फौज नाहींशी जाली. आधींच मराठी फौज, हिंमत भारी नाहीं. त्यांत अडचण होती. त्या योगेंकरून अडचणींत फौज गैब जाली. चाळीस हजार फौज; थोडकी नव्हती. परंतु अडचणींत कांहीं दिसेनासें जालें. इकडे निशाणाकडे जनकोजी शिंदे झोंबतच होते. दत्ताजी शिंदे निशाणाचे बाजूस उजवे होते. दिल्लीचे बाजूनें पंचवीस खांसा व आपण उभे होते. गिलचास त्यांची धास्त होतीच. इतकी फौज हिंमत सोडून होती. तों हत्तीवर घटका वाजत होती. आठ घटिका पूर्ण भरल्या. त्या अडचणींत पांचशें मनुष्यें ठार जालीं. तैशींच घोडींही पडलीं. तैसेच जखमीही जाले. केवळ शेणसडा होऊन गेला. तैशा समयीं जवळ तान्हाजी खराडा म्हणून सरदार होता, त्यानें अर्ज केला कीं, "पाटील, दुराणीची फौज झाडून उतरली. गोविंदपंत बुंदेले तों तिकडेच बुडाविले. तैसेच मालोजी शिंदे यांस तेच गत जाली. निशाण उघडें पडलें. अबरू जावयाचा प्रसंग आला. निशाण काढतां उत्तम आहे." असें म्हणतांच दत्ताजी शिंदे यांनीं उत्तर केलें कीं, "आपण मेला जग बुडाला. अब्रू जाते आणि वांचतो कोण? अझून काय निघावयाची बाकी राहिली आहे कीं काय? सफेजंग होऊन गेली. आतां निशाण काढाल तर फौज पळूं लागेल. मग म्यांही पळावें? मग देशीं तोंड म्यां दत्ताजीनें काय म्हणोन दाखवावें?" असें बोलिल्यावर तान्हाजी खराडे मागती बोलिले कीं, "पूर्वीपासून देव, दैत्य, दानव काय करीत गेले? त्यांस आम्हीं मृत्युलोकीचे मानव पडलों. वेळेस मान द्यावा. या समयीं काळावर नजर देऊन निघावें." म्हणोन

बोलिले. त्यावर दत्ताजी शिंदे यांनीं साफ सांगितलें कीं, "हा खंदारचा पादशाहा अबदुल अली चालून आला आहे. या रानांत ईश्वरें मृत्यु आणिला तरि उत्तम आहे. योगी, संन्यासी, तपस्वी नाना प्रकारचे देहदंड करितात कीं मोक्षसाधन व्हावें. त्यांत आम्हां क्षत्रियांचे स्वधर्म हेच कीं, रणांत विन्मुख न होतां मृत्यु आल्यास सर्वही साधने साधिली तें ही कर्म ईश्वरें दाटून वोढून आणिलें. अशांत जो कोणी अभागी आहे तो विन्मुख होईल! रण सोडून निघालियास दोहींसहीं मुकावें. इकडे नर्कसाधन, इकडे अपेश मरणाहून वोखटें. यांत मरतांच उत्तम!" म्हणून गाडून उभे राहिले.

तों इकडे जनकोजी शिंदे निशाणापाशीं झोंबत होते. त्यांचे उजवे दंडास एकाएकीच गोळी लागून दंड फोडून हाड बाहेर आलें. जनकोजी शिंदे यांस तव येऊन घोड्याखालीं आले. तों जवळ खिजमतगार उभा होता तो धांवत दत्ताजी शिंदे यांजकडे आला. आणि घाबरेपणे वर्तमान सांगितलें कीं, "बाबासाहेब गोळी लागून पडले" असें वर्तमान ऐकतांच दत्ताजी शिंदे यांणीं जवळ लोक उगे होते त्यांस जाबसाल केला कीं, "बाबा आम्हांस सोडून गेले, आतां आम्हांस देशीं तोंड दाखवावयास येणार नाहीं. रणांत मृत्यू आला तर उत्तम आहे. नाहीं तर विष भक्षू प्राण द्यावा" असें बोलून दत्ताजी शिंदे यांचे पुढें दाहा हजार कुतुबशाहा व दुराणीचे लोक उभे होते त्यांजवर अठरा असामीनिशीं घोडे घातले. घोडियाचे तोंड शिरेलें तों त्यामध्यें अकरा खांसे ठार पडले. जात्या खाशांनी घाव केला. तेथून माघारे गोळीच्या माऱ्यांत निघाले. तों यशवंतराव जगदळे थोराळेकर यांस गोळी लागून ठार पडले. त्यांचा भाऊ पिराजी जगदळेही समागमेंच होता. त्यानें भावाचे मुरदियासाठीं बहूत प्रयत्न केला. काढावा म्हणून बोलिले. म्हणोन पाटील यांनीं लालमणी घोडियाचें तोंड माघारें किंचित फिरविलें. मुर्दा ओढा ओढा म्हणून बोलतात तों एकाएकींच आकाशाची दोरी तुटते, तैशी गोळी येऊन उजवे बगलेस बरगडींत लागली, आणि घोडियाखालीं आले. तों नजीक राजाराम चोपदार व राघोबा शेणवई पागनीस होता. त्यांनीं इत्यर्थ केला कीं, "बहूत दिवस यांचें अन्न भक्षिलें,

आणि पाहिजे तितके विलास यांच्या जिवावर केले. आतां यांस टाकून जावें याहून मरण बरें." म्हणोन घोडियावरून उतरले. तों [दत्ताजी] घायाळ होते. प्राण कांहीं गेला नव्हता. घायाळ काढावा तरि त्यांजकडील फौजेची निकड बसली. घायाळ काढावयास फुरसत पडेनासी जाली. तों नजीबखान रोहिला याचा गुरू कुतुबशाहा याच्या अंबाऱ्या नजीक आल्या. राघोबा पागे यांनीं राजाराम चोपदार यास सांगितलें कीं, "तुम्ही कुतुबशाहा याजपावेतों जाऊन पोंचावें. दत्ताजी शिंदे रणांत घायाळ म्हणून सांगावें कीं, तुम्हीं यांचा बचाव करावा, नाहीं तर अबदुल अली हरामी याची गांठ पडली तर आमचें व पाटील यांचें शीर कापून नेतील. त्याहून यांजकडे पाडाव सांपडले ते उत्तम." म्हणून राजाराम चोपदार यास सांगून पाठविलें. तों कुतुबशाहाची अंबारी केवळ नजीक आली. त्यास राजाराम चोपदार यानें जाऊन मुजरा केला. रात्रंदिवस येणें जाणें सहजच होतें. ओळख पूर्वीच होती. "राजाराम तूं कहां ?" म्हणोन अविंधी भाषेनें पुसलें. त्यानें ही खरें वर्तमान सांगितलें कीं, "साहेब, पटेल घायाळ पडा है. या बचावे." असे म्हणतांच कुतुबशाहास मोठा आनंद जाला. इक्षुदंडांतून शर्करा सांपडते. किंवा तुपगीचनवतींत [?] सांपडतें, तैसा अनायासें करून महालाभ जाला. बोलिला कीं, "पटेल कहां है ? दिखलाव" म्हणोन तैसेंच अंबारी राजाराम जेथें दत्ताजी शिंदे घायाळ पडले होते तेथें घेऊन आला. कुतुबशाहा यानें अंबारींतून खालीं उतरून जवळ आला. तों दत्ताजी शिंदे उताणे पडले होते. येथें कुतुबशाहा यानें जाबसाल केला कीं, "पटेल हमारे साथ तुम और लढेंगे ?" म्हणोन पुसलें. दत्ताजी शिंदे सावध होते. त्यांस पुरतें उमजलें कीं, "हे कांहीं आपणांस वांचवीत नाहीत, मग व्यंग गोष्टी सांगणें हें विहित नव्हे." म्हणोन दम बांधोन जाबसाल केला कीं, "निशा अकताला ! बचेंगे तो औरबी लढेंगे." असें ऐकतांच कुतुबशाहा यानें कमरेचा सुरा ओढून, लाथेनें ढकलून, पालथा घालून, दत्ताजी शिंदे यांचा शिरच्छेद केला. राघोबा पागे व राजाराम चोपदार यानें बहुत ग्लानता केली कीं, "साहेब, इस्को बचाव, क्रोड रुपये पाहिजे तरि देऊं" म्हणोन बोलिले. परंतु त्यानें ऐकलें नाहीं. आपलें महत्कार्य केलें. तों आठ घटका दिवस आला होता. कुतबशाहा यानें शीर भालियास खोवन शाहादानें

वाजवीत जाते जाले. फत्ते जाली म्हणोन नजीबखान याजकडे गेले. शीर त्यानें काढून रुमालांत घेतलें.

इकडे दत्ताजी शिंदे घायाळ खालीं आले त्यांजकडील लालमणी घोडा तानाजी खराडे यांनीं घेऊन निशाणाकडे घेऊन आले. तों निशाणापाशीं बहूत लोक झोंबत होते. ते समयीं निशाणापाशीं दोन चार सरदार होते त्यांस तानाजी खराडे यानें जाबसाल केला कीं, "यार हो, आता निशाण काढावें, नाहीं तर निशाण निघत नाहीं." लोकांनीं जाबसाल केला कीं, "निशाण येथें आहे म्हणोन दम पडला आहे. निशाण निघालियावरि कोणी कोणाच्या दृष्टीस पडत नाहींत." असें ऐकून तानाजी खराडा याणें साफ सांगितलें कीं, "तुम्हीं कोणाचे भिस्तीवर लढता? दत्ताजी शिंदे तो रणीं पडले. जनकोजी शिंदेही पडले म्हणून ऐकतों. मग त्यांची गत काय असेल ती असो. प्रस्तुत दत्ताजी शिंदे यांजखालील घोडा लालमणी हा आम्हीं आणिला." म्हणोन प्रत्यक्ष दाखविला. लोकांनी अवसानें सोडलीं. दम खात खात निशाण अडचणींतून झील उतरून मैदानांत आले. जनकोजी शिंदे घायाळ घोड्यावर घातले. तों फौज झुरेमुरे बाहेन निघोन मैदानांत आली. तों रोहिला व दुराणी पाठीवर आला. पांच सात हत्ती व सडे बुणगे तळावर उभे होते. संदीपबेग यांचींमुळें बुणगिया समागमें होतीं. परंतु त्यांचे दिवाण लक्षुमी नारायण [व] पांच हजार फौज तळावर उभी होती. चौकडून दुराणीची व रोहिलियाची मिठी बसली. मग भले लोकांनीं एकदाच घोड्यास चाबूक केले. तीस हजार फौज अदकोस पर्यंत ताफाचा ताफा एकदाच आरडा ओरडा जाला. कोणी कोणास पुसेनासें जालें. बाप, लेक, भाऊ उभे राहीनात. दे धरणी ठाव असा प्रकार गिलचाने केला. ते समयीं येसुजी भुईटे व जानराव वांबळे यांनीं कंडानिकड करून, जनकोजी शिंदे यांस घोडियावर बैसवून दोही बाजूस धरून फौजेंत तडक पळूं लागले. घायाळ यांनीं "पाणी! पाणी! पाणी!" ही म्हटलियास पाणी द्यावयास दम निघेना. एवढा तालिवार त्याची दैवयोगें या रितीची गत जाली. असो. गिलचे पाठीवर डोचकीं कापीत चालिले. सांडवला [?] भला माणूस याची कोणी कुमक करीनात.

इतकियांत इकडे तळावर बुणगे व लक्ष्मी नारायण व हत्ती उभे होते,

त्यांजवर येऊन मिठी बसली. ते समयीं हत्तीवरले माहूत अबरूचे होते, त्यांनीं क्षणभर फौजेंत रण-खुंदल करून मारामार केली. तों महात गोळ्या लागून खालीं येतांच हत्ती मोकळे जाले. ते त्यांजकडे सहजच हस्तगत जाले. त्यांत एक बडेखान महात यानें जव्हेरगज म्हणोन बरा नामी हत्ती जलद व मर्द होता. तो दोन कोस पर्यंत काढिला होता. तळावर सडे बुणगे व हत्ती अंबाऱ्या व खजिना निघूं पावला नाहीं. तळावरच लुटलीं. बहूत करून मनुष्यें व खिजमतगार व पालखीचे भुई यांचे शिरच्छेद केले. क्वचित कोणी दैवयोगें करून थोडकीं वांचलीं असतील. लक्ष्मीनारायण लाहूरचा सुभा तळावरच होता. त्यांनीं गनिमांची कीर्ती ऐकतच होते कीं, गनीम यांनीं पळावें. मागुती उलटून घोडे घालावे म्हणोन ऐकत होते. त्याजवरून लक्ष्मी-नारायण आपले लोकांस वरचेवर सांगत कीं, "यार हो! भागो मत, मराठियाचे गनिमी काम आहे. अब सायतमे उलट आन पोहोंचतात. मारो! मारो! अब सायतमे उलटे. म्हणोन तट घालोंन क्षणभर मारामार केली. तों त्यांची जड काय? मराठियांनीं पुरताच गनिमी कावा केला? दंगा होऊन ते तळावरच कत्तल बहुत करून जाले. मग लक्ष्मीनारायण पांचशें खाशियांनिशीं उरला. तों गनिमांचा धुराळा दृष्टीस पडेना! मग लक्ष्मीनारायण पांचशें खांशानिशी दोन कोस पर्यंत जव्हेर हत्ती निघाला होता [तेथें गेला] तों दुराणीची मिठी त्यांजवर बसली. मराठे हत्ती सोडून चालिले. बडेखान महात यानें बहूत करून बोलिला कीं, "यार हो! तुम्हीं दम खात निघावें. या वेळपर्यंत येथवर हत्ती आणिला आतां निभावून नेणें" म्हणून बहूता प्रकारें सांगितलें; परंतु मराठे मनुष्य पळूं लागलियावर कोणाची वीर कोणास नाहींशी होते. रांडेनें सावळें हुसकटलें तर झाडास बांधिले असतां झाड घेऊन बारा कोस पळतील! तेथें हत्तीची गत काय? खांसा जनकोजी शिंदे एवढा सरदार घायाळ पाणी मागत असतां वाटेनें दम धरून कोणी पाणी पाजीनात! तेथें हत्ती कोण जिन्नस! मग बडेखां महात यानें जाबसाल केला कीं, "यार हो! तुम्ही दम खात नाहीं; परंतु क्षणभर दम खाऊन माझा तरी तमाशा पाहा!" म्हणोन माघारा फौजेंतून दुराणीची फौज होती त्यांत हत्ती चालवून क्षणभर मारामारी केली. शेंपन्नास दुराणी

इकडे शिंदे यांची गत ही जाली. तों दिल्लीचे किल्ल्यांत गाजुदीखान वजीर होता. त्यानें किल्ला टाकून कालिका-भवानी करून तडक पळून पांच सात कोसावर जनकोजी शिदे यांची फौज गांठिली. तोही यांचे समागमें पळूं लागला. असो; दुराणीची तीस हजार फौज गनिमाचे पाठीस लागली. लहान थोर सात आठ हजार मनुष्यांचीं शिरें कापून नेलीं.

इकडे दत्ताजी शिंदे यांचे तळावर दुराणी व रोहिला व सुजा व अहमद-खान लंगडा पठाण व कुतुबशाहा असे येऊन उभे राहिले. तों नजीबखान रोहिला याणें रुमालांत दत्ताजी शिंदे याचें शीर घालून अबदुल अली दुराणी याजकडे आला. अंबारीस अंबारी तटली. अंबारींतूनच नजीबखान यानें कुरनीस करून, हातावर रुमाल घेऊन, वर शीर ठेऊन पुढें आला. आणि शीर पुढें ठेविलें. आणि अर्ज केला कीं, "पातशाहा अलंपना, साहेब संदेकत नजर असे" म्हणोन शीर पुढें ठेविलें. ते समयीं पातशाहाचा आनंद अति उत्कृष्ट, शाहाजणें वाजवून "शाहाका बोल बाला!!" म्हणोन उल्हासाची एकच आरोळी जाली. दुराणी नजीबखान याजवर खुशाल होऊन बहुमान हत्ती व घोडे दिले. जवळ आणून पाठ थोपटली. या प्रकारें गौरव केला.

तदनंतर राजाराम चोपदार जिवानिशीं जगून गेला होता त्यानें नजीबखान यास अर्ज केला कीं, "दत्ताजी शिंदे याचें शीर कापून आणिलें. असो, जें जालें तें त्याचे प्रालब्धानेंच जाहालें. तुम्ही आपला जो वाघ–मान करावा तो करून घेतला. आतां हिंदु धर्म आहे. शीर ठेविलियांत नफा नाहीं. उमरावगीर गोसावी यांजपाशीं बहुत मराठे आहेत. धड शीर एकत्र करून त्याचें सार्थक करतील" या प्रकारें बोलिला. तों नजीबखान मान्य करीना. मग राजाराम चोपदार उमरावगीर गोसावी याजकडे जाऊन, त्यास अर्ज केला कीं, "तुमचा हिंदुधर्म आहे. दखनचा सुभा दत्ताजी शिंदे यांचें शीर अविंधांनीं नेलें. तें उमरावगीर गोसावी येथें असतां त्याचा सद्वियोग होऊं नये हें चांगलें नाहीं. तरि एवढें भूषण ईश्वर तुम्हांस देत आहे. यश ईश्वरें बळें होऊन घर पुसत आणिलें आहे. तरि पदरीं घेणें." म्हणतांच उमरावगीर गोसावी याचे प्रत्ययास आलें. "सायास केलियानें असें घडून येणार नाहीं." म्हणोन उमरावगीर गोसावी सुजाउद्दौला याजकडे येऊन अर्ज केला कीं,

"साहेब, आमचा स्वधर्म आहे. त्यास आम्ही साहेबांच्या पदरीं असतां दत्ताजी शिंदे यांचें देहसार्थक नाहीं असें होइल तर आम्हीं पदरीं राहिल्याचें सार्थक नाहीं." असें ऐकतांच सुजाउद्दौला यानें नजीबखान याजपाशीं जाऊन दत्ताजी शिंदे यांचें शीर मागितलें. त्यांनीं उत्तर केलें कीं, "आम्ही शीर अबदुल अलीस नजर केलें आहे, आम्हांस मागतां येत नाहीं, तुम्ही परस्परें पातशाहास अर्ज करून शीर मागोन घ्यावें." हें ऐकून सुजाउद्दौला यासही संकटच जालें. नजीबखान यास बोलिला कीं, "माझा बाप मनसूर अली पूर्वीं गनिमांचे पेंचांत आला. ते समयीं मनसूर अलीनें आपली दाढी राणोजी शिंदे यांचे हातीं दिली कीं, इची शरम राखावी. असें बोलिल्यावर राणोजी शिंदे यांनीं त्याची अबरू रक्षून गंगापार करून दिले. त्या तागाईत आम्ही राज्य खाऊन सुखरूप आहों. त्या राणोजी शिंदे यांचे पुत्र दत्ताजी शिंदे वरकड अवघीं बेइमानी आम्हांकडून घडली. परंतु एवढें तरि उत्तीर्ण व्हावें." म्हणोन अबदुल अलीपाशीं स्वतां रदबदली करून शीर मागितलें. ते समयीं उमरावगीर गोसावी यानें दोन लक्षांची निशा करून शीर आपलेपाशी घेतलें, डेरियापाशीं येऊन दत्ताजी शिंदे यांचें धडही आणिलें. आपणाकडील मराठे होते त्यांस आणून साहित्य उत्तम प्रकारें करून, चंदनकाष्ठें, बेलकाष्ठें व तुळसी-काष्ठें [आणून] यथाविधी यमुनातीरीं दहन केलें. तीन हजार रुपये दानधर्म, खैरातही वांटली. असो. इकडे दिल्लीचा किल्लाही सहजच खालीं होता. त्यांनीं किल्ला घेऊन आलीकडे येऊन मुकाम केला.

तों इकडे जनकोजी शिंदे घायाळ व भग्न असे फौजेसुद्धां पळत असतां अठरा कोसपर्यंत गिलचे यांणीं पाठलाग केला, आणि मग दुराणी फिरोन माघारे गेले. जनकोजी शिंदे यांस घोडियावर बसावयास अवसान पुरेनासें जालें. पालख्यांच्या जागीं पालख्या राहिल्या! मग खेडियांतील खाटलें काढून खाशियांनीं उड्या टाकून घायाळ चालविला. तैशियांत दुराणीनें गडबड केली. खाटलें भुईस उतरावयास फुरसत पडली नाहीं. मग उभियांनेंच खालें टाकिलें. जनकोजी शिंदे जखमी भारी, शरिरास परम दुःख जालें. मागुती खाटलें घोडियावर घालून तीन चार कोसपर्यंत निघाले. सायंकाळ जाला. दुराणीही झाडून माघारीं गेले. नजीबखान यानें मोठें यश संपादिलें. इकडे शिंदे यांचे बुणगे व कबिले चोवीस कोसांवर उतरले होते. त्यांत जनकोजी

शिंदे तीन प्रहर रात्रीं दाखल जाले. तों बुणगे आधींच तयार होते. वाटेनें लोकांस जनकोजी शिंदे पुसत कीं, "काकासाहेब यांची गत काय?" लोकांनी दत्ताजी शिंदे पुढें गेले म्हणोन चाळवीत चाळवीत बुणगियांत आले. कचेरीचे डेरियानजीक बाडापुढें खाटलें उतरलें. तों रामाजीपंत दिवाण व रूपराम कटारी धांवत आले. त्यांजसमागमें पांच सात मशालीही होत्या. जनकोजी शिंदे येईत तों पावेतों बायकांस कांहीं दत्ताजी शिंदे यांची अवस्था ठाऊक नव्हती. बाडांत वर्तमान कळतांच भागीरथीबाई व जनकोजी शिंदे यांची स्त्री काशीबाई अशीं उभयतां मराठधर्म विसरून धांवत बाडाबाहेर आलीं. तों जनकोजी शिंदे घायाळ खाटलियावर पाहिले. तोंड उघडून पाहिलें तों जनकोजी शिंदे यांनीं डोळियास पाणी आणून चुलतीस विचारिलें कीं, "बाई, काका कोठें आहेत?" ते समयीं भागीरथीबाईस पुरतें उमजलें कीं, पाटील निश्चये रणांत पडले. बाईस मोठा उभडा आला. मागती विवेक केला कीं, "जात्यांतील रडती आणि सुपांतील हांसती." त्यांची गत तो या रितीची जाली. आणि हा तो घायाळ, याचेंही जगावयाचें कठीण. दुराणीचा मागें पेंच भारी. आतां मी शोक करितें तर याची गत काय?' याविषयीं दोहरा आहे.

॥ मेरे मनमें कछु और । कर्ता के कछु और ॥
॥ उधो माधो कहे । झूटी मनकी दौर ॥

म्हणून उभडा आला तो विषासारिखा घोंटून जनकोजी शिंदे यांस जाबसाल केला कीं, "बाबा, तूं रांडेसारखा रडतोस काय! जयाजी शिंदे यांचे पोटीं चौघी लेकी जाहाल्या, तैशीच तूं एक आणखी जाली असतील तरि आणिक एक जांवई येता. पाटील काय घेऊन गेले? दुनिया, दौलत, महाल, मुल्क, खजिना, हत्ती, घोडे सर्व तुम्हांपाशीं ठेऊन गेले. तुम्ही हिंमत धरून त्याचें सार्थक करावें. आतां रडून होणें काय?" म्हणोन हिंमत देऊन बोलतांच जनकोजी शिंदे उगेच स्तब्ध राहिले. रामाजीपंत दिवाण व रूपराम कटारी यांस बाईनीं आज्ञा केली कीं, "रात्रीचे रात्र लष्करचा मुक्काम करणें. प्रातः-कालीं कूच करून जावें." असें ऐकून नगारचीस सांगून शाहाजणें केली. परंतु लष्कराचा धर सुटला. खावंदाची देखील अस्था धरीनात मग लष्कर

तडक रेवाडीचे रोखें चालिलें. घरण फुटल्यासारखें जालें. मग यांनींही तेथून कूच करावें म्हणून इत्यर्थ केला. तों पोतनीस व जामदार यांनी येऊन अर्ज केला कीं, "खजिना व कापड, नरमिना उंटावर चालत होतें. वरकड साधें कापड छकडियांवर चालत होतें. आतां छकडयाचे जागीं छकडे राहिले. आतां ओझियाची आज्ञा काय?" असें म्हणतांच भागीरथीबाई यांनी उत्तर केलें कीं, "आम्हीं कधीं कारभार केला नाहीं. तुम्हीं रामाजीपंत यांस विचारावें." तों जवळ जनकोजी शिंदे यांची स्त्री काशीबाई होती. तिची उमर तों अठराविसां वर्षांची होती. परंतु बुद्धि मोठी पोक्ताप्रमाणें. मोठे हिमतीची बायको. तिने जाबसाल केला कीं, "एवढाले जीव गेले, आतां दौलतीची आस्था कोणास आहे? तुम्ही खाजिना, नरमिना कापड असेल तें घ्यावें. आणि डेरे व साधे कापड त्यासि आग लाऊन द्यावी." म्हणोन साफ सांगितलें. मग तैसेंच जामदार व पोतनीस यांनीं सांगितलें त्याप्रमाणें वर्तणूक केली. जितकें अगत्याचें ओझें होतें तितकें मात्र घेतलें. वरकड बाडें व कचेरीचे डेरे व सामान खासेमहालांतील डेरे व जामदारखाने व नगारखान्याचे डेरे व साधीं कापडें यांस कडबा घालून आग लाऊन दिली. मोठा प्रळय जाला. जनकोजी शिंदे यांस बाईचे पालखींत घातलें. दोही बायांच्या पालखींचे भुई एके पालखीस लाविले. बायकांस घोडीं बसावयास पाहाण्यास गेले. तों त्या धुंदींत ज्याचे हातास जें घोडें आलें [तें] त्या बारगिरानें नेलें. मग भलतीशीं बळगी दोन घोडीं होतीं त्यांजवर बायका स्वार केल्या. तों भागीरथीबाई गरोदर, नऊ महिने पूर्ण भरले होते. घोडियावर बसावयाचें संकटच. परंतु संकटास उपाय नाहीं. एवढा तालेवार मेला. परंतु रडावयास फावलें नाहीं! घायाळ जनकोजी शिंदे यांच्या जखमा बांधावयास दुराणीचे दहशतीमुळें फावलें नाहीं! असो. या रितीने कूच केलें. बहुतकरून तोफखाना तळावरच राहिला. अडीच प्रहर रात्रपावेतों तेथून दहाबारा कच्चे कोस गेले. तों जखमी याजसमागमें एकदील पांचशें खांसा नाहीं. जिकडील तिकडे रानोमाळ [होऊन] कोणास कोणी पुसेनासे जाले. तों रूपराम कटारी याणें पालखी उतरून मनसुबा करिता जाला कीं, "दुराणीची दौड भारी. आतां दुराणी कांहीं या फौजेस निभाऊं देत नाहीं. तरि उभयतां बायका व जनकोजी शिंदे व रामाजीपंत यांस कोणांस न कळतां नेऊन

भरतपूर अथवा रामगड अथवा कुंभेरी येथें ठेवून दुराणीची दौड आली तरि आम्ही हातीं देणार नाहीं. वरकड फौजेचे दैवीं असेल ते हों होईल." असें म्हणतांच जनकोजी शिंदे यांनीं उत्तर केलें कीं, "बाईस विचारावें." तों बाईनें ऐकून सांगितलें कीं, "मनसोबा मजला कांहीं सुचत नाहीं. तुम्ही चित्तास येईल तसें करावें." म्हणतांच काशीबाईंनी भीड मर्यादा सोडून बोलली कीं, "तुम्ही हा मनसोबा काय करितां? जाट आमचा काय भाऊ व्यंकटराव नव्हे, किंवा मावळा भापकर नव्हे. त्यांनींच जर बंदीस घातलें तर पेशवे यास आमचे अगत्य काय? दुसरें, दक्षणचे आमचे जिवासाठीं या रानांत आले त्यांस मोकलून आम्ही आपले जीव जगवून तरी काय करावें? सोक्ष मोक्ष जे चौघांत होतील ते होऊन, परंतु हा मनसुब उत्तम नाहीं." म्हणोन म्हणतांच भागीरथीबाई यांनीं आज्ञा केली कीं, "पालखी चालूं देणें," असें म्हणोन तडका लष्कर चालों लागलें. तें दिवस उगवावयास रेवाडीनजीक आलें. दिवस उगवला. तों गांवकरी खेड्यापाड्याचे लोक उंटे, तट्टें, घोडीं वोढूं लागले आणि गिलचा आला म्हणून आवाई घालून लुटूं लागले. मागती गडबड जाली. ते समयीं मोठा प्रलय जाला. पडती यांनीं बायका मुलें टाकून दिलीं. तेथें वरकड काय पाहावें? अंगावरील वस्त्रें कोणी ठेवीनात असे पळूं लागले. तों पालखीजवळ दोघी बायका होत्या. पालखींत जखमी जनकोजी शिंदे होते. भोई घाबरे होऊन पालखी टाकावयाचे विचारांत आले. ते समयीं जनकोजी शिंदे यांस नेटें पालखी चालली तर यातना सोसेना. ते वक्तीं भागीरथीबाई यांनीं भोई यांची प्रार्थना केली कीं, "बत्तीस भोई तुम्ही आहां! तुम्हांवर घाव पडे तोंवर पालखी न टाकावी. दर आसामीस शेर शेर सोन्याचें कडें देईन." याप्रकारें हिंमत दिली. तों पळायाची फारच गडबड जाली. जिवाचे धास्तीनें बावन्न बिरदांचे धणी, भले सरदार, घोडे सोडून जीव जगविण्याकरितां पाहाडांत शिरले! "जीव द्यावा त्यापेक्षां जितरब गेलें तरी उत्तम" म्हणोन घोडीं सोडलीं. रांडा पोरें घोडी धरूं लागलीं. ते समयीं भागीरथीबाई यांनीं जनकोजी शिंदे यांस सांगितलें कीं, "बाबा, मजला आतां घोडियावर बसून पळावयाची निभावणी पडत नाहीं. तुम्हीं झाडून पुढें चालावें. माझे समागमें जिव्हाळियाचा मनुष्य असेल तो द्यावा. गिलचा दृष्टीस पडे तों पावेतों मजला रक्षावें. निदान

दृष्टीस पडून निभावणी दिसेनाशी जाहाली म्हणजे माझे दोन तुकडे करावे" असें बोललियावर याप्रमाणें आवजी आनंदराव म्हणून बरा मर्दाना आणि जिव्हाळियाचा होता, त्यास जनकोजी शिंदे यांनीं सांगितलें कीं, "बाई-समागमें दम खात खात यावें. निदान दुराणी दृष्टीस पडलियावर बाईचे दोन तुकडे करावे. आशा न धरावी. यांस जिवें मारून मग तुमचे दैवीं असेल तसें पाहावें." याप्रमाणें सांगोन त्यास भागीरथीबाई यांज-समागमें दिलें. तसेंच काशीबाई यांजसमागमेंही कुसाजी शिंदे यांस नेमून दिलें. परंतु भागीरथीबाई पोटाशीं, नऊ महिने पूर्ण भरले, म्हणोन त्यांस पळावयाचें संकट. काशीबाई सडी होती. तिने पालखी सोडली नाहीं. याप्रकारें तीन कोस भोई पालखी घेऊन पळाले. जखमी आंत परम कष्टी. प्राण गेला तरी पुरवला, परंतु [ वेदना ] सोसवेना, म्हणोन भोई यांस शिव्यागाळ करीत. परंतु कोणी ऐकेनात. मग पळतां पळतां एक गांव बरा मातबर होता. तेथील हजार दीड हजार मुलें बायका पुरुष दांडगे लष्करास ओढाओढ करूं लागले. तों पालखी जवळही दिवस उगवलियावर पांच सातशें खांसा जमला होता. ते वक्तीं काशीबाई यांनीं जाबसाल केला कीं, "तुम्ही एवढे मनुष्य, दुराणी तो दृष्टीस पडेनात. रांडा पोरें घोडीं ओढतात. तुमच्या पोटांत हरणाचीं काळजें कशीं शिरलीं!" असें ऐकून जनकोजी शिंदे यांणीं भोई यांस रागास आले कीं, "पालखी थोपवावी. घोडें बसावयास द्यावें." असें म्हणतांच लोकांस ईर येऊन दांडगियांवर घोडे घातले. पांच सातशें मनुष्य कापून काढिलें. मग हुल्लड शांत जाहाली. सायंकाळ जाहाला. लष्कर जिकडे तिकडे पळून गेलें. एक जागां जमून राहिलें नाहीं. जातीनिशीं जनकोजी शिंदे खांसा दहा हजार एकीकडे आणि नारो शंकर एकीकडे, साबाजी शिंदे एकीकडे, कोणी कोणास पुसेनात, तमाम लष्करांत जनकोजी शिंदे असतां आरोळी जाली, "जनकोजी शिंदे जाटांनीं कुंभेरींत नेले. आम्हांस रानांत मोकलिलें." म्हणोन लोक दिलगीर जाले. असो. तेवढी रात्र घोडियावर जीन व उंटावर ओझी तशींच [ ठेवून ] जिकडील तिकडे लष्कर उभें राहिलें. दुसरे दिवशीं दिल्लीहून कचे ऐंशी कोस कोटपुतळी येथें जनकोजी शिंदे राहिले. तमाम डोंगरांत सांडणी स्वार पाठऊन लष्कर जमा केलें.

तों तेच दिवशीं मल्हारराव होळकर, यांचीं निकडीचीं पत्रें गेलीं होतीं

म्हणोन, मल्हारराव होळकर यांनीं जयनगरचा शह टाकून मजल दरमजल मोठ्या मजली करून मिळावयास येत होते. तों इकडे यांची अवस्था ऐशी जाली. हें मल्हारराव यांस विदित नवतें. तेही मुकामास कोटपुतळी पासून दोन कोसांवर आले. बुणागियाचा पुढें मुकाम जाला. मागून मल्हारराव सडी स्वारी अस्तमानास मजलीस शाहाजणे वाजवीत आले. तों शिंदे यांचे लष्कराचे पळाचे राऊत जाऊन तेथें पोंचले. मल्हारराव यांनीं जवळ बोलावून वर्तमान विचारिलें. स्वारांनीं वर्तमान सांगितलें कीं, "दत्ताजी शिंदे यांचा शिरच्छेद जाहला. जनकोजी शिंदे जखमी व बायका व लुटलेलें लष्कर असे येथून तीन कोसांवर कोटपुतळीस मुकाम करून राहिले आहेत." हें वर्तमान मल्हारराव यांनीं ऐकतां क्षणींच अंबारींतच घालून घेतलें व गंगाधर तात्या शाहाजणें वाजवीत होते तें मना केलें. असे डेरियांत जाऊन शोक करिते जाले. ते समयीं त्यांची स्त्री गौतमाबाई होती, तिनें निषेध केला कीं, "सुभेदार, तुमचें वृद्धपण जाहलें. शिंदे यांचीं मुलें म्हणजे काय? त्यांचे तोंडचें जार वाळलें नाहीं! त्यांनीं एवढा पराक्रम करून मारतां मारता मेले. एरवीं हा मृत्युलोकच आहे. जाला प्राणी वांचत नाहीं. परंतु इहलोकीं कीर्त करून परलोक साधन करणें, हेंच दुर्लभ. हें मूल जनकोजी शिंदे, याणें एवढा पराक्रम केला! तुमचे दिवस समीप आले. तरि हिंमत धरून मारतां मारतां मरावें. हा प्रलाप स्त्रीजातीने करावा असें पुरुषास बोलिलें नाहीं. प्रस्तुत जवळ जखमी व मुलें बाळे आले आहेत. तर ऐसेच जाऊन भेटून त्यांचें समाधान करावें" म्हणोन बोलतांच वृद्धास विषाद येऊन गौतमाबाईस बोलिले कीं, "तुझे चित्तांत आम्हीं मरावें असें आहे" यावर गौतमाबाईनीं उत्तर केलें कीं, "सुवासिणी असतां वैधव्याची आस्था धरील अशी कोण चांडाळीण असेल? अहेवपणें हळद-कुंकु-मंडित मरावें, हीच इच्छा सर्व स्त्रियांची. परंतु जैसें पूर्व आचरण असेल तैसें घडेल. आपले पदरीं लौकिक भारी. तुम्हीं आपलें घोंगडी विणावयाचें स्वकर्म करीत असतां तरि सहजच वांचावयाची आस्था धरावी. वांटा तरि शूराचा उचलिला आहे. वाण सतीचें घेतलें [तें] जैसें सांभाळावें, तैसेंचि धर्मशास्त्र आहे" बाईचें वचन ऐकून, तैसेच रागास येऊन, घोडियावर स्वार जाहाले. हत्ती व फौज सिद्ध होऊन जनकोजी शिंदे यांजकडे चालिले. "जैशी दैवाची

उपरी तैशी बुद्धी उपजे शरीरीं" बरोबरील तमाम फौजेची छबी पळाली. तोंडें काळी खापरासारखीं दिसों लागलीं. एकमेकांस बोलूं लागले कीं, "शिंदे यांची फौज एवढी लढती, तिची ही गत! आमची खानदेशी फौज बहुत करून तिची गत काय होईल न कळे."

असो. या प्रकारें शिंद्यांच्या लष्करास मल्हारराव आले. तों भागीरथीबाई व काशीबाई यांस राहुटी देखील नाहीं. झाडास वस्त्रें गुंडाळून बैसलीं होतीं. तेथें गौतमाबाई आली ते समयीं उभयतां बायांचा व भानसिनी यांचा कोल्हाळ जाला. तीन दिवस दम खादला होता तितका उमडा आला. "भगवंतें आम्हांवर केवढा गहजब केला! आम्हीं देवाचे घरीं काय चोरी केली होती? एवढें निर्वाण आम्हांस [कां] दाखविलें? आमचा वियोग केला! आतां पाटील यांस कोठें पाहूं?" म्हणोन धाय मोकलून उर माथा बडवून तोंडीं माती घालूं लागली. ते समयीं गौतमाबाई यांणीं बहुत शांतवन केलें. मायाजाळ स्मशानवैराग्य दुसरियास सांगावें. परंतु ज्याचा उभड तोच जाणत असेल. हा अनुभव मनुष्यदेहीं सर्वत्रांस आहेच. तैसेच मल्हारराव [यांची] जनकोजी शिंदे यांस पाहून जैशी माय प्रलाप करिते तैशी गत जाली. उपराटे जनकोजी शिंदे यांणीं मल्हारराव यांचें समाधान केलें. "सुभेदार, हा मृत्युलोकच आहे. यांत केव्हांही जाणें खरें. वडील कीर्तीच करून गेले. आपणही किती दिवस जगणें आहे? त्यांत अवकाशही नाहीं. 'सुपांतील हांसती आणि जात्यांतील रडती' हाही दृष्टांत जाणावा. प्रस्तुत आमचे हातांत ग्रास जात्यांतील आहे." म्हणोन शांत केलें. मल्हारराव यांनीं डेरा व बाडाच्या कनाथा व बिचोबा व खाजगीचे डेरे पूर्ववत प्रमाणें आणून दिले. आपण तेथें राहिले. दोन्हीं सैन्यें एक जागां जालीं. त्या वेळेस लोकांस असें जालें की, कुडींतील प्राण व्याकूळ जाला असतां परतती तैसें घडलें, मल्हारराव आले म्हणोन ते दिवशीं सैन्य स्वस्थ राहिलें. तों मल्हारराव यांचे लष्करांत तीन वेळां दुराणी आले म्हणोन गडबड जाली.

दुसरे दिवशीं जाटाची बातमी आली कीं, दुराणीची "फौज तुम्हांवर सडी होऊन येणार, तुम्ही स्वस्थ कसे राहिलां?" म्हणून पत्रें आलियावर मल्हारराव, जनकोजी शिंदे व गंगाधरपंत व रामाजीपंत दिवाण असे एकत्र होऊन जनकोजी शिंदे यांस विचार सांगते जाहाले कीं, बाबा! तुम्ही जखमी

आहां. दुराणीची दौड भारी. सहजीं चालणें कच्चे चाळीस कोस. त्यांत तुमची निभावणी पडणार नाहीं. यास्तव बुणगे व बायका व तुम्ही आम्ही चमेली पार जाऊन सडे फौजेंत रामाजीपंत व आमचे गंगाधरपंत राहातील.'' याप्रमाणें मल्हारराव यांचें वचन ऐकून जनकोजी शिंदे यांणीं उत्तर केलें कीं, "सुभेदार, तुम्ही वडील आहां. मुलें माणसें व बुणगे घेऊन जावें. माझा नेमच आहे कीं, जेथें पाटील मृत्यू पावले त्या स्थळीं आपला देह टाकावा. असा माझा नेम (आहे). आपल्यास राहाणें नाहीं.'' असें ऐकून मल्हारराव यांणीं बहूत प्रकारें वडीलपणें धिःकार करून सांगितलें. परंतु जनकोजी शिंदे यांचे बुद्धीस उतार पडेना. मग रागें मल्हारराव डेरियास येऊन गौतमाबाई यांसि वर्तमान सांगितलें कीं, "जनकोजी शिंदे आम्हांस सर्वत्रांस घेऊन बसतात. ऐकत नाहींत.'' तेव्हां गौतमाबाई थोर हिंमतीची बायको, तिनें मागती मल्हारराव यांस विचार करून सांगितलें कीं, "सुभेदार, तुमची 'साठी बुद्धी नाटी' तैसा विचार जाला आहे. अपकीर्ती मिळवून किती पन्नाशा जगणें आहे? बहूत रोज गुजरले, थोडके राहिले आहेत. जनकोजी शिंदे मूल होत्साता त्याची एवढी हिंमत! आणि तुम्हीं हा विचार काय म्हणोन ध्यानांत आणिला?'' असें ऐकून मल्हारराव यास विषाद येऊन दातानें ओठ चावून बोलता जाहला कीं, "म्यां तुझें चित्त पाहिलें.'' असें म्हणोन तैसेंच जनकोजी शिंदे यांचे डेरियास येऊन खचीत जाबसाल केला कीं, "तुम्ही आम्हीं सर्वत्र फौजेंत राहून बायका, मुलें बुणगे झाडून माळव्यांत लावून द्यावीं. तुम्हीं आम्हीं सडे राहून दुराणी भंवताले गनिमी काव्यानें राहून गिलचा हारीस आणावा.'' म्हणोन बोलून तेच समयीं बुणगियाचें कूच करविलें. शिंदे इमानाचे शाबूद, अशा आकांतांतही सावध; फौजेस आठवडा रोजमुरा दिला. बुणगियाचा बंदोबस्त करून वाटेस लाविले. केरोलीचे राजाचा व मल्हारराव यांचा स्नेह, म्हणून केरोलीचे घाटें बुणगे वाटेस लाविले. केरोलीवरून दत्ताजी शिंदे यांचे दहावे दिवशीं चमेलीस आले. होळकर यांचींही मुलें माणसें बरोबरच होतीं. कोशभराचे छाव्यानें गौतमाबाईचा तळ होता. तेथें क्रियाकर्म करून, कूच करून कुंवारी नदीवर मुकाम केला. तेथें तेरा दिवस करून राहिले. तो रात्रौ भागीरथीबाई प्रसूत जाली. पुत्र जाहला. ते समयीं तोफा व वरकड यंत्रें सुटलीं. दत्ताजी शिंदे यांचें दुःख

एकीकडे ठेवून बहूतच आनंद जाहाला, खुशाली केली. सूर्योदय जाल्यावर मल्हारराव यांची स्त्री गौतमाबाई व तिची सून, खंडेराव होळकर याची स्त्री, अहिल्याबाई डेरियास उभयतां आल्या. त्यांणींही खुशाली करून गजांवर शर्करा वांटल्या. मोठे संकटीं पांच दिवस मुकाम करून कूच केलें. ते माळवियांत येऊन पोंचले. शिंदे यांचे बुणगे व बायका उज्जनीस राहिल्या. मल्हारराव यांची मुलें माणसें, भारघडी इंदुरास राहिलीं.

[ कलम ७६ ते ८६ ]

## २. कर्मणो गहना गतिः

मोंगल आपले तळावरि तयार होऊन जमावसुद्धां आंवळून उभा राहिला. तों भाऊसाहेब याणीं मसलत केली कीं, "आपण नीट चालून जावें. आम्हांस गिलचानें वाट देऊत एकीकडे बगल मारून जाहला तरि यासि आपलें लढाईचें प्रयोजन नाहीं. आणि मार्ग मोकळा करीत नाहीं तरि मर्धीच घोडे घालून मारामार करीत उधळून, मार देत, नीट निघोन जावें." अशी मसलत केली. रात्रीं मनसबा केला होता तो राहिला आणि पुढे होणार 'विनाश-कालीं विपरीत बुद्धी' निर्माण जाली. तेसमयीं सर्वत्रांस सांगून आराबा अवघा मागें टाकून, निशाणें सोडून, फौजा पुढें चालिल्या. तेव्हां फौज जमूनही नव्हती. मुजऱ्यास धारसा धरावा तैसा फरा बांधोन फौज उभी राहिली. तेसमयीं इब्राहिमखान गाडदी याणें हें पाहून चित्तांत विचारणा केली कीं, "रात्रौ भाऊसाहेब यांणीं मनसबा केला काय ? आणि कर्तव्य हें केलें काय ? असो. आतां मसलतीस धक्का पुरता बसला. उपाय अवघाच राहिला. भाऊसाहेबांच्या बोलण्याची शाश्वती पुरती समजली. असो. आम्हीं भाऊसाहेब इमान दिलें आहे. त्यापेक्षां आतां मागें पुढें पहावें तरि आपले पूर्वजांस बोल लागेल. भाऊसाहेब जें करतील, त्यास सादर न होतां गत तर नाहीं. दैवीं असेल तैसें घडेल. परंतु रणांत विन्मुख व्हावयाचें नाहीं. असो, आपले आयुष्याची सीमा होऊन शंभर वर्षें आतांच पूर्ण भरलीं, हें खरें. आतां 'आपलें बळें घालावी कास, कोणाची न धरावी आस,' तैसें घडलें." इब्राहिमखान गारदी याणें आराबा सोडून तोही डावे बाजूस आला. बुणगे व तोफखाना झाडून मागें मोकळा राहिला.

इकडे झाडून मोंगल तयार होऊन तोही युद्धास उभा राहिला. तेसमयीं अबदुल अलीकडील वकील भाऊंकडे आले. "आजचे दिवस झुंजास तहकुबी करावी, सलयाचें बोलून ठीक करितों. उतावळी न करणें." म्हणोन बोलले. भाऊसाहेबीं त्यांस धिःकार करून माघारें लाविलें. परस्परें गोळागोळीस तोंड लागलें. त्यांजकडील तीनशें तोफा, व गनिमांकडील दोनशें तोफा, एकदांच सरबत्ती झाली. शिवाय घाकटीं यंत्रें, हस्तनाला व सुरतनाला व जेजाला व बंदुका व रेकले ह्यांस गणित नाहीं. मोठीशी गर्दी होऊन गेली. धुराचे गर्दीनें सूर्यबिंब आच्छादिलें. कोणाची खबर कोणास नाहींशी जाली. त्यांत शूर होते त्यांस वीरश्रिया आल्या. भ्याड होते त्यांस ऐसें जालें कीं, 'घरणी माय दे ठाय' तैसें जालें. धडाकियाखालीं घोडे मनुष्यें धुंद जालीं. व रणतुरे रणभेरी व आराबियाचीं वाद्यें यांचा एकदांच कल्होळ जाला. उभय दळें मिळतीं जालीं. तों हुजरातीची फौज, बहूत दिवसांचे खानदान लोक होते, त्यांणीं कृत-संकल्प केला कीं, "बहूत दिवस यांचें अन्न भक्षिलें आहे. त्याची उत्तीर्णता आज आहे." म्हणोन त्यांजवरि हुजरातीनें कडनिकड करून घोडे घातले. झुंजास तोंड लावून घाव केला, क्षणभर हुतुतू सारिखे त्यांस मोडूनही घालविलें. एक वेळ यांसही मोडून ते माघारें घालवीत. अशा पांच सात हिराहिऱ्या जाल्या. तों विठ्ठल शिवदेव व यशवंतराव पवार कांहींसें पुढें वाढून गेले. त्यांजवर झुंज पडलें. तेव्हां हे कच खाऊन माघारे तोफखान्यांत येऊन उभे राहिले. दमाजी गायकवाड यांजवर गिलच्यांनीं येऊन नेट बसविला. तेही माघारे येऊन उभे राहिले. मुकामीं गोटाचा गोट येऊन उभा राहिला होता, त्याप्रमाणें पथकें उभीं होतीं. त्यांजवर खांसा अबदुल अली त्या झुंजावरि डावे बाजूस होता, त्यानें झुंज भारी केलें. कुल भाऊसाहेब यांजकडील पथकें माघारीं फिरवलीं. हलके बहुत जाले. इब्राहिमखान गाडदी यावर खांसा दुराणी व रोहिला यांणीं चालून घेतलें. यांची एक रंजक उडाली. दुराणी-कडील लोक बहुत पडले. परंतु जाग्यावरून हालले नाहींत. तैसेच नेट धरून मारीत आले. आणि इब्राहिमखान गाडदी याजवरि चालोन आले. इब्राहिम-खान गाडदी याजवरिच पडले. कुमक कोणीच केली नाहीं. तथापि संभाळून येऊन हुजरातीचे लोक व आपण एक होऊन संधान साधिलें. तोफाही सुटत होत्या. लढाई मना जाली नव्हती. मातबर एक प्रहरपर्यंत लढाई केली.

इकडे उजवे बाजूस शिंदे होळकर होते. यांजवरि सुजाउद्दौला वगैरे यांणीं येऊन झुंज दिलें, झुंज मातबर होऊं लागलें. मध्यें भाऊसाहेब व विश्वासरावसाहेब अंबारींत होते. ते उतरून घोडियांवर स्वार जाले. भाऊसाहेब बोर घोडीवर व रावसाहेब पीलबाला घोडा याजवरि स्वार जाले. चहूंकडून संभाळून होते. झुंजाचें तोंड भारी लागलें. मारामारी होतच आहे. मातबरच खांसे हुजरातींतील पडों लागले. तेसमयीं विश्वासराव हुजरातीच्या लोकांत येऊन त्यांनीं घोडे घातले आणि घाव केला. तों ईश्वरी क्षोम जाला. एकाएकींच छातीमध्यें गोळी लागून विश्वासराव ठार जाले. नानासाहेबांचें निधान हरपलें. लोकांनीं कडनिकड करून मुर्दा अंबारींत घातला. आणि वरती शालजोडी घातली. हें वर्तमान भाऊसाहेबांनीं पाहून अवसान सोडिलें. बहुतसा विलाप करूं लागले. मग त्या त्वेषानें भाऊसाहेबांनीं निश्चय केला कीं, या उपरि गिलचा खाशानिशीं मारीन. म्हणोन लोकांस ताकीद केली. आणि झुंज केलें. हाणा ! हाणा ! असें मुखें बोलोन बरोबर समशेर बहादर घेऊन पुढें जाले. आणि तीन वेळ हत्यार केलें. त्या इरेनें लोकांनीं हिंमत धरून, भाऊसाहेबांबरोबर पुढें सरसावून शिपायगिरी बहूत केली. दुराणी व रोहिला माघारां फिरविला. अबदुल अली पळोन नदीतीरास गेलीं. शर्थ जाली.

पुढें [ असें जालें. ] विठ्ठलराव शिवदेव यांणीं पेशजी गिलचे चाकर ठेविले होते. ते दोन हजार होते. त्यासमयीं त्यांस इशारतीस भगवा पटका दिला होता. तो डोईस बांधून फिरत होते. तेसमयीं विश्वासराव पडले ही खबर. बुणगियांत आली. त्याजमुळें बुणगे व लष्कर गडबडलेंच होतें. गिलचे चाकर यांनीं भगवा पटका टाकून दिला, आणि बुणगियांत आवई घातली आणि लुटूं लागले बुणग्यानें पळ काढिला. बुणगें पळतें हें पाहून विठ्ठल शिवदेव यांणींही पळ काढिला. आधींच विश्वासराव यांचें वर्तमान ऐकून दहशत खादली होती. कोणी दम धरून बुणग्यांत राहीनासें जालें. [ गिलचे चाकर यांणीं ] लुटीची आवई घातली आणि धुमाळी मांडिली.

इकडे भाऊसाहेबांकडे युद्ध होतच होतें. भाऊसाहेब यांची स्त्री पार्वतीबाई तेथें अंबारींत होती. अंबारीस अंबारी तटली होती. युद्धाचे धुंदींत घाबरी होऊन अवघें लक्ष पुढेंच होतें. तों एकाएकींच मुर्दा अंबारींत पाहिला आणि बाईनें माहातास पुसलें कीं, "मुर्दा कोणाचा आहे?"

त्याणें उत्तर केलें कीं, “ विश्वासरावसाहेब ठार जाले! खवासखान्यांत खिजमतगार होता, त्यास सांगोन तोंड उघडून पाहिलें. तों रावसाहेब मृत्यु पावले हें देखिलें. पार्वतीबाईनीं पाहून ऊर कपाळ बडविलें. शंखध्वनी केली. आणि बोलती जाली कीं, “ईश्वरा! आम्हांस एवढें निर्वाण कां दाखविलें? रावसाहेबांसारिखें रत्न हरपोन गेलें!” म्हणोन बहूतच शोक करिती जाली. तों जवळ नाना फडणीस यांची मातुश्री होती तिणें शांत केली कीं, “ बाई! रडें ईश्वरें ओढूनच आणिलें आहे. एवढ्यावरच मुक्त जालां असा अर्थ नाहीं. अजूनही सर्वत्र महा अनर्थापात आहे. यांत ईश्वर पार पाडील तर बरें, नाहीं तर रडें लागलेंच आहे. तों पावेंतों दम खावा.” म्हणोन शांत केली.

इकडे हुजरातीनें व इभ्राहिमखान गाडदी याणें कडनिकड करून, एक वेळ दुराणीस मोडून त्याचे जाग्यापावेतों तुडवीत तुडवीत गेले. ते समयीं अबदुलअली दुराणी केवळ नामर्द, यमुना-तीरानें दोन कोस पळाले. हें नजीबखान याणें ऐकून व पाहून दातानें ओंठ चावून हवदियांतून पाय उतारा जाला. तैसाच दुंदेखान रोहिला व अहमद लंगडा असे पाय उतारा जाले. आणि शिंदे होळकर हे उजवे बाजूस आहेत, ऐशी बातमी आणून त्यांस सोडून डावे बाजूस चालोन घेतलें. आधीं तोंड समशेर बहादर याजवर बसविले. तेसमयीं समशेर बहादर याणें मारामारी बहूत केली. तों फौजेनें हातच सोडिले. आंगें पाहिजे तितकी केली. अंगावर जखमाही बहूत चढल्या. परंतु फौज फुटून गेली. तैसेंच अनुक्रमें दमाजी गायकवाड यांजवरी तोंड बसविलें. त्यांणींही क्षणभर मारामारी केली. परंतु तेही बाजूस निघाले. तैसेच विठ्ठल शिवदेव व अंताजी माणकेश्वर व यशवंतराव पवार यांजवरि येऊन वर्षले. तेव्हां त्यांणींही करावयाची तितकी बहूतच केली. परंतु फौज जमून नाहीं. यास्तव सर्वांचेच उपाय राहिले. पवार यांचें मुंडमोचन करून इभ्रामखान गाडदी याजवर तोंड लाविलें.

इकडे भाऊसाहेबांकडे लढाई होतच होती. होतां होतां मारामारी खणाखणी जाहाली. येसमयीं विश्वासरावसाहेब यांचें वर्तमान ऐकून जनकोजी शिंदे व तुकोजी शिंदे यांणीं मारामारी करीत [ ते ] भाऊसाहेबांपाशीं आले. तों इभ्राहिमखान गाडदी याजवरि [ रोहिले ] येऊन पडले. त्याणें जिवाचा

निधडा करून तटून उभा राहिला. शिपायगिरी म्हणावी तैशी केली. कितेक गाडदी खेताम आले. परंतु कुमक कोणाची जाली नाहीं. मग एके क्षणांत पांच हजार गाडदी ठार जाले. होते कीं नव्हते असे केले. हुजरातीचे लोक जवळ होते ते पळों लागले. गाडदी ठार झाल्यामुळें तोफखाना बंद जाला. जातीनिशीं शिकस्त त्याणें पुरती केली. जाऊन गिलचाच्या लष्करांत मिसळला. आणि दाहा पांच नामांकित सरदार दुराणीचे मारून ठार केले. इतरांची गणतीच नाहीं. भोंवताला वेढा गिलचे यांचा पडला. इभ्रामखान यांचे आंगावरि जखमा भारी चढल्या. दुराणी पळोन गेले होते ते माघारे आले. गाडदी यांचे मुर्दाचे ढीग पडले. इभ्रामखान गाडदी याचा पुत्र व भाचा होता तो ठार जाला. खांसा इभ्रामखान गाडदीही रणांत घायाळ जाला. असें असतां लढतच होता. यत्न चालेना तेव्हां हत्यार राहिलें. मग दुराणी यांनीं धरून नेला.

हें वर्तमान भाऊसाहेबांस कळलें. चोहोंकडून प्रळय एकदांच जाला. मोठी धुंदी जाली. यशवंतराव पवारही ठार जाले. कोणास कोणी पुसेनासे जालें. जाग्यावरच इभ्रामखान गाडदी होता कीं नव्हता असें जाहालें. इकडे मल्हारराव होळकर यांचे बाजूनें झुंज मातबर जालें. रेटत नाहींसें जालें, तेव्हां तेही बाजू सोडून निघाले. मग केवळ तोंड हुजरातीवर बसविलें. तेसमयीं हुजरातीनें जितकी शर्थ करावी तितकी केली. जेथून मराठियांचें राज्य जालें ते दिवसापासून झुंजें होत आलीं; परंतु याप्रमाणें मराठे कधींच झुंजले नव्हते. भाऊसाहेब यांणीं नांवनिशीवार असाम्या हटकून घालविल्या. आणि आपणही खांसा अगोदरच घोडियावर स्वार जाले होते. विश्वासराव ठार जाले, त्यापेक्षां आतां नानासाहेबांस तोंड काय दाखवावें? म्हणोन. शोकांतच होते. तों अवघा मार भाऊसाहेबांवर येऊन पडला. तरवारीची खणाखणी जाली. डुकर खळीस येतो तैसा प्रकार जाला. भाऊसाहेब लोकांत गर्द जाल्यावर घोडीं मनुष्यांनीं खंदक भरला. माणसें दिशाभूल जालीं. कोणीकडे पळावयाचें हें सुचेनासें जालें. तों तिसरा प्रहर जाला.

उपरांतिक चार घटकांपर्यंत भाऊसाहेबांनीं हुजरातीनिशीं मारामार केली. परंतु डावे बाजूनें हातच सोडिले. आभाळ फाटलें. तेथें ठिगळ कोठवर लावावें? मग भाऊसाहेब घोडियावरून पायउतारा जाले. भाऊसाहेब यांचे तोंडास

हाणा! हाणा! हेंच करीत असतां खरस आली. जातीनिशीं मोठा हिया करून बहूत झुंजले तें कोठवर लिहावें ? सरकारचे मुत्सद्दी मातबर तमाम एकीकडे कुल पळून गेले. तेसमयीं सोनजी भापकर यांस भाऊसाहेब बोलिले कीं, "सोनजीबाबा, यासमयीं निघावयाचें नव्हतें. तुमचा भरंवसा बहूत धरिला होता." तेव्हां [ सोनजी ] बोलिले कीं, "लोक पळतात त्यांस माघारे फिरवितों. साहेबास टाकून आम्हीं कोठें जावें ?" असें बोलून लोक फिरावावयास म्हणोन गेले, ते तिकडेच गेले! तेव्हां तुकोजी शिंदे म्हणो लागले कीं, "महाराज, क्षत्रधर्माची शर्थ जाली. चोहींकडून आभाळ फाटलें. यो उपरि निघावें यांत उत्तम आहे." तेव्हां भाऊसाहेबांनीं उत्तर केलें कीं, "तुकोजीबाबा, आतां कोणीकडे जावें ? काय तोंड नानासाहेब यांस दाखवावें ? रावसाहेबांची गत काय जाली ती पाहावी. आणि इभ्रामखान गाडदी यास इमान दिलें तें काय ?" असें ऐकून मागती तुकोजी शिंदे यांणीं उत्तर केलें कीं, "भाऊसाहेब, तुम्ही वांचलां तरि अवघ्यांचा सूड घ्याल. नाहीं तर तुमचे मागें अवघ्याच गोष्टी आटोपल्या." असें ऐकून मागती भाऊसाहेब बोलिले कीं, "पुणियांत नानासाहेबांस तोंड काय म्हणोन दाखवावें ? निघावें, अशी गोष्ट घडणार नाहीं. रणाचे ठायीं ईश्वरसत्तेकरून जें घडणार असेल तें घडेल. परंतु कदापि नामोहरम व्हावयाचें नाहीं." असें म्हणतांच तुकोजी शिंदे यांणीं घोडियावरून उडी टाकिली. आणि जातीनिशीं हत्यार केलें. तेथें मोठी मातबर मरदोमी करून, मराठी धर्माची शर्थ करून खस्त केली. तेव्हां अकस्मात गोळी लागोन ठार जाले. जरीपटकियाचे निशाणावर आधींच दाटी जाली होती. तेव्हां हत्तीवरून उतरून घोडियावर घेतलें. निशाण गुंडाळून झाडून पळों लागले. तेव्हां भाऊसाहेबांनीं शाहाजणें वाजविण्यास आज्ञा दिली. फत्ते जाली. शाहाजणें वाजतात, याजमुळें तरी लोक माघारे फिरतील, या अर्थें शाहाजणें वाजतात असें करूं लागले. परंतु ज्यांनीं पळ काढिला त्यांपैकीं कोणी माघारे फिरले नाहींत. भाऊसाहेब यांचे तोंडास खरस आली. हाणा! मारा! म्हणावयाचे राहिले. तोंडापुढें कोणी ओळख्या आला तरि तोंडानें मात्र हुंकार देऊन मानेचे संज्ञेनें दाखवूं लागले. अंगावरि ब्रह्मांड येऊन कोसळलें. परंतु हिंमत हरली नाहीं. भाऊसाहेब यांजप्रमाणें पराक्रमी

दुसरा होणें हे असाध्य गोष्ट. जाग्यावरि हजार बाराशें मात्र उभे राहिले. चोहोंकडे एकदांच आभाळ पांढरें जालें. जिकडील तिकडे पळोन गेले. भाऊसाहेब यांजपाशीं जनकोजी शिंदे व रावसाहेब यांचे मुर्दाचे हत्तीपाशीं शें-पन्नास लोक उभे होते, तेवढे मात्र बाकी राहिले. सभोंवता वेढा पुरा पडला. युद्ध बहूत केलें. पूर्वी युद्धांत अतिरथी, महारथी झुंजले, त्याप्रमाणें भाऊसाहेबीं विरथीपणें शर्थ केली. पुढें कांहीं इलाज चालेनासा जाला. दुराणी व नजीबखान रोहिला असे चाळीस हजार फौजेंतून दाहा बारा हजार फौजेनिशीं भाऊसाहेब यांजवर येऊन वर्षले. ते समयीं मारामार अशी जाली कीं, 'न भूतो न भविष्यति' एकदांच भोंवताले वेष्टून उभे राहिले. आंत रंवदळारंवदळ क्षणभर बहूतच केली. त्यांत भाऊसाहेब व जनकोजी शिंदे यांची गत कैशी जाली, हें न कळे. उभयतां खांसे कोणी दृष्टीनें पाहिले नाहींत. गयफ जाले, किंवा अस्मानांत गेले, कीं पृथ्वींत गेले, हें ईश्वरी कौतुक ब्रह्मादिकांस न कळे. तेथें मानवियांस काय कळेल ?

इकडे मल्हारराव होळकर याजवरि गुदरली. तेसमयीं आभाळास ठिगळ कोठवर लावील? उपाय राहिला. तेव्हां मग पंचवीस स्वारांनिशीं बाजू देऊन निघोन गेले. रावसाहेबांच्या मुर्दाचा हत्ती व भाऊसाहेबांची बसती घोडी अशीं सुजाउद्दौला याजकडे सांपडलीं.

याजवर इकडे पार्वतीबाईचे बंदोबस्तास विसाजी कृष्ण जोगदंड यांस पांचशें धनगर नेमून देऊन रखवालीस बरोबर ठेविलें होतें. त्यास आज्ञा केली होती कीं, "आम्ही झुंजून पार निघालों असें कळलें तरि तुम्हीं यांस घेऊन दिल्लीचे रोखें आमचे मागें पिछाडीस घेऊन यावें. आणि रणांत पडलों असें वर्तमान ऐकल्यावर यांस तुम्हीं जिवें मारून निघोन जावें. गिलच्यांचे हातीं भाऊसाहेब यांची स्त्री जिवंत सांपडली, असा लौकिक मात्र न होईल तें करावें." असें निश्चयरूप सांगून त्यांस रखवालीस ठेविलें होतें. तों मोड जाला. लोक पळों लागले. ते समयीं विसाजी कृष्ण व लोक यांणीं धास्त खाऊन, बाईची आस्था सोडून आपले जीव वांचविले. कोणीकडे गेले त्याचें ठिकाण नाहीं. भाऊसाहेबीं सांगितलें होतें, त्याप्रमाणें कांहींच घडलें नाहीं. तों एक घटिका दिवस राहिला. ते समयीं पार्वतीबाई अंबारींत होती, तिनें हत्ती बसवून, पायउतारा होऊन, बुणागियाचे रोखें पळूं लागली. केवळच

भाबावली. घरचा पोरगा कोतवाल घोडी घेऊन उभा होता. तो "बाईसाहेब, घोडीवर बसावें" असें म्हणों लागला; परंतु तिजला घोडियावर बसावयाचें देहभान राहिलें नाहीं. त्या समयीं जानू भिंताड्या खिसमतगार मात्र एकटा जवळ राहिला होता. त्याणें हिंमत धरून सोबत दिली. तशा आकांतांत बारवेकर म्हणून मातबर मनुष्य व घोडें ही सख्त पाठाळ होतें, त्याची गांठ पडली. तेव्हां त्याज बोलिली कीं, "मी भाऊसाहेबांची स्त्री आहें. मजला घोडियावर घ्यावें." म्हणतांच तोही मनुष्य चांगला भला, तो हिंमत धरून बोलिला कीं, "बाईसाहेब, रिकिबींत पाय देऊन घोडियावर यावें." म्हणतांच तिणें रिकिबीस पाय देऊन [ त्यानें ] पाठीवर घेतली. आणि तिच्याच शालजोडीनें कंबरेस पाठीमागें बळकट आंवळून बांधिली. आणि भोंवताली नजर केली तों गिलचे अवघे भोंवताले, मागें पुढें ढिगांचे ढीग देखिले. तेव्हां बाईस बोलिला कीं, "बाईसाहेब! निभावणीचें कठीण दिसतें. असो, तुमचे सुकृतें तरी पार पडलों तरि पडून जाऊं." म्हणोन त्यानें डोळे झांकून फौजेंतून घोडें घातलें. तों बाईचें पुण्य सबळ, म्हणोन अशा अरिष्टांतून पार पडली. तों दिवसही अस्तमान जाला, कोसपर्यंत गिलचे यांणीं पाठलाग केला. परंतु पाठाळ सक्तशीर होतें म्हणून तशांतून निभावून गेली. नाना फडणवीस यांची मातुश्री श्रीभागीरथीचे यात्रेस जावयासि आली होती ती गिलचे यांजकडे सांपडली. तिची यात्रा सफळ जाली. नानाची स्त्री होती ती मात्र रणांतून बाहेर आलियावरि तिणें घोडी टाकून दिली. ती पायउतारा होऊन अंगावरील दागिने काढून, फाटकें वस्त्र नेसून अंगास माती लावून दिल्लीच्या रोखें गेली.

दुसरें वर्तमान झुंज झाल्यावरि झुंजांतून मातबर सरदार व लहान थोर किती एक लोक आले ते पश्चिमेकडे झुंजांत तळावरी खंदकांत येऊन दाखल जाले कीं, भाऊसाहेब माघारे पळोन पूर्ववत प्रमाणें तळ बळकावून राहतील. या मागें नित्य झुंजास जात असत, तेव्हां संध्याकाळीं माघारे फिरून येईल त्याप्रमाणें येतील. म्हणोन माघारे बुणगेसुद्धां खंदकांत दाखल जाले. तों तेथील बुणगे व फौज पळत आहे, तेव्हां तेथेंही धीर धरवत नाहींसा जाला. मग निराशा जाणोन तेथून जिकडे वाट सांपडेल तिकडे पळत चालिले. ज्यांचे घोडियास जीव होता ते खंदकपार जाले. ते पाणिपत शहरांत गेले. तेथून

जिकडे ज्यांस जैसा मार्ग दृष्टीस पडला तैसे निघोन गेले. कितीएक बायका वगैरे अवसान-रहित होते ते खंदकांत पडले. खंदकांतून त्यांस निघावयाचें जालें नाहीं [तीं] तेथेंच राहिलीं. गिलचे डोचकीं कापीत होते. तीं कापावयाचीं सोडून दिलीं. कोठवर कापितील! कंटाळले. त्यांची हौस पूर्ण जाली. मोडली फौज दिल्लीच्या रोखें गेली. वरकड कोणी कुरुक्षेत्राकडे आणि आडवीं तिडवीं गेलीं. तीं कांहीं निभावलीं नाहीं [त]. गिलचे यांजकडील लोक यांणीं पाणिपत शहराची बंदोबस्ती करून खंदकांतील मालमत्ता लुटूं लागले. कितीएक बायका धरून नेल्या. कितीएकांनीं जिवेंच मारिल्या. तीच गत पुरुषांची केली.

प्रातःकाळच्या प्रहर दिवसानंतर झुंजास तोंड लागलें होतें तें तीन प्रहर हाणा! हाणा! मारा! मारा! हेंच जाहालें. पृथ्वीनें बहूत अशुद्ध प्राशन केलें. हिंदूंमध्यें मागें याप्रमाणें युद्ध होऊन कत्तल जाहाली नाहीं. यापुढेंही होणार नाहीं. तथापि भगवंताची करणी, कुल पृथ्वींतील लोक नेऊन त्या स्थानीं मारावें, हें कौतूक निर्माण जालें. मराठे लोक फौजांसुद्धां हटोन कि धीं म्हणोन स र दा र करीत [होता? [?] त्याणें मागती अ णि खि ल्या होत्या [?] आपल्या फौजां भोंवताला खंदक खणून कोणीही राहिले होते कीं काय? उत्तम प्रकारें गांठ पडली तरि झुंज द्यावें, नाहीं तरि पळोन जावें. हा मराठी धर्म पुरातन चालत आहे. तेणेंकरूनच पृथ्वीस पलाण घातलें होतें. तें सोडून अविंध धर्माचा अविलंब केला. तेणेंकरूनच समस्त पृथ्वीचे, दक्षिण प्रांतीचे बहूत लोक व बायका अमूप गैब जाल्या. ईश्वरसत्ता प्रमाण. त्याणें ब ई गी स करावी. नानासाहेब व भाऊसाहेब ईश्वरी अंश; अवतार धरून कलियुगीं याणीं चरित्र केलें.

यानंतर इकडे झुंज होतां होतां रात्र जाली. झुंज बंद जालें. हत्यारें राहिलीं. विश्वासराव यांच्या मुरद्याचा हत्ती अंबारीसुद्धां सुजाउद्दौला याजकडे नेला होता. ते समयीं सुजाउद्दौला याजकडील उमरावगीर गोसांवी म्हणोन सरदारी करीत होता. त्याणें मागती आणखी तीन लक्ष रुपये देऊन विश्वासराव व तुकोजी शिंदे व संताजी वाघ व यशवंतराव पवार असे चार मुरदे सोडवून आपणाकडे ब्राह्मण व मराठे मिळवून, त्यांस विधियुक्त अग्निसंस्कार करून मुरद्याचें दहन केलें आणि अस्थीही वाराणशीस रवाना केल्या.

वरकड मोडकी फौज नाना पुरंदरे व बाजी हरी व अंताजी माणकेश्वर व मल्हारराव होळकर असे रात्रौ दिल्लीचे सुमारें चालले. परंतु तमाम लोकांची हिंमत हरली. गाइचे गोरे आले. रांडांनीं मारिलें तरी कोणी कोणास मिळेनासे जाले. रात्रौ दांडग्यांच्या हुल्डींत अंताजी माणकेश्वर व बाजी हरी ठार जाले. त्यांचे मुरदे देखील कोणीं काढिले नाहींत. वेडावल्यासारखीं माणसें जालीं. एवढाले श्रीमंत त्याच्या गती या प्रकारच्या जाहाल्या! 'कर्मणो गहना गतिः' असें जाहालें.

---

# क्रमांक ७ : : श्रीमंत भाऊसाहेब यांची कैफियत

## १. 'आजच कूच करून जातों'

त्यानंतर हिंदुस्थानांतून राजश्री जनकोजी शिंदे यांचीं पत्रें आलीं कीं, आबदल्ली गिलचा दुराणी एक लक्ष फौजेनशीं बळ धरून दिल्लीस आला. दिल्लीनजीक दोन कोशावर चाळीस हजार फौजेनशीं दत्ताजी शिंदे होते. गिलच्यानें दिल्लीं घेऊन आपल्या तर्फेनें बादशाहा बसविला, म्हणजे आपला अंमल बुडेल, अशामध्यें जाऊन तोंड टाकावें म्हणोन दोनशें स्वारांनशीं जाऊन गिलच्याचे फौजेंत मिसळले. तों गिलच्यांची फौज भारी. चहूंकडून वेढा घालून दत्ताजी शिंदे यांजला निघावयास जागा नाहीं असें जालें. जातीनिशीं बहुत तरवार केली. इतकियांत छातीवर गोळी लागली. दत्ताजी शिंदे ठार जाले. तेथोन चढाई करून गिलच्याची फौज शिंदे यांचे फौजेवर आली. तेथें फौज शिंदे यांची व गिलचांची लढाई जाली. जनकोजी शिंदे यांचे दंडावर गोळीची जखम लागली. फौज कचरली. मोड जहाला. फोजेस पळ सुटला. कत्तल करूं लागले. चार हजारे फौज लुटून दस्त केली. बाकी राहिले ते व जनकोजी शिंदे खांसा ऐसे पळत जाटाचे मुलकांत राहिले. ऐसे वर्तमानाचीं पत्रें बसून एके जागां वाचलीं. विस्मय जाला. पुढें हिंदुस्थानांत खांसे स्वारी निशीं जावें अथवा फौज रवाना करावी हा मजकूर पडला.

दुसरें वर्तमान आलें कीं, गिलचा यमुनानदीपार होऊन दिल्लीपाशीं आला. दिल्लीस दाखल होऊन हिंदुस्थानांतील सर्व संस्थानिक त्यास सामील जाले. दिल्लीचा किल्ला घेऊन, पूर्वील पातशहास काढून आपले तर्फेनें पातशहा स्थापिला. आणि दक्षणेस चाल करावयाची उमेद आहे. या प्रांतींचे संस्थानिक कुल त्यांसि सामील जहाले आहेत. नजीबखान रोहिला बारा हजार फौज व सुजाद्दौला पंधरा हजार आणिक कितेक संस्थानिक ऐसे त्यास सामील जहाले. आपणांकडील ठाणीं अंतरवेदींतील व जयनगर वगैरे देखील माळवा गडबडलीं आहेत. यासमयीं फौजा पाठवून यांस तंबी पोंचली तरि उत्तम. नाहीं तरि परिछिन्न ठाणीं या प्रांतींची उठतात. अशीं पत्रें मल्हारजी होळकर व शिंदे यांचीं आलीं. तीं वाचून, बहुत दिलगीर होऊन, राजश्री दादासाहेबांची रवानगी हिंदुस्थानांत करावी हा सिद्धांत करून श्रीमंत [व] राजश्री भाऊसाहेब एकत्र होऊन दादासाहेबांस बोलावून सांगितलें कीं, "हिंदुस्थानांत जावें. तुम्हीं गेलें पाहिजे." तेव्हां दादासाहेब बोलिले कीं, "पूर्वीं आपण तह केलेत ते साठ लक्ष रुपये कर्ज जहालें. तें वारल्याशिवाय आम्हांस जावयास अनकूल पडत नाहीं." तेव्हां भाऊसाहेब बोलिले कीं, "मुलुखगिरीस जावें तें कर्ज घेऊन घरास जावें कीं काय? किंवा द्रव्य मेळवून घरास यावें? तथापि तिकडील तिकडे लोकांची समजाविशी करावी." तेव्हां श्रीमंत बोलिले कीं, "दादासाहेबांचे कर्ज वारून जाऊं तेव्हां त्यांस मुलुखगिरी सांगूं. सांप्रत आम्ही जाऊं अथवा तुम्हीं जावें." तेव्हां भाऊसाहेबींही सांगितलें कीं, "साहेबीं हिंदुस्थानांत मुलुखगिरीस जावें [मग] आम्हीं जवळ आसोन काय करावें? आम्हास आज्ञा द्यावी. आजच कूच करून जातों." ऐसे बोलोन, आज्ञा घेऊन, तेच दिवशीं कूच करून, आंबेपडदुराहून स्वार होऊन बऱ्हाणपूरचे रोखें चालिले, तीन कोशांवर डेरे दिल्हे. मुक्काम जाला. राजश्री विश्वासरावही समागमें चालिले. चार दिवस मुक्काम होता. सौभाग्यवती गोपिकाबाई भाऊसाहेबापाशीं जाऊन बहुत प्रकारें सांगितलें कीं, "तुम्हीं जावें ऐसे नाहीं. दादासाहेब म्हणतील तें कबूल करून त्यांची रवानगी करावी. आपण येथोन त्यांस सरंजाम पोहोंचता करावा. येणेकरोन बहुत उपयोग आहे," असें सांगितलें, परंतु विचारास आलें नाहीं. गोपिकाबाई फिरोन आंबेपडदुरास आली. [पा. ६–८]

## २. क्षात्रधर्माची शर्थ

या नंतर कुरुक्षेत्राकडून आपणाकडील चारण येत होते त्यांची बातमी राखून गिलचानें दोन हजार फौज पाठवून चारण लुटावयास सांगितलें. ही बातमी कळल्यावर विठ्ठल शिवदेव यांजकडील हजार स्वार गरनळ्यावर पाठविले कीं, चारण आला असला तरि त्याजला पुढें घालून लावून देणें. आणि तेथेंच गिलचाची बातमी राखून रहावें. त्याजवरून स्वार गरनळ्यावर जाऊन राहिले. कांहीं चारण रवाना केले. पुन्हा गरनळ्यास होते. त्या स्वारांस लिहिलें कीं, "चारण जमा झाला असेल तितकाच घेऊन येथें येणें, तेथें राहिल्याने गोविंदपंतांची अवस्था होईल." परंतु ते फिरोन माघारे आले नाहींत. गिलचास वर्तमान कळलें कीं, "यांचे लष्करांत चार शेरांची धारण जाली. जे चारण कुरुक्षेत्राकडून येतात, त्यांजवर दोन हजार फौज पाठविली आहे परंतु तोलत नाहींत. गरनळ्यावर बसवून चारण पुढें घालून आणितात." त्यास फौज पाठवून द्यावी म्हणोन आणिक दोन हजार फौज पाठविली. पहिली दोन हजार [होतीच.] हे व ते एकत्र होऊन कांहीं चारण लुटून नेले. दाणे यावयाचे बंद जाले. तेणेंकरून लष्करांत महागाई बहुत जहाली. दर रुपयास ८८१ शेर धान्य जालें. सर्व जिन्नस तीन दिवस याप्रमाणे जाले. अन्नाविणें माणसें मरों लागलीं. तेव्हां श्रीमंताकडेस पुण्यास पत्रें पाठविलीं कीं, "लष्करांत महर्गता बहुत जाली जाहे. सरंजाम येऊन पोंहचत नाहीं. अद्यापि सलूख करून निघावें कीं काय? तह चमेलीपर्यंत मुलुख आम्हीं घ्यावा व पुढें अटकेपर्यंत चवथाई घ्यावी. गिलचानें निघोन आपले मुलकांत जावें. येणें प्रमाणें करार केला आहे. आज्ञा होईल त्या प्रमाणें निश्चयांत आणूं. याचें उत्तर पाठवावें." श्रीमंतांनीं उत्तर पाठविलें कीं, "दहशत खाऊन सलूख करावा, त्यास दादासाहेबीं लाहुरापर्यंत कांहीं मुलुख काबीज करून आपलीं ठाणीं बसविलीं होतीं, तो मुलुख त्यास द्यावा आणि फक्त चवथाई घ्यावी, येणेंकरून दादासाहेब तुम्हांस हंसतील, असें न करावें. गिलचास मारून लुटून पराभव करावा. अटकेपर्यंत मुलुख आपला करावा. सख्यत्व एकंदर करूं नये. त्यास नीट दिसेल तैसें करणें. खांसा स्वारी तयार होऊन कूच दरकूच तुमचे कुमकेस दाखल होत आहेत. चिंता न करावी." ऐसें लिहिल्यावर सल्याचा मनसुबा करण्याची गोष्ट तो राहिली. त्यानंतर

भाऊसाहेबांस न कळतां रावसाहेबांनीं विनंतीपत्र लिहिलें कीं, " गिलच्यांचा पेंच भारी पडला आहे. उलगडत नाहीं. आम्हांसारिखे पुत्र आहेत व पुढेंही होतील, परंतु भाऊ सारिखा बंधु मिळणार नाहीं. अशा प्रसंगीं खांशानशीं येऊन कुमक करावी. " म्हणोन त्याचें उत्तर " आम्हीं जलद येऊन पोहोंचतो " असें पाठाविलें, आणि पुण्याहून कूच करून पैठणावर गेले. लोक वरचेवर जमा करून दादासाहेब व आपण खांसे देखील हिंदुस्थानचे कुमकेस जावयाचा निश्चय करून पैठणास जाऊन दाखल जहाले. पुढें मजल दरमजल जाणार.

या नंतर पाणिपताकडील मजकूर, महागाई बहुत जाली. तेव्हां मसलत करून शिंदे, होळकर यांस सांगितलें कीं, " तुम्ही खांशा फौजेनशीं जाऊन चारण बहुत आणावें. गरनळयास लोक ठेविले आहेत, त्यांणीं लिहीलें आहे कीं, मातबर फौज आल्याखेरीज चारण एकही येत नाहीं. अन्नामुळें लष्कर मेलें जाईल. म्हणोन त्याजवरून शिंदे, होळकर दहा हजार फौजेनिशीं चारण आणावयासि गेले. हें वर्तमान गिलचास समजल्यावर नजीबखान रोहिला व सुजायत डवला पंधरा हजार फौजेनिशीं त्यांचे पाठीवर गेले. त्यांची यांची गांठ गरनळयाचे मैदानांत पडली. तोंडास तोंड लागलें. चारण पन्नास हजार होता. तो सांभाळून पुढें घातला. आणि ते येत असतां रोहिला व सुजात डवला याणें गांठ घालून लढाई केली. चारण लावून देऊन त्यांशीं जुंज दिल्हें. उधळून मुक्कामापर्यंत घातले. आणि चारण सांभाळून आणिले. त्यामुळें दीडशेर धारण जाली. धान्य मिळत होतें. पुढें ज्याचें नांव अन्न मिळेनासे जालें. अन्नामुळें घोडीं माणसें मरूं लागलीं.

पुढें खजीना इकडून कांहीं येत होता त्यास गिलच्यानें मनसुबा करून दिल्लीचा मार्ग बंद करावा म्हणजे हायास येतील या विचारें पहिल्या मुक्कामींहून तळ सोडून दिल्लीकडे मुक्काम केला. दिल्लीस खजीना इकडून स्वार आणावयास गेले होते. त्यास गिलच्या मार्गावर राहिला हें ठावूक नाहीं. हमेशा येत होते त्याप्रमाणें रात्रीचा कांहीं खजीना दिल्लीहून घेऊन येत होते. तों वाटेवर त्या लष्करांत पोंहचले रात्र समय. कांहीं न कळे. यांस भासलें कीं, आपलें लष्कर. म्हणोन घोडियांवरून उतरले. थंडीचे दिवस. त्यांचे लष्करांत गोवराचे आगदी जवळ जवळ जाऊन शेकत बसले. गुडगुड्या ओढूं लागले.

आपले आपले लष्करच्या गोष्टी बोलत शेकत बसले. गोट कोणाचा म्हणोन एका जणानें पुसलें. तो म्हणों लागला कीं, "हें लष्कर गिलच्या पादशहाचें. तुम्हीं कोण कोणाचे?" तेव्हां अवसानें जाऊन धडपडून घोड्यावर बसले. आणि पळों लागले. त्यांचे लष्करांत आवई पडली कीं, छापा आला म्हणोन त्यांणीं तोफेची सरबत्ती दिल्ही. आपले लोक सांभाळून हे आपले लष्करांत दाखल जाले.

दुसरे दिवशीं सर्वत्र सरदारांस व पतक्यांस बोलावून मसलत केली कीं, "गिलचाचें बळ दिवसेंदिवस बहुत जालें. आपलें लष्कर सडत चाललें, बहुत घोडीं मेलीं. मातबर खांसा घोड्यामुळें पायउतारा जाला. एक वेळां हा मुक्काम सोडून बाहेर मोकळे रहावें. दिल्लीचा राबता सोडून दुसरीकडे जावें, पण झाडी मोठी मातबर, मार्ग नाहीं. तोफखाना निभावणार नाहीं. यास्तव दिल्लीच्याच रस्त्यानें जावयास मार्ग उत्तम. परंतु गिलचा वाटेवर राहिला आहे. जाऊं देणार नाहीं. यास्तव बंदोबस्तीनें निघावें. यमुनातीरीं येऊन पांच कोशांवर जाऊन नदी पाठीशीं घ्यावी. पुढें गिलचाचे तोंडावर तोफखाना द्यावा. दिल्ली उजवे बाजूस राखोन दिल्लीहून सरंजाम आणोन सारें लष्कर आबादान करावें. हा मुक्काम सोडून यमुनातीरीं मुक्काम करावा." तेव्हां मल्हारजी होळकर बोलले जे, "गिलचा मार्गावर असतां फाट करून जावयास निभाव कसा होईल?" तेव्हां निश्चय केला कीं, कुल बुणगे सुद्धां जुंज देत, उडवीत, मार देत, मारीत मारीत जावें. आणि मुक्काम केल्यावर चहूंकडून सरंजामही येऊन पोंचेल. लोक आबादान जालियावर पुढें गिलचाचें पारपत्य करूं. हा सिद्धांत केला. तेव्हां शिंदे, होळकर यांणीं सांगितलें कीं, "निभाव जाला तर हा विचार उत्तम आहे. परंतु उद्यांच निघावें ऐसें नाहीं. रविवारीं कूच करून जाऊं." तेव्हां भाऊसाहेब बोलले कीं, "आज मंगळवार आहे. रविवार सहा दिवस आहे. लष्करचे लोक अन्नावीण कितीक मरतील, गिलचाचे लष्करांत जातील, मग जाऊन सार्थक काय? इतके दिवस लष्करचे लष्करांत धीर पुरत नाहीं, तथापि उदईक कूच करावें. मारावें कीं मरावें." हा सिद्धांत करून समस्त सैन्यास ताकीद करून, कुल् सर्वत्रांनीं स्वार होऊन लढाईस निघावें. आपले आपले बुणगे पाठीशीं घालून सांभाळून आणावें. तळावर कांहीं एक ठेवूं नये. जुंज करून पुढें दिल्लीच्या रोखें जाणें आहे. परंतु युद्धाचे सामानानशीं निघावें.

ऐशी बळकट समस्त सैन्यास ताकीद करून प्रातःकाळीं पौष शु॥ ८ बुधवार स्वारी तयार केली. भालदार चोपदार सरकारांतून जागजागा सरदारांसि बोलावूं पाठविले कीं, स्वार होऊन लौकर निशाणापाशीं यावें. पुढें तोफखाना इभ्रामखान गारदी, डावे बाजूस शिंदे होळकर, उजवे बाजूस वरकड, कितेक पिछाडीस, बुणगे मध्यें, याप्रमाणें रचना करून गोलचा गोल चालत सहा घटका दिवसा नंतर निशाणें हत्तीवर देऊन नौबत चौघडा सुरू केला. आणि भाराचे भार चालिले. त्या समयीं दिढा कोसावर जाऊन उभे राहिले. आणि तोफखाना मातबर तोफा निवड करून दिल्या. बाकी तोफा सभोंवत्या चालिल्या. तोफांचे मागें गारदी, त्या मागें सड्या फौजा, त्याचे मागे बुणगे, असा तळ सोडून दिढा कोशावर आले. छकडे व गाडे व कितेक सरंजाम न चाले तो टाकला. मोंगल आपले तळावर आवळून तयार होऊन उभे राहिले. भाऊसाहेबांनीं मसलत केली कीं, "आपण नीट चालून मार्गानें जावें. गिलच्या वाट देऊन एकीकडे जाला तरि लढाईचें प्रयोजन नाहीं. मार्ग मोकळा करीत नाहीं तरि मध्यें घोडीं घालावीं. मारामार करून उपळून मार देत जावें." ऐसें मातबर सरदारांस सांगोन निशाणें सोडून चालिले. तोंड लागलें. प्रथम विठ्ठल शिवदेव, येशवंतराव व माणिकराव कापरे कांहींसे वाढून पुढें गेले. त्यांजवर जुंज मांडिलें. तेव्हां ते कचरून माघारे तोफखान्यांत येऊन राहिले. तों दमाजी गायकवाड यांजवर गिलचानें येऊन कांहींशी मारामार केली. तेही माघारे फिरले. डावे बाजूकडे मुक्कामीं गोटाचे गोट राहिले होते त्याप्रमाणें पतकें होतीं. त्यांजवर खांसा अबदाली त्या जुंजावर डावेकडे होता त्याणें जुंज भारी केलें.

कुल् आपणांकडील पतकें माघारीं फिरलीं. हलके बहुत जाले. इभ्रामखान गारदी याजवर खांसा खुरानशाहा व रोहिला याणें चालोन घेतलें. एक रंजक उडाली. तिकडील लोक बहुतेक पडिले. हटला नाहीं. तसेच नेट धरून मारीत आले. इभ्रामखान गारदी याजवर चाल पडली. कुमक कोणीं केली नाहीं. तथापि हुजरातचे लोक एकत्र होऊन संधान साधिलें. तोफा सुटत होत्या. लढाई मातबर एक प्रहर केली. इकडे उजवे बाजूस शिंदे, होळकर यांजवर सुजात डवला व गोसावी वगैरे यांणीं येऊन [ घाव ] घातले. जुंज मातबर होऊं लागलें. मध्यें भाऊसाहेब व कांहीसे लोक व रावसाहेब हे

उभयतां घोडियावर सांभाळून होते. भाऊसाहेब परी घोडीवर, रावसाहेब दिलपाक घोड्यावर होते. चोहोंकडून लोक सांभाळून होते. जुंजाचे तोंड लावलें. मारामार होत होती. मातबर लोक पडों लागले. इतकियांत रावसाहेब यांस छातीमध्यें गोळी लागोन ठार जाले. हें भाऊसाहेब यांणीं पाहून अवसान सोडिलें. बहुतेक शोक करूं लागले. मुडदा उचलून हत्तीचे अंबारीमध्यें घातला. आणि भाऊसाहेबीं निश्चय केला कीं, या उपरि गिलचा खांशानिशीं मारीन ऐसे जाहलें. आणि लोकास ताकीद करून जुंज लागलें. हाणा हाणा ऐसें मुखें बोलून सर्वत्रांस ताकीद करूं लागले. बरोबर समशेर बहादर होते. ते घेऊन पुढें जाऊन तीन वेळां मागें हटाविलें. त्यांजवर चहूंकडून गिलचानें मार तोफांचा व गोळ्यांचा व शरांचा केला. तेव्हां लोकांनीं हिंमत धरून भाऊसाहेबांबराबर सरसाऊन शिपायगिरी बहुत केली. रोहिला माघारा फिरविला. हल्ला करून मोड करून माघारां फिरविला. गिलचा खांसा पळ काढून यमुनापार दाखल जाला. शिपाई-गिरी भाऊसाहेबांची म्हणावी तैशी जाली कीं, ज्याचें नांव शिपायगिरी. विश्वास-राव पडिले. डावे बाजूचे लोक कचरून माघारे फिरले. अशामध्यें सांभाळून रोहिला माघारा सारिला. अबदाली पळून नदीतीरीं गेला. लढाईची शर्त केली.

विठ्ठल शिवदेव यांजकडेस पेशजी गिलचे चाकर दोन हजार ठेविले. त्यास इशारतीस भगवें फडकें दिल्हें होतें. तें डोईवर बांधून फिरत होते. ते समयीं विश्वासराव पडिले ही खबर लष्करांत बुणगियांत जाली. लष्कर गडबडलें होतेंच. गिलचे चाकर यांणीं भगवें फडकें टाकून दिल्हें आणि बुणगियांत आवई घातली कीं, लुटूं लागले. बुणग्यानें पळ काढिला. बुणगें पळतें हें पाहून विठ्ठल शिवदेव यांणींही पळ काढिला. आधीं राउसाहेबांचें वर्तमान ऐकून दहशत खालीच होती. बुणगें पळतें हें पाहून ते पळाले. डावी बाजू रिकामी होत चालली. रोहिला यांजकडील लोकांनीं लुटीची धुमाळी मांडली. इकडे जुंज भाऊसाहेबांकडे होतच होतें. उजवे बाजूस शिंदे होळकर यांजकडे जुंज होतच आहे. मारामारी होतां होतां भारी खणाखणी झाली. रावसाहेबांचें वर्तमान ऐकोन जनकोजी शिंदे व मुकुंदजी शिंदे यांणीं मोठी मर्दुमकी करून मारामारी करीत भाऊसाहेबांपाशीं आले. तों इब्रामखान गारदी याजवर लूट [?] पडली. त्याणें जिवाचा निधडा करून शिपाईगिरी म्हणावी तैशी केली, ज्याचें नांव शिपाईगिरी. कितेक गारदी [खेतांत] आले व कितेक

ठार जाले. हुजरातींचे लोक जवळचे पळों लागले. तोफखाना बंद जाला. जातीनिशीं तरवार सीमेपरती केली. जाऊन गिलचाचे लष्करांत मिसळला. दहा पांच ठार केले. भोंवता वेढा गिलचाचा पडला. आंगावर जखमा भारी पडिल्या. ऐसें असतां लढतच होता. प्रयत्न न चाले तेव्हा हत्यारें राहिलीं. धरून नेला. तेव्हां हें वर्तमान श्रीमंतास कळलें. मल्हारजी होळकर याचे बाजूवरही मातबर जुंज जालें. रेंटत नाहींसें जालें तेव्हां तेही बाजू सोडून निघाले. भाऊसाहेबांचें हेंच तोंडीं कीं, हाणा हाणा हेंच करीत असतां जातीनिशी मोठा हिय्या केला. बहुत जुंज मातबर केलें तें कोठवर ल्याहावें ! सरकारचे मुत्सद्दी तमाम बिलकुल एकीकडे पळों लागले. सोनजी भापकर यांसि भाऊसाहेब बोलले कीं, "सोनजी बाबा हा समय निघावयाचा नव्हे, तुमचा भरंवसा बहुत धरला होता. उभे रहावें." तेव्हां ते बोलले कीं, "कुल् लोक पळतात त्यांजला माघारें फिरवितों. साहेबांस टाकून आम्हीं कोठें जावें ?" ऐसे म्हणोन लोक फिरवावयास म्हणोन गेला तो तिकडेच गेला. तेव्हां मुकुंदजी शिंदे म्हणों लागले कीं, "महाराज, क्षात्र धर्माची शर्त जाली ! याज उपर निघावें हें उत्तम आहे." तेव्हां भाऊसाहेब बोलले कीं, मुकुंदजी बाबा, आतां कोणीकडे जावें ? काय तोंड दाखवावें ? रावसाहेबांकडे पहावें." तेव्हां मुकुंदजी शिंदे यांणीं घोडियावरून उडी टाकिली. जातीनें हत्यार करवलें तेथवर केलें. मातबर मराठे धर्माची शर्थ करून ठार जाले. जरीपटक्याचे निशाणाजवळ अगोदर दाटी जाली होती तेव्हां हत्तीवरून उतरून घोडियावर घातलें होतें. निशाण गुंडाळून पळूं लागले. तेव्हां भाऊसाहेबी शहाजणें वाजवावयास आज्ञा केली. फत्ते जाली, शहाजणें वाजतात, याजकरितां तरी लोक माघारे फिरतील. या अर्थी शहाजणे वाजवूं लागले. परंतु ज्यांणीं पळ काढिला त्यांपैकीं माघारा फिरला नाहीं. भाऊसाहेब व जनकोजी शिंदे व शेपन्नास लोक व रायाचे मुड्याचा हत्ती इतकी बाकी राहिली. त्यांस भंवता वेढा भारी पडला. तेव्हां युद्ध बहुत केलें, पूर्वीं भारथी अतिरथी महारथी जुंज जालें. त्याप्रमाणें भाऊसाहेबींही लढाईची शर्थ केली. पुढें कांहीं इलाज चालेनासा झाला. त्यानंतर भाऊसाहेब व जनकोजी शिंदे यांची गती काय जाली ती कोणी पाहिली नाहीं. [ पा. १९-२५ ]

---

पठाण यांणीं दुसरे दिवशीं सावर धरून, कुंजपुरा घेऊन, आमचे फौजे-भोवतां घेरा दिल्हा, लढाईचा प्रसंग सोडिला. आमचे फौजेंत पहिले दिवशीं साफी करून, पांच सात कोस जाऊन, तमाम कही वगैरे सामान पंधरा रोजाचें भरून आणिलें होतें. तेव्हां रुपयास अन्न तीन शेर जाहलें. त्याजकडील पठाण लोक सभोंवतें काम करीत, इकडील लष्करची कही पाहून करीत. हत्ती व घोडे व उंट व बैल ह्यांचे मृत्यू शेंकडों पातले. माणसांची गणती काय? तोफखान्याचे गोळे भारी केले. परंतु त्यांनीं गोळे यांचा जिकडे हल्ला (तो जागा) सोडून दिल्हा; आणि हजार दोन हजार पठाण दावघाव पाहून, अचानक येऊन पडोन, गाडदी वगैरेयांस जखमी करून, व कांहीं ठार मारोन, माघारे जाईत. यामुळें इभ्रामखान गाडदी यानें तमाम फौजेस ताकीद केली कीं, लष्कराभोंवता खंदक खणावा. गाडदी यांणीं आपले सरहद्दीपुढें एक भाला खोल खाया खंटली. तेव्हां पठाणाचा लाग कमी येण्याचा पाहिला तेव्हां तेहि चोहोंकडून संकटांत पडले. पन्नास हजार खासे लोक त्याचे होते त्यांपैकीं पंचवीस हजार राहिले. आणि पुढें लढाईनें गलीम जेरदस्त होतां दिसत नाहीं, लढाई टाकून जावें तर मुलकांत काय सांगावें? मालकाजमानी व सुजायतदौला यांस पैका मागावा तर ते म्हणतात कीं, आमचे काम फत्ते करून द्यावें आणि जो पैसा आम्हीं कबूल केला तो घ्यावा, असा अघटित विचार जाहला. त्यास काय करावें म्हणोन सुजायतदौला व मालकाजमानी व अबदलअल्ली वगैरे सरदार एकत्र होऊन तह केला कीं, कोणेही प्रकारें गलीमाशीं सलूख करावा, सांप्रत कोणीं हरविलें नाहीं व कोणीं जिंकिलें नाहीं, ऐशीयांत सामदाम करून यश संपादावें. म्हणून अवघियांचें चित्तांत येऊन विचार केला आणि सांडणीस्वार याजबरोबर पत्र पाठविलें कीं, परस्परें भांडोन मुलूख बुडवावा यांत विशेष काय आहे? जें जाहलें तें उत्तम, सांप्रत तुमचा सलूख हाच कीं सुदामतप्रमाणें जे ठिकाणीं तुम्ही अंमल करतां ते ठिकाणीं करावा, दिल्लीपतीची मर्यादा तुम्हीं व आम्हीं रक्षावी. याप्रमाणें लिहिलें आलें. तीं पत्रें श्रीमंत

रा भाऊसाहेबांजवळ दाखल जाहालीं. भाऊसाहेबीं तमाम सरदार लोक इभ्रामखान गाडदी यांस बोलावून आज्ञा केली कीं, लढाई महकूब ठेवावी, व पत्रें आलीं होतीं तीं अवघ्यांस वाचून दाखविलीं, आणि विचारिलें की याचें उत्तर काय लिहावें, आपल्या ठिकाणीं लढाईची स्थीत येत नाहीं. असें बोलोन पत्राचें उत्तर त्यास लिहिलें कीं, तुम्ही म्हणतां तें आम्हास कबूल, परंतु सातसें कोस आम्ही चालोन आलों, फौज किती अपार जाहाली आहे, सात कोट रुपये खर्च जाला तो तुम्हीं आम्हास द्यावा आणि आपले मुलखास जावें, नाहींतर जें होणार तें होईल. अशी बोलण्याची त्यांची व यांची रदबदली लागली. कांहीं रुपये द्यावयास त्यांनीं कबूल करावें असा प्रसंग जाहला. माणूस शंभर रदबदली करावयास लागलें. इतकीयांत राजश्री गोविंदपंत बुंदेले तमाम कहीवाले लोक दहा हजार फौज घेऊन कही आणावयास बाहेर विसा कोसांवर गेले. मुलूख तमाम हैराण जाहला. दोन्हीं लष्करांत महर्गता जाली. ते समयीं त्याजकडील पठाण वीस हजार फौज घेऊन कहीस गेला. परस्परें दरम्यान कही कहीचा कज्जा मोठा घोरंदर जाहाला. मारामारी जाहली. राजश्री गोविंदपंत बुंदेले हजार स्वारांनिशी एक उजाड जागा गांवाजवळ होती तेथें आराबा पहात उभे राहिले होते. वरकड लोक बरोबर होते ते जिकडील तिकडे फौज गेली होती. तिकडे खटका जाहला. पठाण एक जमवानिशी होते. जेथवर त्यांचा हात पोहोंचला तेथवर कत्तल करीत गेले. तमाम कही व फौज पळों लागली. पंतमशारनिल्हे ज्या ठिकाणीं होते त्याठिकाणीं बातमी आली. तेव्हां बुंदेले समोर होऊन पठाण हाटकिले. परंतु सामान स्वार एक हजार अगदीं थोडे. बाकी फौज चोहोंकडे उधळोन गेली. कोणी यापाशीं आला नाहीं. पठाण निकड करून चालून आले. निरुपाय गोष्ट जाहली. ते समयीं तलवार एक प्रहरपर्यंत जाहली. शेवट एक सहस्र सैन्य यापाशीं राहिलें तें व गोविंदपंत बुंदेले वैकुंठवासी जाहले. रणभूमीचे ठायीं देह पडला. उद्भट पराक्रम करून प्राण सोडिला. पठाण यांणी शिरच्छेद केला हें अशुभ वर्तमान खेदकारक श्रीमंत भाऊसाहेबीं ऐकिलें. सलूकाचा तह जाहाला होता, तो बिघाड होऊन दोनी फौजा प्रज्वलित जाहाल्या. श्रीमंत भाऊसाहेब आपण तोफखान्याजवळ येऊन तीनशें जरबा थोर थोर व इभ्रामखान गाडदी यास घेऊन लष्कराबाहेर

निघाले. पठाण याची फौज तयार जाली नवती. अचानक साफी करोन जाऊन पोहोंचले. आराबियाची देवळ जरुर लाविली. पठाण फौजेंतील दाहा हजार पठाण पायउतार होऊन बाहेर पडोन धीरवीर आले. सुजायतदौला व अबदलअल्ली वगैरे फौज तयार होऊन पळों लागले. जैसा मृत्युभयें प्राण पळतां काळ पाठीशीं आहे, तैसे तोफांचे गोळे जिकडे जो जाईल तिकडे मागेंच आहेत. या जंगेंत पांच हजार मोहरे त्याज कडील मृत्यु पावले. त्यामध्यें चार हजार पुरजे पुरजे होऊन राहिले. ऐसा भयाभंग जाहाला. कित्येक शिपाई लोक व आणीक गरीब बाजारी लोक व जनावरसुद्धां अस्तिगतप्राण जाहले. तमाम फौज सात कोस पळाली. ते दिवशीं त्याज-कडील जिवलग योद्धे चांगलें माणूस कामास आलें. सात कोसांवर जाऊन सुजायतदौला व अबदलअल्ली परस्परें धुंदीस आले. उभयतांची लडाई सफेजंगी होऊं लागली. उभयतां बोलूं लागले कीं, तुम्हीं आम्हांस बुडाविलें. अशीं परस्परें उत्तरें जालीं. आतां आम्ही जातों. अशा काजियांत चारशें माणूस उभयतांचे, कामास आलें. ते समयीं मलकाजमानी दरम्यान येऊन उभयतांची स्थिरता केली आणि तेथेंच मुक्काम करविला. फौजेंत कांहीं जीव राहिला नाहीं. कित्येक लोक जखमी व एक हिस्सा चांगले. गलीम जेर होतां दिसत नाहीं. आतां विचार काय? कसें करावें, कोणीकडे जावें, व लोकांस मुख काय म्हणोन दाखवावें, जहराचे प्याले घेऊन मरावें. अखेरी जमा. सारांश, मोठे मोठे अमीर, अबदअल्ली, सुजायतदौला यांणीं नेमणुकी कितीएक फकीर फुकरा लोक बोलाऊन ईश्वरप्रीत्यर्थ दानधर्म मृत्युमार्गाचा संग्रह जो करावयाचा तो करून, रात्रीचे ठायीं विषप्रयोग करून अखंड-दंडायमान व्हावें, अशी शरम गालिब जाली. ही खबर मलकाजमानी बादशाहाजादीस आली. तों स्त्रीधैर्य पूर्वीपासून महत्, असें शास्त्रीं पुराणीं प्रमाण, तें दृष्टोत्पत्तीस आलें, कीं सरदार विषाचे प्याले घेऊन मरतात, हें आश्चर्य करून, आपण पडद्रा लावून, जातीनें सुजायतदौला याचे डेऱ्यास आलियाची बेअदब माफ करून, डेरा दाखल जाली. सुजायतदौला यांणीं खुरनिशात बजाऊन, हात बांधून, उभे राहिले. काय आज्ञा म्हणोन अर्ज केला. पातशाहाजादीनें प्रत्योत्तर तेजःपुंज दिल्हें कीं, तुमचे पिते मनसूर-

अल्लीखान वगैरे अमीर होते, त्यांचा पराक्रम या दक्षण या हिंदुस्थान दोन मुलकांत जाणतात. त्याची अमर्यादा तुम्ही करून त्याचे यशचंद्री कालिमा कां लावितां? आणि वैरियासी विन्मुख होऊन विषप्रयोग करितां, हें अनुचित, पहिलेंच असे. किंवा कितेक विचार कळला असतां, तर हा विचार तुम्हांस दिल्हा नसता. पुरुषजन्मास येऊन सार्थक काय करावें. आदौ, मृत्यु, आज अथवा शतवर्षप्रमाण. दुसरें, येश कोणे प्रकारें मृत्यु, द्रव्य, राज्य, कबूल करून संपादावें. तिसरें, ज्यानें जो शब्द गोविला, तो प्राणांतिक अन्यथा होऊं नये व अन्य मुखीं देऊं नये. चवथें, जो व्यापार जाणावा, त्याची अभिमानता असावी. पांचवी गोष्ट धर्मवासना असावी. हें पुरुषजन्माचें सार्थक. तेंच तुमचें कफन असतां तुमचे ठायीं प्रसंगीं एकही प्रकार दिसोन न आला. ही गोष्ट कोण जाली? ठिकाणीं जहर खाऊन मरावें, जगांत अपकीर्ति करावी, हें मरण कबूल केलेंच आहे. तेव्हां असें कां मरावें? शत्रूसन्मुख घेऊन मेल्यास काय चिंता आहे? जहर खाऊन मरावें यांत वैकुंठप्राप्ती व तरवारेचे धारेनें मरावें यांत नर्क, असें कांहीं आज तहकीक तुम्हांस कळलें असेल कीं काय? सर्व गोष्टीनें तुम्ही पढेफाजल आहां व सर्व किताब जाणून अकलपुरे आहां. मी स्त्रीनें युक्त विचार सांगावा, हा पदार्थ नाहीं. तुमचे विचारास जसें येईल तसें करावें. म्हणोन तरवार वोढून त्याचे स्वाधीन केली कीं, तुम्हीं आपले हातें माझी गर्दनछेद करावा, नंतर तुम्हास विहित कर्तव्य असेल तें असो. अशी मलकाजमानीची उत्तेजनवचनें ऐकोन, जसें पंकार्त म्हणजे चिखलानें भरून आर्त जाले ते गंगाप्रवाहीं निर्मल होतात, तसें सुजायतदौला कुबुद्धिमलें व्यापिले होते ते मलकाजमानीचे वचनगंगोदकजलें प्रक्षाळून पूर्वीपेक्षां सुशोभित जाले. आणि ते समयीं शाहाजानी नौबत केली. चित्तांत धैर्य धरून अबदलअल्ली यास बोलावूं पाठविलें. तों त्यांणीं एकमेकांशीं जावयाची सिद्धता करून, प्रस्थान करावयाचे विचारांत आहेत, इतकीयांत सुजायतदौला याजकडील बोलावणारा गेला. त्याणें सांगितलें कीं, पातशाहाजादी व सुजायतदौला एके ठिकाणीं आहेत, तुम्हांस बोलाविलें आहे. अबदलअल्ली याणें उत्तर केलें कीं, आम्ही निश्चयांत आहों. म्हणोन मृत्यूवधूलग्नसाहित्य दाखविलें. बोलावणारा चाकर माणूस होता. त्यानें उत्तर केलें कीं, हें कर्म काय करितां? आपली चिंता सर्व ईश्वरास पडली

आहे, गलीमांस नसती सलाबत जाली, गलीम तळ व तोफखाना व बुणगें सोडून पळतात, तमाम सरदार पळाले, मूळ करारास आले, याजवर नोबत-खाने सुरू करून सुजायतदौला सिद्ध जाहाले, साहेबीं चललें पाहिजे, सांप्रत मरत्यास मारणें कठिण नाहीं, ऐशीयांत जाऊन तमाम फौज कतल करावी. ऐसें ऐकोन जयश्री वस्त्रें भूषणें सुशोभितशीं अनृत वार्तिकवचनें सत्य मानून नौबत कराविली आणि आपण मलकाजमानीजवळ येऊन खुरनिशात केली. बोलावणारा वार्तिक अबदलआली याचे येण्याचे अगोदर पुढें येऊन सांगितलें कीं, मी याप्रे॥ बोललों आहें, त्याप्रे॥ च त्याशीं उत्तरें करावीं. दुसरें बोलल्यास विचार अनुकूल पडणार नाहीं. याणेंही अबदलअल्ली येतांच निरोपी बोलिला त्याप्रे॥ उत्तरें केली. गहजब भासला. गोरवर्णीस जसें तेज तसेंच तेंचक्षणीं पुढें होणार त्याप्रे॥ पुनरावृत्ती बुद्धीस धैर्यसंचार जाहाला. आणि कितेक लोक शिपाई बोलावून सज्ज करून रात्रक्रमण केली. प्रातःकालसमयीं हुंकार देऊन तमाम गळित फौज त्या मुक्कामीं टाकून निवडक सत्तर हजार स्वार पठाण शाबुदींत निघाले. तों इकडे आम्हांस बातमी आली, श्रीमंत भाऊसाहेब व इभ्रामखान गाडदी यांणीं बरा पराक्रम करून तळ उठवून माघारे लष्करांत आले. नौबती सुरू करून पांच लक्ष रुपये धर्म केला. दुसरे रोजीं चार घटका दिवसास बातमी आली कीं, पठाण सावर धरून येतात. असें ऐकतांच पूर्ववत्प्रमाणें निसला तमाम शिबंदी पाठऊन फौज सिद्ध करून उभे राहिले. इभ्रामखान गाडदी यांणीं अर्ज केला कीं, आज निकड फार होईल. पठाण फार पोळले आहेत, कसूर होणार नाहीं, साहेबीं एक ठिकाणीं चाल होतांच धैर्य धरून असावें. अशा विचारांत आहे तों तोफांचा मार चुकवून पठाण येऊन उभे राहिले. त्यास, पुढें चाल करावयाचा लाग दिसेना. फौज जैशी तैशीच तयार आहे हें पाहून अबदलअल्ली फिरोन बेहिंमत जाला. आघाडीस होते ते पिछाडीस जाले. पातशाहाजादी मलकाजमानी तयार होऊन अवघ्यांचे मागें होती. पठाण फौजेची अधैर्यता पाहून चिंतागत जाली कीं, मी यांजला बहुत प्रकारें तेज दिल्हें, परंतु योग अघटित आहे, सांप्रत त्यांणीं युध्यही न केल्याचा इलाज कांहीं चालत नाहीं, मैदानची लढाई असती तर होणार समर्थ मानून घोडे चालवितें, आतां कितेक प्रकारें जंगी सरंजाम गलीमाचा, व दुसरा, खंदक.

यास काय करतील हें मनांत आणून चिंतार्णवीं पडली. हातिणीवर अंबारींत स्वारी होती ती खाली उतरली. डेरा उभा केला. उजूतवाजू म्हणजे हातपाय धुऊन; तमाम चकताईत म्हणजे मोगल यांचे पातशाहींत; औरंगजेब, महाबली, पातशाहा, पुण्यश्लोक, अवलिया, अवतारी, पूर्वी होऊन गेला, त्याचे स्मरण निश्चयपूर्वक करून मान्यता केली. त्याचे पातशाही निशाण जामदारखान्यांतून काढून बिनियावर चढवून सेवकास आज्ञा केली कीं, दरोबस्त फौजेचे आघाडीस घेऊन जाणें. सेवकानें हुकुमाप्रमाणें काठीसहित निशाण, फौजेचे पुढें येऊन उभे करून रोविलें. सुजायतदौला व अबदलअल्ली वगैरे मुख्य सरदार यांस तब्रुक, उदी वस्त्रें, मिठाई व अंगारा प्रसादिक पाठविला. प्रसादस्पर्शनीं अधैर्य अधीरपणा होता तो सर्वांचा जाऊन, पुन्हां शत्रूमर्दनाविशी निष्ठा दृढतर जाली. तमाम सरदार एकत्र होऊन स्वतां इमानें केलीं. सत्तर हजार फौज एकदिल करून फरा बांधोन, आम्हांकडील फौजेवर पाहूं लागले. व आम्हांकडील फौजेस ते दिवशीं तेज अधिक, प्राण-घातक, असे दिसोन आलें. दिशा, आकाश, पृथ्वी, शोभाविशोभा, उत्कर्ष जाली. पूर्वी कृष्णावताराच्या समार्तीत भिल्लबाणें चरणकमळीं निमित्य करून निजधाम करिते जाले. तसे श्रीमंत विश्वासराव व भाऊसाहेब सन्निध करून मायावंत केले. आज आमचें आयुष्य तडीस विसरोन दूर ठेविलें. पंचप्राण एकत्र एकविचारें निषीथ मृत्यु अंगणीं उदित केला. परंतु धारा-तीर्थी प्रायश्चितस्नान करून मार्गावलोकन मात्र आहे. स्वर्गाचे ठायीं देव, गंधर्व यांचीं विमानें कौतुकार्थ दाटलीं. हीं आज चिन्हें, परिच्छिन्न आपण दृष्टान्त अवलोकिला. श्रीमंत बाईसाहेब ही वार्ता ऐकोन परम महार्णवीं पडली. रायाचे ललाटप्रदेशीं धरून रुदनास प्रारंभ केला. परस्परें श्रमी जाले. आम्ही आपले मिसलीत तयार होऊन उभे होतांच, ते दिवशींचा समय सर्वांस विचित्र भासला. उपप्लव नानाप्रकारचे होऊं लागले. आकाशमार्गी घंटानाद व पक्षांचे शब्द भयउत्पन्न होऊं लागले. दिशा, आकाश, रक्तवर्ण पाहून आम्ही श्रीमंताजवळ गेलों. तेथेंही सर्वांचीं क्षीण चित्तें देखिलीं. भाऊसाहेब, धैर्याचे मेरु, आम्हांस आज्ञा करिते जाले कीं, या प्रसंगीं सर्व प्रकारें आम्हास तुम्ही वडिल आहां, तीर्थरूपापासून सांभाळ केलात, आजचा प्रसंग आमचे समाप्तीचा आहे, ब्रह्मलिखित निश्चय असे, त्यास, दोन प्रकारें

संकट मोक्षमार्गास पाशवत् जाहलें आहे, हें आपणावेगळें मुक्त करून मनोरथ पूर्ण करतां कोणी दिसत नाहीं, संकटें कोणतीं म्हणाल तर चिरंजीव विश्वासराव यांस मातापिताविरहित हा प्रसंग व दुसरें आमचें कुटुंब समागमें, त्यास, स्त्रीचा वध करावा तर आमचा क्षात्रधर्म नव्हे, ब्राह्मणास स्त्रीहत्त्या वर्जे, त्यांणीं सहगमन करावें, तर आम्ही धारातीर्थी देह ठेवणार, याचें फळ होणार नाहीं, पुढें संबंध दुष्टाशीं, या संकटापासून आम्हास दूर करून मोक्षमार्गाचा पंथ आमचा शुद्ध निर्मळ केला पाहिजे, याजकरितां उभयतांस तुम्हीं आपले जवळ घेऊन एका बाजूवर जावें. अशी शास्त्रवत् उत्तरें केलीं. ते समयीं हीं वचनें तो प्रसंग वैरियासही पाहवणार नाहीं. एक घटकापर्यंत आम्ही मूर्च्छागत जाहलों आणि श्रीमंत भाऊसाहेब यांजवळ जाऊन समजाविलें कीं, हें कर्म किन्निमित्य करितां? बाहेर आणिक लोकांस कळतां फौज चकित, नाकरती होईल. असें आम्ही खंबीरता बोलतां आपण बोलले कीं, अंदेशें क्षणशः काय करावें? तूर्त तुम्ही कांहीं न विचारितां उभयतांस घेऊन जाणें. प्रसंग फार समीप आला आहे म्हणून बोलिले. आम्ही उत्तर केलें कीं, असें कर्म काय म्हणोन? असल्या आयुष्यास मृत्यूचा अंगिकार करिता. आपलेजवळ सर्व योग्यता आहे. द्रव्य, फौज, कांहीं प्राणापेक्षां अधिकोत्तर नाहीं. पेशजी पठाणलोक आपलेकडून कित्येक वेळां सलूख करीत असतां तुम्हीं न केला. बरें! असो! सांप्रतहि सामोपचार करतों. आम्हास आज्ञा जाहाली पाहिजे. बोलणें ऐकोन क्षणभर स्तब्ध राहून वचनोत्तर निष्ठुरतेचें दिल्हें कीं, नेमणूक कर्तव्य विधि पूर्वीच करून गेला, षण्मास जाणतो, तो प्रसंग सांगावयास येत नाहीं, अन्यथा करणार कोण आहे? जन्माचें सार्थक व्हावें म्हणून हा प्रसंग जगदीशें परमपुण्येकरून योजिला, मृत्यू योजिला हें मुख्य आहे, याजपेक्षां अधिक पुढें विशेष काय करणें? घरीं अथवा दुर्गी, पर्वतीं, पाताळीं, कोठेंहि चुकत नाहीं. अशा प्रत्ययपूर्वक गोष्टी ऐकोन, लाचार होऊन, उगाच राहिलों. मातोश्रीस गजारूढ करून श्रीमंत विश्वासराव यांजला घेऊन, आम्ही चालिलों. इतकीयांत इब्रामखान गाडदी यास वर्तमान कळलें. त्याजवरून तयार होऊन बोलिला कीं, हें कर्म अनुचित करितां, रायाची नेमणूक पहिली दरोगीं तोफखान्याचे केली होती, आणि हा उपाय करतां! परंतु उपयोगास येणार नाहीं, जसें पूर्वी आम्हाजवळ

होते तसेंच असावे, मी जीवंत असतां सात पातशाहा एकत्र होऊन चालून आले तरी तीन वेळा फिरवीन, तशांत अबदलअल्लीची बिशात काय आहे? असें असतां आश्चर्य दर्शवून फौज बेहिंमत करता! असें उपाधीयुक्त वाक्य करता जाहाला. लाचार! नाईलाज! त्याजपुढें अवघे संकटार्णवीं स्तब्ध राहिले. श्रीमंत विश्वासराव यांणीं त्याचें बोलणें ऐकून, चित्तांत विचार करून धैर्य धरिलें कीं, भाऊसाहेबीं आपला वियोग करून आम्ही वांचावें असें निर्मिलें हें आम्हांस विहीत नाहीं; सारांश, जो मार्ग त्यांचा तोच आमचा, आम्ही धाकटे आहों, आदौ पुढें जाऊन, मोक्षमार्ग सिद्ध करून, स्थळ उभयतांचें पाहूं. असें मनांत धरून कोणास न पुसतां, इब्रामखान गाडदी याजकडे हत्ती डुलवून आणला. देव व वृद्ध ब्राह्मण व वडील यांचें वंदन करून, अंगांतील कवच होतें तें काढून निश्चयपूर्वक सर्वांस गोष्ट सांगितली कीं, जो प्राणी वांचेल त्याणें आजचे प्रसंगाचें आमचें कौतुक पाहून दक्षणेंत तीर्थरूप नानासाहेब यांजवळ सांगावें. असें बोलून, हत्ती पेलवून दारुखान्याजवळ गेले. अतीत, ब्राह्मण, कितेक फकीर फौजेंत होते त्यांजला नाना प्रकारें द्रव्य, अलंकार देऊन, बाहेर बिदा करून दिल्हें. श्रीमंत भाऊसाहेब हत्तीवरून उतरोन अमरसाहित्य अंगांतील काढोन टाकून, जिमा घातला. एक तलवार फिरंग घेऊन घोड्यावर स्वार जाहाले. जयजय, हरहर, शब्द संपूर्ण फौजेंत जाहाला. शिपाई, वीर यांणीं दरोबस्त तरवार मेणांतून बाहेर केली. तयार जाले. आम्ही आपले मिसलेस मातोश्री पार्वतीबाईस घेऊन गेलों, तों अबदलअल्ली, अगस्ती सैन्यसागरशोषक, फतेनिशाण पुढें देऊन, जे ठिकाणीं उभा होता तेथून गलबल पाहून, एकसमयावच्छेदें सर्वांनीं तरवार ओढिली. तेव्हां भाऊसाहेबीं आम्हाकडे निरोप पाठविला कीं, तुम्ही हत्यार न लावणें, आमची व त्यांची तरवार लागली म्हणजे तुम्ही सहस्र योगें न विचारतां निघोन जावें. यांत अंतर कराल तर गोब्राह्मणवधाचें पातक कराल, जीवित्व अथवा मृत्यू आम्हांस असो. असें शपतपूर्वक सांगोन पाठविलें. अबदलअल्ली पठाण (याणें) हत्यारें वोढून, एकसमयावच्छेदें आपले पीर मूर्च्छाचें स्मरण करून घोडे चालविले. रायांनीं तमाम तोफखाना व गाडदी यांसी ताकीद केली कीं, जेव्हां माऱ्यांत येतील तेव्हां तोफ सुरू करावी. यावर अबदलअल्ली समीप आले. त्यावेळेस इकडून दोन शिलका

म्हणजे दोन फैरा एक क्षणांत केल्या. माणसें व घोडीं कितेक उडालीं. त्याचा लेख कोणींहि केला नाहीं. त्यांनीं दृढ निश्चय करून खंदकापावेतों आले. मागाहून घोडे वगैरे यांची घटणी फार जाहाली. कितेक स्वार खंदकांत प(डले.) ×××××××××× (यापुढें किती पानें गेलीं आहेत तें न कळे.) आहेत. राव व भाऊसाहेब यांणीं आपला पुण्यप्रताप, लौकिक करून वैकुंठवास केला. शोक किमपि न करावा. या उपरि जसें बतेल तसें सेवेसी श्रुत करूं. विशेष, बहुत काय लिहूं ? हें विज्ञापना. शके १६८२ विक्रमनाम संवत्सरे, पौष शुद्ध ८ अष्टमीचे दिवशीं जालें वर्तमान लिहिलें. हें विज्ञापना.

आवृत्ति १९०१ [राजवाडे-खंड ३ रा, पृष्ठ १८१-१९१]

---

## क्रमांक ९ : : श्रीमंत नारायणराव पेशवे यांची बखर

### बारभाई मसलत

रात्रीं नानांचे वाड्यांत अकरा जण मुत्सद्दी जमा होऊन दादासाहेब धरावे असा निश्चय होऊन अकरा जणांनीं यादा लिहिल्या. मग त्रिंबकराव मामा यांनीं सांगितलें कीं, "पूर्वी सखाराम बापू यांचा रुकार प्रथम पाहिजे. आणि या खेरीज कोणीं रुकार घालूं नये." मामा वगैरे मुत्सद्दी आपआपले वाड्यांत गेले. दुसरे दिवशीं सर्व मुत्सद्दी नानांच्या वाड्यांत आले. तेव्हां नानासाहेब यांणीं सर्वांस विचारिलें कीं, "यांतून कोणीं फुटला असतां दादासाहेब सर्वांचे पारिपत्य करील. त्या पेक्षां गीता गंगाजळी "व फुलें तुळशी सर्वांनीं एक मेकांस उचलून द्यावीं." आणि सांगितलें कीं, "कोट्यावधि रुपये खर्च जहाला तरि सर्वांस करावा लागेल." तें सर्वांनीं मान्य केलें. व कोणीं फुटला असतां पारपत्यें करून पायांत बिड्या घालाव्या असें ठरलें. नंतर नानांनीं सांगितलें कीं, "सखाराम बापू या मनसब्यांत पाहिजे. तर

तुमची मसलत शेवटास जाईल. त्याचें आंग दादासाहेब यांजकडे आहे." मग मामांनीं उत्तर केले कीं, तुमचा अकरा जणांचा खंबीरपणा जहाला. त्यापेक्षां बापूंचा जिम्मा मी करितों. असें उत्तर मामांचें ऐकून नानांनीं उत्तर केलें कीं, "तो सगळा शहाणा, त्याचा जिम्मा तुम्हांकडेस आल्यास माझा जिम्मा बापूपाशीं घावा." पुन्हा मुत्सद्दी आपआपल्या वाड्यांत गेले.

दुसरे दिवशीं मुत्सद्दी सखाराम बापू सरकार वाड्यांत आले. कारभार जाहला. बापूंचा व मामांचा बेबनाव होता. सरकारचे कामाविशीं मात्र बोलावें [तें] कार्या कारण. फारच वांकडेपणा होता. कचेरी बरखास्त जहाल्यावर रात्रौ भोजन मामांनीं करून सखारामबापू यांचे वाड्यांत गेले. पहारेकरी [यांणीं] बापू दिवाणखान्यांत बसले होते तेथें जाऊन सांगितलें कीं, "मामा खालीं उभे राहिले आहेत." बापू बोलले कीं, "अशी गोष्ट कशी घडेल? पूर्वेचा सूर्य पश्चमेस कसा येईल? मामा आमचे वाड्यांत कधीं येणार नाहींत." पुन्हा पहारेकरी बोलले कीं, "आपण म्हणतां खरें पण मामा खालीं उभे आहेत." इतकें ऐकून बापू दिवाणखान्यांतून उठोन धांवत आले. तों मामांनीं नमस्कार केला. मग बापू म्हणों लागले कीं, "मामा, सूर्योदय पूर्वेचा पश्चिमेस कसा उगवला?" मग मामांनीं उत्तर केलें कीं, "ईश्वर कृपेचा खेळ कोणास समजण्याचा नाहीं. कांहीं कालें करून पश्चिमेसही सूर्योदय होईल यांत संशय नाहीं. ही ईश्वरी माया कोणास समजण्यासारखी नाहीं. आम्ही आलों खरे. तुम्हांशीं चार गोष्टी बोलावयाच्या आहेत. एकांत स्थळीं माक्षिकेचा सुद्धां प्रवेश नाहीं तेथें चलावें." मग बापूंचा हात धरून दिवाणखान्यांतून खोलींत गेले. मग मामा बोलिले कीं, "आम्हीं तुम्हापाशीं मागणें मागावयासि आलों आहोंत. मागूं तें बक्षीस द्यावें." मग बापू बोलले कीं, "बक्षीस मागावयाची गोष्ट निटोप्याची असल्यास बक्षीस आहे." "तर याप्रमाणें वचन द्यावें. थोरांचें वचन पाहिजे. थोर आहेत ते वचनाचें बेवचन करीत नाहींत." मग बापूंनीं वचन दिल्हें. मग मामा बोलिले कीं, "दुसऱ्याच गोष्टी बोलावयाच्या आहेत. आपणास ग्रहण करावयाचें असल्यास करावें. नाहीं तर आम्ही बोललों नाहीं व तुम्हीं ऐकिलें नाहीं. या गोष्टीचें वचन असावें." मग बापू बोलले कीं, "आम्हांस ग्रहण जहाल्यास करूं. नाहीं तर आम्हीं कांहीं ऐकिलें नाहीं." याप्रमाणें दुसरें वचन दिलें. मग मामा बोलले कीं,

" ही याद आणिली आहे ती वाचून पहावी." मग बापूंनीं याद पुढें वाचून पाहिली आणि बोलले कीं, " तुम्ही काय बोलतां ? " त्रिंबकरावमामा बोलिले कीं, " या यादींवर रुकार घालावा. " तेव्हां बापू बोलले कीं, " आम्ही रुकार कसा घालावा ? आम्ही दादासाहेब यांजकडील. तुम्हीं आम्हांस वचनांत घेऊन फसविलें. आमचे ध्यानांत हा मजकूर कांहींच नाहीं. " इतकें बोलोन पावघटकापर्यंत उगीच बसले. मग मामांनीं उत्तर केलें कीं, " आपली मर्जी असल्यास रुकार घालावा. आमचा आग्रह नाहीं. याद फाडून टाकितों. आणि आपले घरास जातों. आमचा तरी काय खोळंबा आहे ? आम्हीं कांहीं बोललों नाहीं व तुम्हीं कांहीं ऐकिलें नाहीं. परंतु बोलतों तें ऐकावें. बापूनीं वचनाचें बेवचन केलें असें होईल. थोरास वचनांत धरावें. तुम्हीं वचन दिल्हें कीं, मागाल तें देईन. याप्रमाणें करार केला, तर रुकार घालावा. " मग मामा बोलले कीं, " तुम्ही दादासाहेब यांजकडील आहा म्हणोनच रुकार पाहिजे. आम्हांस अकरा जणांस मसलती करितां येत नाहींत कीं काय ? " मग बापू बोलले कीं, " वचनाचें बेवचन केलें तर बापूंचे बोलण्याचें प्रमाण नाहीं. असा लौकिक कराल यास्तव रुकार घालतों. परंतु दादासाहेब यांस तुम्ही कसे धराल ? " मामा बोलले कीं, " रुकार घालावा. मग सांगूं. " नंतर बापूंनीं खिजमतगार याजपासून कलमदान आणवून यादीवर रुकार घातला. व गीतागंगाजळी व फुलें, तुळशी, बेलभंडार मामांनीं आणवून बापुंचे हातांनीं उचलून घेतलीं. बापू बोलले कीं, " गंगाजळी सुद्धां जहाली. आतां दादासाहेब यांस कसें धरणार हें सांगावें." मग मामा बोलले कीं, "आजच तुम्हीं पुसूं नये. आमची मसलत जेथें होईल तेथें उदईक आपणांस बोलावणें येईल. तेथें यावें म्हणजे उत्तर सांगूं." इतकें बोलले व मामा घरीं निघोन गेले. ही बातमी दादासाहेब यांस कांहींच लागली नाहीं.

दुसरे दिवशीं रात्रौ नानांचे वाड्यांत अकराजण जमले आणि बापूंसही बोलावणें पाठविलें. आणि बापूही आले. नंतर मनसोबा केला कीं, दादासाहेब वाड्यांत सांपडणार नाहींत. बापू बोलले कीं, " बाहेर काढिले पाहिजेत. " आणि हैदराबादेस निजाम अली मोंगल याची दोस्ती बंधूप्रमाणेंच होती, त्यांस पत्रें लिहिलीं कीं, " दादासाहेब यांणीं नारायणराव साहेब यांस

ठार मारिलें. हा पुत्र त्या नानासाहेब यांचा मारला नाहीं, तुमचा मारला असें समजावें. आणि लाख फौज घेऊन आपण पुण्यावर यावें." याप्रमाणें त्यांस पत्रें लिहावीं. म्हणोन बोलिले. ही मसलत अवघ्यांचे मनास आली. मग गंगाभागीरथी पार्वतीबाई काकूसाहेब यांचे नांवचीं पत्रें मोंगलास एक [व] पेशवे यांजकडील वकील राजश्री कृष्णराव काळे यांस एक अशीं पत्रें लिहिलीं. वकील यांचे पत्रांत लिहिलें कीं, "नबाबास दर कुचास लाख रुपये कबूल करून लाख फौज बालेघाटाचे सुमारें घेउन यावें." या प्रमाणें दोन पत्रें लिहिलीं. रातोरात लखोटे रवाना केले. दररोज वाड्यांत येऊं जाऊं लागले.

याजवर महिना पंधरा दिवशीं जासुदानें दाखल केलीं. वकीलानें पत्र पाहून निजामअली यांस पाठविलें. मग नबाब बोलले कीं, "नानासाहेब याचा मुलगा मारला नाहीं. आमचा मुलगा मारिला. सबब आम्हांस जरूर जाण्याची." याजवरून नबाब याणें आपली लाख फौज पुण्यावर तयार करून बाहेर डेरे दिले आणि उतरले. मग कृष्णराव काळे वकील यानें दादासाहेबांस पत्र लिहिलें. "निजाम अली आपलेकडेस लाख फौजेनिशीं निघणार आहे. पुण्यावर मोहीम आहे." आंतून पत्रें मुत्सदी यांस पत्रें निराळीं व सरकारांस निराळीं या प्रमाणें पत्रें लिहीत गेले. एका महिन्यांनीं वकील यांचीं पत्रें घेऊन पुण्यास दादासाहेब यांस दाखल केलीं. दादासाहेब यांणीं पत्रें वाचून पाहून सखाराम बापू व त्रिंबकराव मामा व नाना फडणीस, हरिपंत फडके यांस बलावून आणून सांगितलें कीं, वकील यांची पत्रें आलीं आहेत कीं, "निजाम अली बाहेर निघाले आहेत. पुण्यावर मोहीम आहे. हें वर्तमान काय?" मग सखाराम बापू बोलले कीं, "वकील खोटें लिहिणार नाहीं. इकडे येण्याची बातमी खास आहे. त्यांस समजलें असेल म्हणोन लिहिलें आहे. आपण काळजी करूं नये. पेशवे यांचे वेळेस मोंगल आले त्यांनीं येऊन काय केलें! आपण खांशी स्वारी फौज सुद्धां तयार करून तोंडावर चलावें. विपर्यास दिसल्यास पारिपत्य करूं. काय चिंता आहे?" असें बापू बोलिले.

मग हुजुरात मानकरी पन्नास हजार फौज तयार करून दादासाहेब चिरंजीव अमृतराव हे दत्तपुत्र होते ते, आनंदीबाई व सर्व मुत्सदी झाडून

[ बरोबर घेऊन ] गारपिरावर जाऊन उतरले. जिकडे तिकडे सरंजामी व शिंदे होळकर यांस पत्रें पाठविलीं कीं, निजाम अल्लीवर मोहीम आहे. तुम्हीं सर्वांनीं फौजेनिशीं यावें. तों नबाब कूच दरकूच बालेघाटाचे सुमारें आला. तों दादासाहेब कूच करून कोरेगांवचे मुक्कामीं गेले. तेव्हां दादासाहेब बोलले कीं, " पुण्यास बाया घरीं दोघी जणी आहेत. पार्वतीबाई व गंगाबाई यांचे रखवाली करितां कोण ठेवावें. कारण गंगाबाई गरोदर तीन महिन्यांची आहे." मग धोंडो खंडाजी पट्ट शिष्य होते. त्यांस मुतालकीचीं वस्त्रें शिक्के कट्यार दिल्ही. आणि सांगितलें कीं, तुम्हीं पुण्यास जाऊन वाड्याचा बंदोबस्त व शहरचा बंदोबस्त राखावा. या प्रमाणें सांगितलें. मग धोंडो खंडाजी कारभारी हे निघोन पुण्यास आले. वाड्याचा व शहरचा बंदोबस्त केला. दादासाहेब यांस मुत्सद्दी यांणीं पुढें शहास गुंतविलें व नबाब यांस मुत्सद्दी यांणीं आंतून पत्रें पाठविलीं कीं, तुम्हीं बालेघाटावर रहावें. आमचे इकडून जशीं पत्रें येतील या प्रमाणें करावें. यावर एक दिवशीं रात्रीं मुत्सद्दी जमले. आणि यांस बापू बोलले कीं, " आतां बायांची मसलत कशी करावी ? दोन्ही बाया पुण्याहून पुरंदरास न्याव्यात. तो नारो आपाजी याजकडेस किल्ला आहे. तेव्हां सखाराम बापू यांणीं नारो आपाजी यांस सांगितलें कीं, तुम्हांस निरोप देववितों. तुम्हीं पुरंदरास जावें आणि किल्यावर बायांस पळवून न्याव्यात. या प्रमाणें विचार करून दादासाहेब यांस मुत्सद्दी यांणीं सांगितलें कीं, " पुरंदरास खालीं रामोशांचा फार दंगा जहाला आहे. त्यास नारो आपाजी यांस माघारें पाठवावें. म्हणजे नारो आपाजी बंदोबस्त करतील." त्याजवरून नारो आपाजी यांस निरोप देवविला. ते पुरंदरास आले. दुसरे दिवशीं अकरा जण मुत्सद्दी एके ठिकाणीं जमून विचार केला कीं, "आपल्यांतून दहा जणांनीं मागें फिरावें. आणि एकानें येथें रहावें. त्यानें मागची मसलत करावी. येथें कोण रहातो तें बोलावें. येथें जो राहील तो आजच मेला असें समजावें," मग बापू बोलले कीं, " मागची मसलत आम्ही करूं. आम्हांस येथें रहाणें." तेव्हां मामा बोलले कीं, " तुम्हांस आम्हीं निरोप देववितों. आणि आम्ही येथें रहातों. आम्ही आजच मेलों म्हणून समजावें. परंतु तुम्हीं मसलत शेवटास न्यावी." दुसरे दिवशीं बापूंनीं कपाळ बांधिलें. आमांश ज्वर भारी जहाला. आणि निरोप मागूं लागले कीं, " आमचे

शरीरास समाधान नाहीं. आम्ही पुणें मुक्कामीं जातों. बरे जहालों म्हणजे येऊं." मग मामांनीं दादासाहेब यांस विनंती केली कीं, "बापूंच्या शरीरास समाधान नाहीं. त्यांस निरोप द्यावा. बरे जहाले म्हणजे येतील." त्याजवरून दादासाहेब यांणीं निरोप दिला. बापू निघोन पुण्यास आले. व नाना फडणीस यांची प्रकृति बिघडली. व हरीपंत तात्या यांच्या पोटांत पोटशूळ उठून फार हैराण जहाले. या प्रमाणें सोंगें करून निरोप मागतात. ही लबाडी दिसते [असें दादा बोलले.] तेव्हां मामांनीं उत्तर केलें कीं, "रडतराव घोड्यावर बसविला असतां तो तरवार मारणार काय आहे? त्यांचे शरीरास समाधान नाहीं. तेव्हां बराबर घेतल्याचा उपयोग काय? तर त्यांस निरोप द्यावाच. पुणें मुक्कामीं जाऊन आठ चार दिवसांनीं बरे जहाले म्हणजे येतील. आम्ही आपले बराबरच आहों. आपण कांहीं काळजी करूं नये." अशी भुलथाप देऊन मुत्सद्दी यांस निरोप देवविले. ते निघोन पुण्यास आले. दादासाहेब यांस तेथून कूच करून एक मजल पुढें नेलें. तेथें शहास गुंतविलें. दहा जण मागें गेले.

मग मुत्सद्दी यांणीं ताईबाई साठी ही गंगाबाईची आई यांजला बोलावून आणून सांगितलें कीं, "गंगाबाईस दुखवस्था करितां म्हणून माहेरीं आणावी." मग ताईबाई साठी ही वाड्यांत जाऊन राजश्री धोंडो खंडाजी कारभारी यांजला मजकूर सांगितला. त्याजवरून कारभारी यांचा निरोप जाहला. पार्वतीबाई काकू व गंगाबाई यांजला बुरखे बांधून स्वारी ताईबाई साठी यांचे वाड्यांत आली. दोघीजणी गेल्या हें कारभारी यांजला ठाऊक नाही. तों नारो आपाजी हे पांचशें स्वार बरोबर घेऊन पर्वतीस बसले होते. तों प्रहर रात्रीस साठे यांचे वाड्यापर्यंत येऊन, पुरंदरा पावेतों डांक बसवून, दोघी बायांस पालखींत घालून, मध्यान रात्रीस पुरंदरास घेऊन गेले. मग प्रातःकाळीं सखाराम बापू व नाना फडणीस व हरिपंततात्या वगैरे मुत्सद्दी पळोन गेले. हें वर्तमान कारभारी धोंडो खंडाजी यांस कळलें. त्यांनीं दादासाहेब यांस कळविलें कीं, दोघी बायांस सर्व मुत्सद्दी मिळोन घेऊन पळोन गेले. मग दादासाहेब यांणीं पत्र पाहून त्रिंबकराव मामा यांस बलावून विचारलें कीं, "तुम्हीं मुत्सद्दी यांस निरोप देवविले. त्यांनीं पाठी मागें पुरंदरास बंड केलें." तेव्हां मामांनीं विनंती केली कीं,

"ते असे मात्रागमनपणा करतील असें मला काय माहीत? त्यांच्या शरीरास समाधान नाहीं म्हणोन निरोप देवविले. आणि ते पळोन गेले. काय चिंता आहे? आम्ही आपले जवळ आहोंत. आपण कांहीं काळजी करूं नये." अशा गोष्टी सांगोन समाधान केलें. मग दादासाहेब म्हणाले कीं, "आम्ही माघारे फिरतों. तेव्हां मामांनीं उत्तर केलें कीं, "गलीम उरावर आला आहे. त्याचें पारपत्य करूं. मग मुत्सद्दी यांणीं घरफितूर केला तो पाहून घेऊं. परंतु परशत्रूचे घरांत राज्य गेलें तर मग कठीण." याप्रमाणें दादासाहेब यांस सांगितलें. तेथून कूच करून काष्टीतापळीचे मुक्कामीं गेले. तेथें शहास गुंतविलें. मागें इकडे मुत्सद्दी पुरंदरास गेले होते त्यांनीं विचार केला कीं, "गंगाबाईस कन्या जहाली तर कसें करावें?" असे बापू बोलले. तेव्हां नाना बोलले कीं, "चितपावनाच्या बायका, यांच्या बरोबरीच्या गरोदर, नऊ महिन्यापर्यंत किल्यावर ठेवाव्या." याप्रमाणें बाया किल्यावर दहा आणोन ठेविल्या. परंतु हें वर्तमान दादासाहेब यांस कळलें तर कसें करावें? प्रत्यक्ष अवतार जहाला तत्रापि संशय घेतील. त्यांस खरें वाटणार नाहीं. म्हणोन दादासाहेब यांची मुलगी दुर्गाबाई, तिजला बारामतीकरांकडे दिली आहे, तीस आणोन किल्यावर ठेवावी. जेव्हां गंगाबाई प्रसूत होऊं लागतील तेव्हां खोलींत नेऊन प्रत्यक्ष दाखवावें. म्हणजे दादासाहेब यांची खात्री होईल. कदाचित मुलगी जहाली तर बदलाबदली करीतच आहों. मग कसें होईल ते पाहूं." असें पार्वतीबाई काकू यांनीं सांगितलें. मग मसलत चार महिने लांबविली. पुढें गंगाबाईसाहेब नव मास भरल्यावर प्रसूत जहाली. मुलगा दृष्टीस पडला. त्यावेळेस दुर्गाबाई यास पार्वतीबाई काकूसाहेब यांणीं खोलींत आणून दुर्गाबाई यांस आणून बसविलें. तों तिच्या देखत अवतार जहाला.

---

# क्रमांक १० : : नाना फडणिसांचें आत्मचरित्र

## नाना फडणिसांचें आत्मवृत्त

दहावे वर्षी विवाह झाला. विघ्नें पडलीं असतां निर्विघ्न केलें. मध्यें घोड्यावरून पडलों. अति अवस्था कठिण, दोन दिवस शरीरभान नाहीं. याप्रमाणें जालें असतां गोविंद जो त्याचे कृपेनें बरें केलें. परंतु पंधरावे वर्षी पित्याचा काळ झाला. त्यांचें और्ध्वदेहिक ईश्वरें करविलें. पुढें परंपरा सेवाधर्म चालावा यायोगें व श्रीमंतांची कृपा पुत्रवत् असें जाणून कर्णाटक प्रांतीं श्रीरंगपट्टणपर्यंत गेलों.

मातोश्री व कुटुंब सहवर्तमान भाऊंबरोबर हिंदुस्थानांत जाऊन स्वर्गंगा त्रिपथ भागीरथीचें स्नान त्रिस्थलीं यात्रा करावी. अंतःकरण शुद्धी होईल, या भावनेंकरून गेलों. त्याकालीं चित्तास अतिवैराग्य. याचे कारण शरीरीं किंचित् पीडा. तेणेंकरून चित्त अति वैराग्यशील जाहलें, कीं, भगवंताची पूजा व ध्यानमात्र करावें. उष्ण शीत याचीही पीडा परंतु चित्तास नाहीं. मातेच्या ठायीं भक्ती होतसाता चाललों. ते नर्मदा महागंगेमध्यें स्नान करून एका वृत्तीनें ध्यान केलें. त्या दिवसा पासून उत्तरोत्तर वैराग्य अंतःकरणशुद्धीच होत चालली. भाऊंची ममता विशेष व आंवेची व्यथा बहुत जाहाली, उठावयास शक्ती नाहीं, रेचन बहुत, ग्लानी फार तेव्हां कूच जहालें असतां मुक्काम श्रीमंतांनीं करवावा. त्याकालीं ईश्वरें आरोग्य केलें, पुढें दरमजल चरमन्वतीतीरी गेलों. तेथें ग्रहण पडलें. स्नानदानादिकें करून आत्मा पवित्र होतसाता ध्यानें करून कालक्षेप चालत असे. पुढें सूर्यतनया यमुना इचे तीरीं गौ-घाटा जवळ गेलों. तेथें स्नान-संध्या करून दोहों दिवसां मुक्तिपुरीं श्रीमथुराक्षेत्रीं गेलों. तेथें क्षौर प्रायश्चित्त श्राद्धादिक करून तदनंतर पुढें भगवान् पूर्णब्रह्म राधाकृष्ण याणें सकल लीला केल्या असें जें वृंदावन त्या स्थळास गेलों. तेथें कालिया-डोहीं कदंबवृक्ष ज्याजवर भगवान् बसून वस्त्रहरण करीता जहाला, त्याच्या शाखा अद्यापि यमुनेंत गेल्या आहेत, त्याखालीं जाऊन स्नान तर्पण करून तदनंतर गोपीचंदनाचे

टिळे व तुळशीच्या माळा घालून भगवंताचे ध्यान करीत होत्साता वृंदावनांत अटलबिहारी व कुंजबिहारी व बालबिहारी, राधाकिशोर, गोविंदजी या भगवंताच्या मूर्ती यांची दर्शनें घेतलीं. त्यांत कुंजाविहारी मध्यान कालीं चोंपाळ्यावर निद्रिस्थ, कपाट लागलेलें, परंतु चोंपाळ्याची दोरी बाहेर ओढीत असत. ती आपले हातीं ओढून भगवान् जो यास आंदोलन–लीला केली. तेथोन शृंगारवट जेथें भगवंते राधेस शृंगार केले तेथें जाऊन वट–दर्शन घेऊन पुढें बंशीवटी म्हणजे जेथें भगवंतें मुरलीवादन केलें, तेथें जाऊन वटाचें दर्शन केलें. तेथून सेवाबन, कुंजबन ही स्थळें, कुंज कसें कीं भगवान लीला करीतो असाच भास होत असावा. सर्वही वृक्ष छत्राकार ठेंगणे भूमिस्थ पल्लव कंटक वृक्षासही परंतु कंटक नाहीं हें पाहून आनंदमय होत्साता यमुनातीरीं रेतींत भगवान् जो याणें बाळरूपीं लीला केली, पादारविंदसंबंधीं रेणु रजःकण त्याची प्राप्ती मस्तकीं वंदावया करीतां ब्रह्मादिक देव इच्छितात, तेथें जाऊन लोळून ती रेती मस्तकावर घेतली. तेथोन ज्ञानगुदडीस गेलों. तेथें थोर थोर संत, महंत, बैरागी भगवत्पर होत्साते, सायंकाळचे साहा घटिका दिवसास येऊन बसून पुराण–श्रवण करीत आहेत. भगवंताच्या कथानामें गाताहेत. त्यांचें दर्शन घेऊन चार घटका पाहून चित्त बहुत शांत जहालें. तदनंतर धीरसमीर जे या कालिंदी–तीरीं जाऊन सायंकाल संध्या करून भगवान् सांबसदाशिव जो याचें एकाग्र मनें करून ध्यान करून येता जहालों. या प्रमाणें तीन चार दिवस क्रमिले. अनेक जन्मांचें पुण्य कीं, असें वृंदावन दृष्टीस पडलें तेणें करून भगवंताच्या मूर्ती व भगवद्भक्त त्यांचे दर्शनें करून नेत्र पवित्र जाले. पादें करून चालत गेलों तेणेंकरून पायांचें सार्थक जाहालें. हस्तें करून नमस्कार करीता जाहालों तेणेंकरून हस्त पवित्र झाले. मुखेंकरून नामस्मरण केलें तेणेंकरून मुख पवित्र झालें. कर्णे करून भगवत्कथा–श्रवण केलें तेणें करून श्रोत्र पवित्रता पावले. स्नानें करून सर्व देह पवित्र झाला. ज्या वृंदावनांत बैरागी एकाग्र वृत्ती करून ध्यानस्थ होत्साते कुंजाखालीं जागां जागां बसले आहेत; कोणी पर्णेंच भक्षून, कोणी जल प्राशन मात्र करून, कोणी दुग्ध सेवन करून, कोणी सिद्धान्न आणून घालील तेंच खाऊन राहिले आहेत; अशांचें दर्शन घेऊन सत्समागमाचें महात्म्य किंचित् आनंदातें पावलों. त्यांत एका बैराग्यानें कृपा करून एक मंत्र भगवंताचे

नामाचा सांगितला, कीं याचा जप करीत जावा. तो भगवंतेंच सांगितला असा मानून, सर्वांस यथाशक्ति देणें देऊन संतोषातें पावलों. पुढें दिल्लीस गेलों. तेथे पृथ्वीपतीचे दर्शन श्रीमंतांचे आज्ञेवरून घेतलें. त्याणीं बहुत कृपायुक्त भाषण करून आशीर्वाद देऊन आपलें जवळील वस्त्रें दिलीं तीं घेतलीं किंचित् संतोष जाहला कीं, भगवंताचे कृपेनें अंतर्वर्ती ही कृपा आहे. तदनंतर श्रीमंतांचे लष्करांत श्रीमंतांजवळ आलों. बसलों असतां भूमीकंप जाहला. परंतु भगवंताचें ध्यान चित्तांत आणिता जालों. दिल्लींतील चित्र वगैरे विषय ज्यांत पाप नाहीं असेंही घेतले. पाहीले. पुढें उत्तरेकडील यवन शत्रुत्वें करून यमुना पैलतीरीं पाऊण लक्ष सेनेसहवर्तमान येऊन उतरला. परंतु यमुना भरपूर चालली. तेणें करून उभयपक्षीं स्तब्धतांच जाहली. पुढें कुंजपुरा श्रीमंतांनीं शौर्यें करून घेतला. मी ही युद्धांत होतों. ईश्वरें रक्षिलें. तों इतिकयांत यवन अलिकडे आला. श्रीमंत सैन्यासहवर्तमान त्याचे समोर गेले. गांठ पडली. तेव्हां मी तर लहान श्रीमंतांचे बुद्धीस महान्‌बुद्धी. परंतु भावी अर्थ तेणें करून विपर्यास पडला. आप्त होते बळवंतराव मातुल व नारा पुरंदरे वगैरे ते अनाप्त झाले. जे अनाप्त शाहनवाजखानी भवानी शंकर वगैरे ते आप्त जाहले. त्यांचे वाकयाचें ठायीं विश्वास, तेणेंकरून आपली रीत युद्धाची सोडून यवनाची रीत धरिली. परस्परें युद्ध होत असे. गोळे प्रत्यहीं शत्रूचे राहुटीवरून जात. मातोश्री व स्त्री भयभीत होत. कीं कसें होईल? ते ते समयीं मातोश्रीस विनंती करीत गेलों, कीं मी विनंती करीतों. एक ईश्वरीं लक्ष असावें. त्यांत मातुल युद्धांत होते ते पडले. ते दिवशींच सर्व सैन्य नाशास पावावें. परंतु रात्र जाहली यामुळें राहिलें. त्या दोन महीन्यांत मनुष्यें, पशु बहुत मेले. अन्नाची महर्गता. दुर्गंधी एकेच ठिकाणीं. असे श्रम पाहिले. पुढें मातुळाची स्त्री समागमें गेली. मातोश्रीस श्रम फार जाहले. होणार आवश्यक होतें. यदर्थीं संदेश धरूंच नये. हा माझा निश्चय. पुढें थोरलें युद्ध उदईक होणार तों पूर्व दिवशीं संकेत कीं, पराजय आपलाच जाहला तरी शत्रूचे हातीं श्रीमंताचें कुटुंब व आपलें हातीं लागूं नये. आपणच नाश करावा. आपण वांचत नाहीं असा सिद्धांत करून श्रीमंतांनीं याची ही योजना केली. दुसरे दिवशीं तयार होऊन प्रातःकाळचे दोन घटिका दिवसास युद्धास गोळागोळीचा प्रारंभ जाहला. श्रीमंत अति

बुद्धीवान्, धैर्यवान्, शूर, कृतकर्मे गर्वमात्र विशिष्ट, परंतु तर्तूद फारच सैन्याची वगैरे केली. शेवटीं निशाणाजवळील तर्तूद एकीकडे जाऊन शत्रूची मुख्य स्थानींच गांठ पडली. मी श्रीमंता सन्निध ईश्वरस्मरण किंचित् करून असें. तों विश्वासराव यांस गोळी लागली. पडले. ते हत्तीवर श्रीमंतांनीं घालून उभेच राहिले. तों पठाण पाय उतारा आंत येऊन मिसळले. तोडातोडी होऊं लागली. आणि डावे बाजूचे मातबर सरदार, चौघड्याचे धनी देखील पूर्वींच पळाले. उजवे बाजूचेही होळकर शिंदे निघोन निशाण निघालें. दोन-तीन शत पायदळ होतें. श्रीमंत दिसेनातसे जहाले. तेव्हां ईश्वरें बुद्धी दिली. माघारे फिरलों.

पूर्वीं युद्धांत बापूजीपंतीं बोध केला, माघारे फिरावें. त्यांस उत्तर केलें कीं, अशा समयीं श्रीमंतांस सोडणें ठीक नाहीं. परंतु पुढें याप्रमाणें जहालें. लक्ष सैन्य त्यांत मोठे सरदार असतां एकही त्या समयीं श्रीमंतांस आप्त न जहाला. बहुत दिवस अन्न भक्षिलें, कृपा पुत्रवत् केली, तितकें चांगला काळ होता, तेव्हां केशास ढका लागल्यास प्राण देऊं अशा प्रतिज्ञा. परंतू ईश्वर घटित विपरीत काळ त्यांत सोबती कोण होतो? सर्व सुखाचे सोबती. भोजन आदरें करून करावें. वस्त्रें, जवाहीर, जागिरा द्याव्या. निदानीं इतके असून ज्यांचे देहाचे ठिकाण कोणास ठाऊक नाहीं. सर्व वाताहत जहाले. मी सायंकाळचे दोन घटका दिवसास घोड्यावर पाणिपतांत आलो. त्या देशाचा मार्ग अगदी ठाऊक नाहीं. तेथें परमेश्वरें वाट दाखवावया पुरते रामाजीपंत उभे होते. सांगूं लागले घोडें वस्त्रें टाकून द्यावीं. त्यावरून सर्व टाकून शुद्ध लंगोटी लावून बसलों. रात्र जहाल्यावर चाललों. तों एका कोसांत तीन चार वेळ शरीरास हात लावून टोपीवाल्यांनीं झाडा घेतला. दर खेपेस समागमेचे दहा वीस तोडून टाकीत. त्यांत मी राहिलो. हे सत्ता ईश्वराची. परंतु बापूजीपंत, रामाजीपंत, राहतच गेले. असे जातां दहा बारा कोश पश्चिमेकडे गेलों. तों तेच शत्रू येऊन रामाजीपंत, बापूजीपंत वगैरे यांस जखमी भारी केलें. पडले. मी एकटा राहिलो. तो गवतांत गेलों. ईश्वरें तृणेंकरून माझें रक्षण केलें. त्यांस मोहनी घातली. सर्वांस मारिलें असतां मी जवळ असतां न मारिलें, व गवत लांब असतां

जाऊं दिलें. पुढें ते गेल्यावर जाऊं लागलों. तों पुढें दोन कोशांवर दुसरे मागती दृष्टीस पडले. तेव्हां मागती तृणांत जाऊन बसलों. तों जवळ येऊन काढूं लागले. ते समर्थी ईश्वर त्यांतीलच एका वृद्धाचे मनांत संचार करिता जहाला, कीं कशास मारितां? मग गेले. तदनंतर माझी शक्ति पाणिपतावर बहुत क्षीण आमविकारादिक विकारयुक्त, अन्न चालेना, असा मी त्याजवर दयासमुद्र सांब सदाशिव जो याणें कृपाकरून, शरीर अशक्त, ऊन पाहिलेंच नाहीं, व पादचारी अभ्यास नसतां सोळा सतरा कोश अन्न उदकाव्यतिरिक्त आलों. क्षुधा तिसरे प्रहरीं लागली. तेव्हां बोरीचा पाला सांपडला तो खाऊन पाहिला तो तोंडांत जाईना. तसाच सायंकाळीं एका ग्रामाबाहेर आलों, तों एका बैराग्यानें पीठ आणून दिलें. त्याची भाकर खादली. ती अमृत-समान लागली. नंतर निद्रा केली. प्रातःकाली गंगा-सहस्त्रनाम म्हणत ईश्वर-स्मरण करीत चाललों. तों एका गांवामध्यें गेलों. तेथें एक साहुकार होता, त्यानें घरीं नेलें. भोजन एक ब्राह्मण होता. व यशवंतराव चाबुकस्वाराकडील भेटला, त्याजकडून स्वयंपाक करवून भोजन केलें. तों शत्रूचे स्वार गांवांत आले, हें वर्तमान कळलें, तेव्हां साहुकार म्हणाला कीं, आम्हीं गाडी करून जयनगराकडे पावते करितों. गाडींत बसून चाललों. तों पाहिलें कीं हा फसवितो. असें बुद्धीस येऊन गाडी टाकून पाय उतराच उतरून चाललों. बरोबर दोनतीन ब्राह्मण, दोन मराठी माणसें, याप्रमाणें दहा बारा कोश गेलों. असे सात दिवस पायीं चाललों. नित्य भोजनाचें साहित्य ईश्वर देववी. तेणेंकरून समागमचे मंडळी सुद्धां भक्षून खेडी पावेतों आलों. तों लष्करचे पळे त्या वाटेनें गेले. त्यांस गांवांत बाळोराव म्हणून चौघे भाऊ असत. ते माझे नांव ऐकून पुसत, कसे आहेत? चेहरा कसा? खुणा खाणा सर्व त्यांणीं पुसून घेतलें. मागाहून हे येतात हें जाणून मार्गावर नेहमीं बसत. आम्हीं आलों तों त्यांनीं खेडी बाहेर ओळखिलें, पुसूं लागले. नांव न सांगावे हा निश्चय, परंतु आंगींच नांव लावूं लागला. त्याचे बोलण्यांत वांकडी गोष्ट नाहीं, आम्हांस साहित्य करून द्यावें, उपकार करावा हें पाहिलें. तेव्हां नांव सांगितल्यावर आपले घरास मंडळी सुद्धां नेऊन उत्तम प्रकारें भोजनाचें साहित्य करून दिलें. भोजन केल्यावर वस्त्रें दिलीं. तदनंतर रामजी दास जोशी मातबर खेडींत असे, त्यास वर्तमान

कळल्यावर त्याणें आपले घरीं नेऊन ठेविलें. सात दिवस भोजनास व उत्तम वस्त्रें दिलीं. पुढें आमचे मानस दीग भरतपुरास जावयाचें. परंतु तो म्हणे सोबत चांगली लावून गाडी करून देऊन पावतें करीन. त्यावर एक लग्न निघालें, त्या बराबर गाडी करून देऊन बराबर पेढे साहित्य करून दिलें. आम्हीं निघालों तों वाटेंत कृष्णंभट वैद्य आले. त्यांणीं सांगितलें कीं, स्त्री विरोजी बारावकर यांणीं संभाळून आणिली. ती नारोपंत गोखले यांचे घरीं आहे. तेथे त्या गृहस्थानें साहित्य वस्त्र पात्रांचे केलें. आम्हीं तेथें गेल्यावर भोजन क्षिरीचे घातलें. तेव्हां आनंद झाला. मग स्त्रीस एक गाडी दुसरी करून तेथून निघालों. तों दिगेस आलों. तेथें पुरुषोत्तम महादेव पाणिपताहून आले होते, ते वानवळे यांचे गुमस्त्याचे बिऱ्हाडास राहिले होते. त्यांस कळतांच त्यांणीं आपले बिऱ्हाडास नेलें. तेथें कुटुंबसुद्धां कमकसर महिनाभर होतों. क्षुधा फार लागत असे. त्यांणीं वस्त्रें वगैरे साहित्य भोजनाचें चांगले केलें. तेथून मातोश्रीचा शोध फार केला. परंतु घरचा खिजमतगार बराबर होता त्याणें सांगितलें कीं, घोड्यावरून पडून जखम लागून मेली. हेंच ठिकाण लागलें. पुढें पालखी व घोडी घेऊन ढवळापुराहून ग्वाल्हेरीस सारे लष्कर पळून पार्वतीबाई, नाना पुरंधरे, मल्हारजी होळकर सारे होते तेथें आलों. अंतःकरणापासून होतें कीं, श्रीकाशीस जाऊन नेहमीं वास करावा. प्रपंचांतील विषय–मात्रीं दुःख हें पुरतें समजलें. परंतु देहप्रारब्ध बळवंत. तेथें आलियावर सर्वांनीं निषेध केला. एकदां देशीं जावें. मातोश्रींचा विधी करावा, वगैरे कित्येक प्रकार काशींत गेल्यावर कसें होईल. पाणिपत जालें तेव्हां काशीही कसी होते. असें चित्तांत येऊन लष्करा बरोबर येऊं लागलों. पाणिपताचें वर्तमान श्रीमंत नाना साहेबांनीं ऐकून माझें स्मरण फार गुरुजी जवळ केलें कीं, त्याचें शरीर अशक्त, कसा निभाव होईल? परंतु ईश्वरकृपेनें व त्यांचे आशीर्वादें महत्संकटांतून पार पडलों. पुढें श्रीमंत नानासाहेब याचें दर्शन बराणपुरावर जालें. पाहतों तों शरीर फार क्षीण जहालें आहे. मर्जी बेतऱ्हा जाली आहे. बहुतांच्या अश्रू क्षणक्षणां जातात. परंतु मजवर सदयतेनें लोभें-करून भाषण करून वर्तमान पुशिलें. सांगितलें. तीन चार दिवस बरोबर राहिलों. श्रीमंत गोपिकाबाई व नारायणराव यांस देवी आल्या. करितां त्या सहवर्तमान नर्मदातीरीं राहिलीं. परस्परें उभयतांचें चित्तही ठीक नाहीं हें

कळलें. काल–वैपरित्यें करून न घडावयाचे तेही घडलें. तदनंतर या मर्जीत कसें होईल जाणून निरोप घेतला कीं, टोंक्यास पुढें जातों. जावें म्हणून आज्ञा दिली. टोंक्यास येऊन राहिलों. तों श्रीमंतही मागाहून तेथेंच आले. पुन्हां दर्शन घेतलें. मर्जी बिकट असतां एक शालिग्राम मागितला. तो बहुत करून कृपेंकरून आज्ञा झाली कीं, क्षेत्रांतून पाहिजो तो घेणें. सीतारामचंद्र मूर्ती घेतली. एक दिवस प्रदोष तेथें पडला. ते दिवशीं श्रीमंत थोरले राव यांचें श्राद्ध म्हणून मला भोजनास बोलाविलें. मी विनंती सांगून पाठविली कीं, प्रदोष आहे. तत्रापि यावें म्हणूनच उत्तर जाहलें. यावरून स्वारी देवास जातेसमयीं गुरुजीकडून विचारविलें. तेव्हां आज्ञा जाली कीं, रावसाहेब यांचें श्राद्ध आहे याजकरितां जरुर जरुर यावें. त्या वरून गेलों. श्राद्धाचे ब्राह्मण [यांचीं] भोजनें जाहलियावर खांसा भोजनास बसले. एकीकडे श्रीमंत माधवराव [व] एकीकडे मला बसविलें, आणि दुसरे स्त्रीकडून वाढविलें. तिला शिक्षा वाढावयाची दाखविली. अर्थात् मातोश्रीकडून लेंकरास वाढविलें. नंतर श्रीमंतांस विनंती केली कीं, कांहीं दिवस गंगातीरीं राहून मन स्वस्थ करावें असें आहे. त्यावरून आज्ञा जहाली कीं, कांहीं दिवस रहावें. श्रीमंत कूच करून पुण्यास गेले, तों शरीर क्षीणच होतें. शेवटील समय. लवकर यावें म्हणून पत्रें आलीं त्यांचे अन्नाचें शरीर समयीं जवळ असावें, याकरितां पुण्यास येऊं लागलों. तो पारनेरा अलिकडे वर्तमान आले कीं, कैलासवास केला. श्रीमंत दादासाहेब यांची पत्रें आलीं कीं, जरूर यावें. पुढें पुण्यास आलो. श्रीमंतांस देवदेवेश्वर सन्निध कैलासवास जाहला. हें ऐकून श्रम जहाले.

[ काव्येतिहास-संग्रह : पत्रें यादी वगैरे ले. १९२ ]

---

## १. श्रीशिवछत्रपतीस राज्याभिषेक

तुंगभद्रातीर रामेश्वरपासून देखील गोंडवण, चांदे व वराड ह्या प्रांतांत नर्मदेपर्यंत चौथमोकासा अंमल बसून महाराजांचा चालला. तेव्हां सार्वभौमपद करण्यास, सिंहासन करण्यास अधिकार जाहला. दाहा कोटी खजिना संग्रह आला, व मंत्री अष्टप्रधान करणें याची लक्षणे जशी शास्त्रीं तसे प्रधान प्राप्त जाहले. सैन्य-अश्व गज रथ पदाति चतुरंग-पाहिजे तसें सिद्ध जालें. आपले पूर्वज पूर्वीपासून छत्रसिंहासनयुक्त राज्य करित आले, त्या कुळीं आपण येऊन त्या सिसोदे कुळीचा धर्म दुष्ट यवनाचें पारपत्य त्याचे न ह्मणवितां करणें तो श्रीनीं कृपा करून श्रीसांबांनीं व श्रीभवानीनीं आपले हातें चालविला; कुळधर्म जतन केला; आरशीसिंह याचे वंश छत्रसिंहासन करून राज्य उदापुरीं करीत आहेत, व आपले कुळींचे पुरुष कच्छभुज व नेपाळ येथें राज्य छत्रसिंहासन करून करितात. आपण हें राज्य दक्षिण प्रांतचे प्रतापें सोडविलें. श्रीमहाराणा सजणसिंह याचे वंश आपण, तस्मात् छत्र सिंहासन पृथक् करून राज्याभिषेकयुक्त होत्साते पूर्व युगीं राजे धर्मनीति करून राज्य करीत आले तसें आपण करावें, म्हणून महाराजांनीं दृढ संकल्प केला. राज्य करण्यास अंगे सात पाहिजेत-राजा, प्रधान, राष्ट्र, दुर्ग, कोशबल, सुहृदबल, व सेना, हीं सात अंगे असावींत तशीं सिद्ध जाहलीं. या उपरि सिंव्हासनाधीश्वर म्हणवावें ऐसें चित्तांत आणून महाराजांनीं श्रीस प्रार्थना केली. श्रीनींही स्वप्नगत दृश्य होऊन "तुजला वर दिल्हा, तसेंच त्या कुळांत अंशभूत होऊन धर्म वृद्धिंगत केला. सिंहासनाधीश होणें, हाही हेतु पूर्ण करितों."-ऐसी आज्ञा जाली, आश्वासन जालें. त्यानंतर मातुश्रीस विनंती केली. त्याची आज्ञा घेतली. श्रीरामदास स्वामींकडे कारकून पाठविले, विनंति केली. त्यांणीं अनुमोदन दिल्हें, आणि कार्यसिद्धि होईल अशी आज्ञा जाली. चिंचवडचे देव व इतर साधूंकडे कारकून पाठवून त्यांची आज्ञा आणली. आणि सर्व राज्यांतील मोठे मोठे पंडित, विद्वान्, वैदिक व प्रतिष्ठित ब्राह्मण शिबिकादि यानें पाठवून बोलावून आणिले. सर्व

सरकारकून व सरदार जमा केले. आप्त, सुहृद, संबंधी, इष्टमित्र, यांस आणून सभा करून आपलें मनोगत, याउपरि या अन्वयें छत्र सिंहासन करावें असें आहे, याचा विचार कसा करावा म्हणून स्वतः प्रश्न केला, आणि सर्वांचे अनुमोदन घेतलें. राज्याभिषेक करावा असें सिद्ध जालें. शिष्ट संमतें विचार करितां राज्याभिषेक करण्यास आदौ व्रतबंध होऊन सर्व विधि जाले पाहिजेत. यास श्रीकाशी व पैठण व सर्व क्षेत्रींची शिष्ट मंडळी यांचें विचारावांचून येथें सिद्धता कैसी करावी असा विचार पडला. सर्वही सरकारकुनांस विचार कसा करावा ऐसें प्राप्त जालें. ते समयीं बाळाजी आवजी चिटणीस यांणीं उठोन विनंती केली जे, "सर्व जे जे मनोरथ स्वामींनीं केले ते दुर्घट असतांही घडले. यांतच काय अशक्य आहे? चार वेद सहा शास्त्रें असें ज्यांचे अध्ययन, असें श्री काशींत मुख्य भटांचें घर आहे. त्यांतील धर्मप्रवृत्ति ग्रंथ त्यांजपासून उत्पन्न होतात, तेच धुरीण पंडित गागाभट्ट अनायासें पैठण येथें महाराजांची कीर्ती श्रवण करून आले आहेत. त्यांस व पैठणचे पंडितांस आणून त्यांचे विचारें सिद्धता करावी." याजवरून त्यांस उद्योग करून आणवण्याची आज्ञा जाली. तेव्हां सर्वांचेही संमत आणावें असें जालें. याजवरून केशव पंडित व भालचंद्र भट पुरोहित हे बाळाजी आवजीचें गुरुस्थान, व सोमनाथ कात्रे यांचेच आश्रित. यांस दहा हजार रुपये व पालख्या देऊन बावांस व पैठणकरांस आणावयास रवाना केलें. त्यांणीं जाऊन महाराजांचा उद्योग व मनोरथ त्यांस समजावून त्यांशीं व पैठणकर पंडितांशीं एकवाक्यता केली. आणि उदापूर जयपूर येथें राज्यभिषेक विधि होतो. त्याप्रमाणें करावें असें सिद्ध करून घेऊन आले. त्यांचा रायगडीं महाराजांनीं सामोरें जाऊन बहुत सत्कार केला. आदरें करून ठेविले आणि इकडील सर्व थोर थोर ब्राह्मण व मुत्सदी सहवर्तमान सभा केली. आणि विचार केला कीं, हे उदाजीचें राणाजीचे घराणेंतील वंश, सिसोद कुळपरंपरा पुरुष पिढ्या लावून या प्रांती हिंदुस्थानांतून आले; रजपूत राजवंश महाराष्ट्र देशीं मराठे म्हणवितात; उदापूर जयपूर येथें राज्याभिषेक सिंहासन व्रतबंध होत येतात; जयसिंग यांणीं काशिक्षेत्रादि ब्राह्मण नेऊन अश्वमेध केला; हा सर्व निर्णय ते समयीं जाहला आहे. त्या अन्वयें राज्याभिषेकांत व्रतबंध करून अभिषेक करावा; हे त्यांचे कुळींचे, यांस छत्र सिंहासन अधिकार

चाललाच आहे, असें ठरलें. महाराजांचें वय शेचाळीस वर्षांचें, पुत्र दोन जाहले असतां अभिषेकाचे पूर्वांगी व्रतबंध करावा ऐसें सिद्ध करून, सर्व पंडितजन, ब्राह्मण यांचें संमत झालें आणि मंत्री लक्षणयुक्त, व अभिषेक-संभार साहित्य, समुद्रोदकें व महानद्यांची पुण्योदकें व गज अश्व सुलक्षाणिक व स्थळे कशीं करावीं, ब्राह्मण भोजन लक्षावधि करावें. व्याघ्रांचीं चर्में व सुवासिनी कन्या सुवर्णकलश, पीठ व सिंहासन करण्याचा विधि सांगितला असतां, महाराज बहुत संतुष्ट होऊन राज्याभिषेक सुमुहूर्तकाल योजावा असें सांगितलें. मुहूर्ताचा निश्चय शास्त्रीं आहे तो काढिला. पाहणार ज्योतिषी, गणक सिद्धांत वक्ते विचक्षण निपुण असें तीन असावे, यांहून उणे नसावे; अधिक असतील तितके असावे. यथासंभव त्यांणीं विचार करून दक्षिणायन, त्यांतही अवश्य कर्तव्यच आलियास कार्तिक मार्गशीर्ष पौष हे घ्यावे. उत्तरायणीं चैत्र व अधिकमास नसावा; पर्जन्यकाळ खेरीज सर्व युक्त आहेत, नक्षत्रात ध्रुव नक्षत्रें व विष्णुनक्षत्रें असावीं. याप्रमाणें योग करणादि योग्य असा निश्चय करावा.

त्याप्रमाणें पाहून सर्वमतें आनंदनाम संवत्सर ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी सिद्ध केली, आणि संपूर्ण क्षेत्रें, व प्रतिष्ठित ब्राह्मण, व मांडलिक राजे, इष्टमित्र, सर्व राज्यांतील सेवकजन यांस येण्याविषयीं पत्रें आमंत्रणाचीं लेहविलीं. समारंभास स्थापनाची योजना मुख्य सिंहासन राजधानी करणें, त्यासीं पुण्यदेश पुण्यभूमि पाहून आसमंताद्भागीं पुण्यक्षेत्रें व महानदी, व त्या स्थानीं विपुल उदक कृत्रिम सरिता म्हणजे पाट नहर यांचीं उदकें सर्व धान्यें त्या देशीं व्हावीं एसें स्थान व शत्रूंस दुःसाध्य असावें. याजवरून रायगड ही जागा, सर्व राज्यांत दुःसाध्य व श्रीकृष्णासमीप, सर्व उत्तम लक्षणें आहेत, पाहून योजिला. तेथें सिंहासनास सभा करविली. ज्या सभेंत सहस्रावधि मनुष्यें बसावीं, त्यांस शीतोष्णबाधा न व्हावी, चित्रविचित्र स्तंभ, अष्ट-प्रधानांचीं स्थानें भितीवगैरे परम रमणीय ऐसें करवून त्यांस उल्लोच व विताने म्हणजे चांदवे चांदण्या सुवर्णमंय वस्त्रें किनखाप बदली ऐशा करविल्या. पटल म्हणजे असे किनखापी करविले. सिंहासनाचें स्थान, तेथें सुवर्णाचे स्तंभ चार, त्यांत चांदवा अमोल्य जरीचा, त्यास मुक्ताफळांचे गेंदांचे घोस, ऐसें बहुत चांगलें सभास्थान करवून

सर्व राजमंदिरें यांस चित्रें रंग देऊन जागा जागा उत्तम स्थळें केलीं. थोर थोर ब्राह्मण, मांडलिक राजे येतील त्यांस स्थळें निराळीं निराळीं योग्य अशीं करविलीं; आणि मोठे विस्तीर्ण मंडप, सभेस व भोजनशाळा वगैरेस केले. सर्व राज्यांतील गुणिजन, वारांगना, कलावंतें, गायक, व वाद्य वाजवणार बहुत कुशळ तितके आणिले. कुंड, मंडप, वेदि करून होमशाळा अभिषेक-स्थान परम निपुण श्रोत्री ब्राह्मण यांजपासून परम रमणीय असावें तसें करविलें.

बहुत जण येणार त्यांस दुर्गाखालीं स्थळें, ब्राह्मणभोजनास एक एक स्थळीं पांच पांच हजार ब्राह्मणांची पंक्ति व्हावी अशी दाहा पांच स्थळें निराळीं निराळीं, त्यांस मंडप व पारपत्यगार, पाककर्ते व वाढणार ठेवून तरतूद करून दोनप्रहरीं ब्राह्मणभोजनें होत असावीं, दिव्य षड्रस अन्नें नित्य नूतन उत्पन्न होत असावीं, ऐसे करविलें. तसेंच किल्ल्यावर पांचसहस्त्र ब्राह्मणभोजनास स्थळें व दाहा सहस्त्र सुहृद आप्त यांचे भोजनाचीं स्थानें करविलीं. तसेंच लक्षावधि ब्राह्मणभोजन, आप्त व राजे, मांडलिक, सेवक जन व शिष्टसमुदाय यांस अमुक पदार्थ नाहीं, किंवा न्यून पडला, सरला, असें न व्हावें अशी आज्ञा करून धान्यांचे व साहित्याचे पर्वतप्राय डेरे करविले. इच्छिला पदार्थ ज्यांणीं जो मागितला तो सिद्ध तात्काळ व्हावा, कोणाएकास आबालवृद्ध यांचा सत्कार नाहीं झाला असें चुकोन राहिलें, साहित्य न्यून पडलें, असें न होतां करणार अध्यक्ष अधिकारी एक एक पदार्थास एक एक अधिकारी, एक एक कारखानाच पदार्थाचा, व करण्यास एक एक अधिकारी व मनुष्य, व त्याजवरी एक सर्वाध्यक्ष असें योजून करून देविलें.

सर्व सरकारकून व सरदार व सुमेदार मामलेदार, व कारकून लोक व सेवक लोक असे दाहा पांच लक्ष मनुष्य जमा जाले. पन्नास हजार ब्राह्मण समुदाय जमा जाला. सर्वांसही मोठा हर्ष व उत्कर्ष, ज्यास जे अधिकार नेमून सांगितले ते बहुत सावधपणें तिळमात्र न्यून पडूं न देतां प्रथमपासून सिंहासनआरोहणापर्यंत कोणते दिवशीं प्रातःकाळपासून सायंकाळपर्यंत काय व्यवहार होणें, त्याचें साहित्य काय, कोणास काय देणें, याचे नियम करून जाबते लिहून पुन्हा गलबल द्या घ्या म्हणावयाची एकही पडूं नये, ऐसें करून, ज्याचें त्याजपाशीं देऊन, तिळमात्र गर्गशा अथवा बोभाट न पडतां तो दिवस सिद्धीस जावा ऐसें करून दिल्हें.

व्याघ्रचर्मे मृगचर्मे आणविलीं. समुद्र व पुण्यनद्योदकें आणविलीं. सर्व-संभार सिद्ध जाहला. आणि मुहूर्ताचे समारंभाचे पूर्वी सात दिवस पूर्वांग शांति यज्ञ होणें ते ज्येष्ठ शुद्ध षष्ठीपासून त्रयोदशीपर्यंत नेमले. प्रथम ज्येष्ठ शुद्ध चतुर्थीस व्रतबंधाचे समारंभास प्रारंभ होऊन पंचमीपर्यंत यथाविधि व्रतबंधन झालें. ब्राह्मणभोजन दोन दिवसांत लक्ष जालें. तदंग दक्षिणा सर्वांस एक रुपयाप्रमाणें दिल्ही. पंडित वैदिक शिष्ट यांची संभावना यथायोग्य जाली. त्यानंतर षष्ठीस प्रथम पटबंधनविधि करून ऋत्विजवर्णन पुण्याहवाचनपूर्वक यज्ञास प्रारंभ करून विनायकशांति आदौ केली. सात दिवस अग्नीचीं चिन्हे पाहणें वगैरे करविलीं. सर्वही कार्य निर्विघ्न होतें जालें. महाराज व ऋत्विज निरशनव्रतस्थ, घृत पय फळें आहार करून नक्षत्रशांति व ग्रहशांति ऐंद्री शांति व पौरंधरी शांति यथाक्रमें करून राज्याभिषेकांग विधि सांगितले तसे करविते झाले. सात दिवस ब्राह्मणभोजन नित्य पन्नास हजार जालें. सर्व जन समारंभास आले त्यांस मिष्टान्नेंकरून आदर आतिथ्य सत्कार व शिष्टांचे सत्कार झाले. नित्य सभांगीत मंगळवाद्य, भेरी, समारंभ अत्यद्गुत किमपि व्यंग व प्रायश्चित न पडतां सांग जाला.

याप्रकारें करून त्रयोदशीचा दिवस प्राप्त झाला असतां, अष्टप्रधान करण्याची योजना करून, आठ सिद्ध केले. लेखकद्वय–एक पत्रलेखक व एक गणकलेखक, ऐसे योजिले. ऋत्विज, छंदोगामात्य, प्रधान, व द्वादश कोश, बारा महाल व अष्टादश शाळा कारखाने यांचे अधिकारी, देशाधिकारी, नगराधिकारी ऐसे सर्व पृथकाकारें योजिले. सर्वांसही मंगलस्नानें करवून महाराजांनींही मंगलस्नान केलें. विधियुक्त मृत्तिकास्नान, पंचगव्यस्नान, गंगादि पुण्यतीर्थोदके पंचामृतस्नान केलें. सर्वांनीं शुभ्र वस्त्रें, गंध पुष्प अलंकार घातले. महाराजांनीं शुभ्र वस्त्रें, अलंकार पुष्प परिधान केलें. आणि क्षीरवृक्षाचें आसन सवा हात उंच व रुंद असें करून सुवर्णे करून मढवून त्याजवर आरोहण केलें.

पट्टाराणी पटबंधन करून सईबाई साहेब बसली. संभाजी महाराज सन्निध बसले. पूर्वेस मुख्य प्रधान ब्राह्मण मोरोपंडित प्रधान पिंगळे हातीं सुवर्णकलश घृतपूरित घेऊन उभे राहिले. दक्षिणेस क्षत्रिय प्रधान असावे तसे सेनापति हंसाजी हंबीरराव मोहिते सेनापति, रौप्यकलश दुग्धपूर्ण घेऊन उभे राहिले.

पश्चिमेस निळोपंत यांचे पुत्र रामचंद्र पंडित अमात्य ताम्रकलश दधिपूर्ण घेऊन उभे राहिले. उत्तरेस छंदोगामात्य प्रधान रघुनाथ पंडितराव सुवर्ण-कलश मधुपूर्ण घेऊन उभे राहिले. त्याजपाशींच मृत्तिकाकुंभांत समुद्रजल व व महानद्या जल-कृष्णा गोदायमुना गंगेच्या उदकें पूर्ण असा ठेविला. उपादिशांचे ठाई क्रमें करून अग्निकोनास अण्णाजी पंडित सचिव प्रधान छत्र घेऊन उभे राहिले; नैऋत्यभागीं जनार्दन पंडित हणमंते प्रधान व्यजन (पंखा) घेऊन उभे राहिले. वायव्य कोनास दत्ताजी पंडित मंत्री प्रधान चामर घेऊन उभे राहिले. ईशान्य भागीं न्यायाधीश सोनोपंत यांचे पुत्र बाळाजी पंडित न्यायाधीश दुसरें चामर घेऊन उभे राहिले. सन्मुख सव्यभागीं पत्रलेखक बाळाजी आवजी लेखनपात्र घेऊन उभे राहिले. वामभागीं सन्मुख गणकलेखक चिमणाजी आवजी लेखनपात्र घेऊन उभे राहिले. आसमंताद्भागीं सर्व कोश व शाळा यांचे अधिकारी उभे राहिले. मध्यें शिष्ट, ब्राह्मण, पंडित, वैदिक, श्रोत्री, प्रतिष्ठित उभे राहिले. सुहृद्, मांडलिक राजे भोंवते उभे राहिले, आणि आभिषेकास प्रारंभ जाहला.

यथाविधि मंत्रोक्त प्रकारें प्रधान ब्राह्मण व पुरोहित ऋत्विजसह सुवर्णपात्र शतच्छिद्र करून त्यांत स्थापित उदकें करून, व प्रधान द्रव्य कलश घेऊन उभे राहिले, त्यांसहवर्तमान अभिषेक केला. ते समयीं मंगळवाद्यें भेरी गायनादिसमारंभें सर्वही आकाश पृथ्वी शब्देंकरून पूर्ण जाली. नंतर मंगल-स्नान, सुवासिनींनीं आरती केली; आणि कांस्यपात्र घृतपूरीत त्यांत मुख पाहिलें व आदर्शांत मुख पाहून ब्राह्मणांस दक्षिणासह दोन दाने दिल्हीं. आणि शुभ्र वस्त्रें अलंकार परिधान करून तदनंतर सिंहासनावर आरोहण करण्याचा मुहूर्त होता. घटिकादिस्थापना केली होती. सिंहासनसभा केली. तेथें क्षीरवृक्षाची वेदी वट औदुंबराची करावी तशी करून त्यास सुवर्णें-करून तगडें मढवून रत्नखचित केलें. प्रमाण आहे तसें केलें. त्याजवरी चित्रें प्रथम ओळ वृषभांची, त्याजवर मार्जारांची. त्याजवर तरसांची, त्याजवर सिंहांची, त्याजवर व्याघ्रांची, अशीं एका बाजूस आठ याप्रमाणें बत्तीस चित्रें चहूंकडे मिळून काढून त्यास सिंहासन असें म्हणावें, तसें सिद्ध केलेंच होतें. त्याजवरी मृगचर्म घालून त्याजवरी कांहीं सुवर्णादि द्रव्य घालावें; त्याजवरी व्याघ्रचर्म घालून, त्याजवरी कार्पास आसनें मखमलीचीं मृदु ऐशीं घालून,

बादली जरी वस्त्रें घालून उदबैन म्हणजे लोडें व तक्के, मागें प्रभावळ करून, त्यास मुक्ताफळांचे घोंस ऐसें सुशोभित केलें होतें. उत्तम लक्षणी हस्ती व अश्वरथ सजवून सुवर्णाचे अलंकार घालून राजांगणीं सिद्ध असावे तसें आणिले. आरोहणमुहूर्त घटिका लग्न नेमिलें, त्या लग्नावरी श्रीविष्णूचीसु वर्णमय प्रतिमा करून षोडशोपचार पूजन प्राणप्रतिष्ठा करून सव्य हस्ताचे ठाईं स्थापन केली, तशीच घेऊन त्यासहवर्तमान मुहूर्त घटिका पूर्ण होतांच सिंहासनाचे ठाईं आधीं सव्य जाऊन, सव्यजानु गुढगा देऊन नमस्कार करून पाय न लावितां पूर्वाभिमुख आरोहण करावें, तसें महाराजांनीं केलें. ते समयीं एकदांच भेरी व मंगळवाद्यें तोफा सरबत्ती व नृत्य गीत वाद्य जयशब्द होण्यास प्रारंभ जाहाला. तो नाद मोठा गगनचुंबित शब्द होता जाला. स्वराज्यांत किल्ले दुर्ग यांस सूचना केली होती, जे एके किल्ल्याच्या तोफा एकानें ऐकतांच त्याणीं कराव्या. त्याप्रमाणें सर्व राज्यांतील किल्ले, दुर्ग यांवर एकदांच सरबत्ती जाली.

त्यानंतर सिंहासनीं बसल्यावरी रक्तांबरें रक्तभूषणें सुवर्णमय बादली परिधान केलीं दिव्यमाणकादि रत्नें, चौकडे, कंठ्या, माळा, शिरपेंच, तुरा, झगा, पोंच्या, ऐसे अलंकार घातले; आणि विधिमंत्रे करून धनुष्यबाण पूजन, खड्गचर्म पूजन करून ते हस्ताचे ठाईं धारण केले. त्यासमईं सुवर्णाची पुष्पें व रौप्यमय करून वृष्टि केली. षोडष सुवासिनी यांनीं, मंगल आरत्या ब्राह्मणकन्या घेऊन उभें राहून कराव्या तसें केलें. त्यांस वस्त्रें भूषणें अलंकार दिल्हे. नंतर सिंहासनाचे ठाईं बसल्यावरी, मंत्रविधि करणें ते करून ब्राह्मणांचे आशीर्वाद घेणे ते घेतले. ऋत्विज, आचार्य व ब्राह्मण पूजन करून गागाभटजी याशीं लक्ष रुपये दक्षणा संभावना केली. वस्त्रेंभूषणें दिल्हीं. सर्व ऋत्विज यांस पांच पांच सहस्त्र दक्षणा अळंकार दिल्हे. पुरोहित यांस चोवीस सहस्त्र रुपये दक्षणा वस्त्रें अळंकार भूषणें आधिक दिल्हे. शिष्टमंडळी पंडित यांस कोणास सहस्त्र, पांचशत, दोनशत असे योग्यतेनुरूप दिल्हे. सर्व ब्राह्मण समुच्चय यास देकार पंचवीस रुपयेप्रमाणें मेढा करून तेथें खालीं करविला. गोसावी, तडीतापडी, गोरगरीब, भिक्षुक, तितक्यांस देकार दोन चार पांच रुपयेप्रमाणें देवविले. किल्ल्याखालीं व वर देकार वांटणेस प्रारंभ एकदांच करविला. याप्रमाणें महाराज शालिवाहन शके १५९६ पंधराशें शाण्णव आनंदनाम संवत्सर ज्येष्ठ शुद्ध १३ गुरुवासर सुमुहूर्तें छत्र सिंहासनाधीश्वर

जाले. आणि राज्याभिषेक त्या दिवसापासून आपला शक त्यांणीं चालविला. सिंहासनारूढ होऊन त्यानंतर अष्टप्रधान यांस व दरखदार, महालदार, कारखानदार, सर्व सभांचे जे अधिकारी, त्यांस अधिकाराची वस्त्रें दिल्हीं. अष्टप्रधान यांचे दरख केले. मुख्य प्रधान यांस व सेनापति यांस बादली वस्त्रें पांच, सणगें व शिरपेंच, मोत्यांचे तुरे, कंठ्या, चौकडे, झगे, व शिकेकटारा, व ढालतरवारा, व चौघडे नोबती, व जरीपटके, हत्ती, घोडे, व सोन्याचे दांडीच्या चवऱ्या, याप्रमाणें देऊन पदें करारपत्रें करून दिल्हीं. अमात्यांस बादली वस्त्रें, पोषाख, व ढाल तरवार, चौकडा, कंठी, तुरा, शिरपेंच, शिकेकटार, रूप्याचें कलमदान, ताडीचे व चवरी, हत्ती, घोडा याप्रमाणें दिल्हे. सचिव पंडित यांस बादली वस्त्रें, पोषाख, कंठी, चौकडा, तुरा, शिरपेंच, शिकेकटार, ढाल तरवार, हत्ती घोडा ऐसे दिल्हे. सुमंत व मंत्री यांसही पोशाख, दागिने सदरहुप्रमाणें ढाल, तरवार हत्ती घोडे चवऱ्या दिल्हे. पंडितराव यांस बादली, पोशाख, शिरपेंच, कंठी, चौकडा, तुरा, चवरी हत्ती घोडे याप्रमाणें दिल्हे. व न्यायाधीश यांस त्या अन्वयें दिल्हें. त्यांणीं पदें बहुमानें घेऊन महाराजांस नजरा करून मुजरे केले. बाळाजी आवजी यांस चिटणिशीचीं वस्त्रें, मंदील, दुमजला, दुपेटा, झगा व विजार, कंठी, व शिरपेंच, चौकडा, रुप्याचें कलमदान पेटीचें, चवरी व घोडा याप्रमाणें दिल्हें. तसेंच चिमणाजी आवजी यांस फडणिशीची वस्त्रें कलमदान ताडीचें असें दिल्हें. त्यांणीं मुजरे केले. अष्टप्रधान यांस स्वारीस जाणें, तालुके राखणें, तेथें राहणें, यास्तव सर्वांस मुतालिक करून दिल्हे. त्यांस वस्त्रें बहुमान दिल्हे. राजाज्ञापद शंकराजी नीलकंठ महगांवकर यांशीं दिल्हें. वरकड महालदार कारखानदार यांस ज्याचे त्यास अधिकाराचीं वस्त्रें दिल्हीं. शामजी नाईक पुंडे यांस पोतदारीचीं वस्त्रें दिल्हीं. बाळाजी रघुनाथ सबनीस फौजेचे यांस बक्षीगिरीचीं वस्त्रें ढाल तरवार कलमदान ताडीचे ऐसें दिल्हें. वरकड सरदार मातबर, फौज वागवणार, मानकरी, यांस जशी ज्याची योग्यता तशी कोणास साडेतीन सणगें, कोणास दोन कंठ्या शिरपेंच, ऐसे योग्यतेनुरूप याप्रमाणें सर्वांचे बहुमान नेमून देवाविले.

मुजरे नजरा घेऊन, घोडा सुलक्षणीक सोन्याचें जडवाचें सामान बादली मोत्यांची झालर ऐसें साज करून आणिला, त्याजवर आरूढ होऊन

राजांगणांत येऊन सोन्याची अंबारी, त्यास मोत्यांचे अलंकार जरीबाब शे झालरा ऐसा गज सज्ज करून आणिला त्या अंबारींत बसले. हत्तींचे मस्तकीं सेनापति एक मोर्चेल व अंकुश घेऊन बसला. पाठीमागें मुख्य प्रधान खवासींत मोर्चेल घेऊन बसले. वरकड अष्टप्रधान दरखदार यांस निराळया निराळया अंबाऱ्यांत बसविलें. कोणी हौद्यांत, कोणी घोड्यावर, याप्रमाणें खासे अंबारीचे पाठीमागें चालणार तितके सरदार वगैरे बसवून चालविले. सर्व रस्ते व घरें रंगविलीं. ध्वज पताका तोरणें लाविलीं. मार्गांनीं झाडून सडे घालवून रांगोळया घातल्या, अलंकृत करविले. सर्व नगरदेवता यांच्या पूजा यथासांग नैवेद्य धूप दीप ऐसे करविले. त्यामार्गें करून पुढें जरीपटका व भगवें निशाण यांचे हत्तीं दोन; त्यामागें प्रधान सेनापतीचे पटक्याचे हत्ती व सर्व फौजेंतील निशाणें; त्याबराबर हुजूर पागा; करवाल लोक; घोडे, सोनेरुपेचें सामान, बंदुका, अमौल्य उत्तम वस्त्रें आभरणें करून युक्त, ऐसे शूर व सेनाधुरंधर पदाचे अधिकारी बिनीसंरक्षणास त्याज-बराबर चालले. तोफा गाड्यांवर चालणार. स्वारींतील व रथ अश्वांच्या गाड्या. त्यामागें नानाप्रकारचे शूर अश्वांवर व गजांवर बसणारे चालले. त्याचे मागें नाना प्रकारचे पदाति पटेकरी विटेकरी सांगबर्ची बाणेकरी चालले. खास. बारदार बंदुकीचे लोक रणवाद्यें तासे मर्फे हलग्या वाजंत्री वाजवीत चालले. त्यांचे मागे कोतवाल हत्ती पन्नास, व सांडणीस्वार शंभर, व बाणाच्या कैच्या उंटावर चालले. त्यामागें कोतवाल घोडे शेंपन्नास चालले. त्यामागें नाना-प्रकारचीं मंगळवाद्यें शाहाचाजे वाजवणार काळूसनया घोड्यावर बसोन नगार्जी चालले. त्याचेमागें धाडीगाणार घोड्यावर भाट बंदीजन प्रताप वर्णन करीत चालले. त्यांचे मागें लग्या निशाणें व बाणदार जरी व तोमर भाले बोंथाट्याचे लोक चोपदार वेत्रधारी चालले. हत्तीवर बसलेले ऐसे शूर मल्ल जेठी लोक चालले. त्यांचे मागें महाराजांच्या हत्तींभोंवते पायचे लोक सरदार मावळे मोठेमोठे पोशाख वस्त्रें अलंकार ऐसे सभोवते दुरून चालले. कांहीं अंतरें करून सर्व अष्टप्रधान मुत्सद्दी यांच्या अंबाऱ्या शेंपन्नास चालल्या. यांचे मागें फौजेचे लोक नेमिले तितकेच. याप्रमाणें रस्त्यांतून मिरवत देवता-दर्शन करून त्यांस वस्त्रें अलंकार फळें दक्षणा देऊन पुन्हा रस्त्यानें माडी-वरून कन्या सुवासिनी मंगळ आरत्या दहीलाह्या पुष्पें दूर्वा यांची

वृष्टी करितात असे होत्साते राजद्वारी येऊन रथांत बसोन राजांगणांत गेले. तेथून शिबिकेंत बसून सभाद्वारीं पूर्ण कलश व निंबलोण उतरोन टाकिलें. त्यास वस्त्रें अलंकार दिल्हे आणि गृहप्रवेश करिते झाले.

आदौ गृहीं कुळदेवता नमस्कार पूजा करून फलतांबूल दक्षणा अर्पण करून मातुश्रीस नमस्कार केला. राजपत्न्या यांणीं ओंवाळिलें, त्यांस वस्त्रें अलंकार अमोल्य देऊन सिंहासनाचे ठाईं येऊन बसले. सर्वांच्या नजरा घेऊन सर्वांस विडे देऊन निरोप दिले. ब्राह्मणभोजनें जालीं. इष्टजन आप्त यांसहवर्तमान मिष्टान्न भोजन करून तांबूल भक्षिले. आप्तजनांस निरोप देऊन मातुश्रीपाशीं बसोन, आपले आशीर्वादें मनोरथ सिद्धीस गेले, इत्यादि गोष्टी करून मातुश्रीची पूजा वस्त्रादिकरून अंतःपुरांत गेले. द्वितीय दिवसाचे ठाईं सर्व गुणिजन कलावंत जन यांस विपुल द्रव्य व वस्त्रें देऊन संतुष्ट केले. मांडलिक राजे व संपूर्ण जन यांसह पंडित शिष्टसमुदाय आले, त्यांचे सत्कार भोजनादि करवून वस्त्रें भूषणें देऊन निरोप दिल्हे.

[ काव्येतिहाससंग्रह प्रत १८८२. पृ. ११९ पृ. १२५ ]

---

## क्रमांक १२ : : संभाजीराजे यांचें चरित्र

### ( चिटणीसकृत )

#### १. "तुमची बेटी घ्यावी म्हणजे वाटतों"

१४. महाराज रायगडाहून किल्ले पन्हाळ प्रांती जावयास प्रतापगडचे देवीचें दर्शन करून, परळीस येऊन, समाधीचें दर्शन घेऊन, तेथें पूजा अर्चा उत्साह ह्यांचे बंदोबस्तास गांव वगैरे नेमून दिले व चाफळचे उत्साहाचा बंदोबस्त करून पन्हाळयास स्वारी पावली. तेथून राजापूर प्रांतीं गेलियावर तेथेंच कांहीं दिवस राहिले. ते समयीं गोंव्यांचें राजकारण आलें. तें सिद्ध करून खांसाच फौजबंदी, पायलोक करून, समुद्रास भरतें न आलें तों समय

नेमला. ते वेळेस जाऊन पोहोंचावें, डाक ठेऊन जावेंसें सिद्धांत करून स्वारी केली. महाराजांनीं डाक चौकीचे लोक ठेवून त्वरेंकरून पाठवावे ऐसा बेत केला. तैसेच निघोन जातां वाटेस मदनगडचीं पत्रें बातमीची आलीं. ते समयीं लिहिणार कोणी आहे नाहीं विचारलें. तों खंडो बल्लाळ यांणीं महाराज कृपा करीत तों पायउतारा स्वारीबरोबर असावें ऐसें व्रत केलें होतें. तसेच पायउतारां पाठीमागे जात होते. तों लोकांनीं सांगितलें कीं, खंडोबा चिटणीस धांवत येत आहेत. ते समयीं हाक मारविली तों धावून येऊन पावले. त्यांस जाब लिहून देणे [ असें ] सांगितलें. तों बसोन लेहून दिल्हे. स्वारी पुढें गेली. पुन्हा धावून निशाण करून दिल्हें. तों रक्त ओकले. [ तें ] पाहून आस्ताव्यांतून पाणी देवून खांसा घोडा जिलबीस होता तो देऊन बसा म्हणोन सांगितलें. गोंव्यानजीक गेलियावर पालखीतून उतरून घोडियावर स्वार जाले. आणि निकडीनें जाऊन आटोपावें म्हणून पोहोंचले तो त्या अवसरीं भरतें प्राप्त झालें. फिरंगी सावध होऊन उभे राहिले. लढाई पडली. फिरंगी मोडिला. लोक फार मारिले असतां पळून गोंव्याचे किल्ल्यांत गेले. महाराजांनीं खांसा घोडियावरून जिनास पाणी लागे तों घोडा घातला. त्याजबरोबर खंडो बल्लाळ यांणीं घोडा घालून तलवार मारिली. शिपायगिरी केली. गोंवेकर सावध जाले. पाणी चढलें तेव्हां माघारे फिरलें. तों घोडा पहुणीस लागला खंडो बल्लाळ यांणीं उडी टाकून महाराजांचा घोडा धरून पोहून बाहेर निघाले. ते समयीं बहूत संतोष होऊन पोटाशीं धरिलें, आणि बोलिले जे, "तुझे वडील निरपराधे लुच्यांचे सांगण्यावरून विचार न करितां मारिले असतां आज चाकरीची शर्त केली! तुझी चिटणिशी महाराजांनी वंशपरंपरे करून दिल्ही, निसबतीचे धंदे कारखानिशा जमानिशा तेबहाल आहेत. कैलासवासी महाराज तुमचे वडिलांवरि प्रीती विश्वास ठेऊन करीत होते तें पाहिलें आहे. त्याहून अधिक तुम्हांवर प्रीती विश्वास ठेऊन चालवीन. कुलीन खरे!" ऐसे नांवाजून "आमचे वंशीचा असेल तो परंपरेनें तिन्ही धंदे चालवील," एसें पुनः अश्वासन देऊन घोडा बक्षिस दिला. खांसा उतारपोशाख व मोत्यांची कंठी व तुरा दिला. स्वारी माघारी आलियावर पालखी बहुमान देऊन गौरव करून मुतालिक लिहिणार बोलावून "यांचे आज्ञेत सांगतील तसें चालावें, तेरीख व पत्रें यांचे सांगण्याखेरीज लेहूं नये,"

ऐसें सांगितलें. वरकड लोकही बराबरचे यांणीं कामें काजें केलीं. तरवारा मारिल्या व पाण्यांत उड्या टाकिल्या, त्यांस बक्षिसें दिल्ही. तैनातही वाढविल्या. महाराज संगमेश्वरींच राहते जाले.

१५. [पुढें] दिवसेंदिवस कबजीचे स्वाधीन अधिकच होत चालले. इतबार मनसबा सर्व त्याचेच स्वाधीन. कोणीही पुरातन राज्यांतील इतबारी त्याची प्रतिष्ठा ठेवावी अथवा मसलतींत घ्यावा, हे गोष्ट राहिली. उग्रपणें शासन कोण्ही वर्णविचार न करितां शिरच्छेद करावा, ऐसें करीत चालले. कबजीचे सहवासें त्याचे वाममार्ग कर्मे तेणेंकरून फारच विचार राहिला नाहीं. माणूसमात्र फारच त्रास पावतें जालें. सर्व प्रजेचीही क्षोभता जाली. न्यायाची रीत राहिली नाहीं. देवब्राह्मणांचे ठायींही निष्ठा राहिली नाहीं. असे आचरण धरिलें. एक कबजी सांगतील तें प्रमाण. दैवयोगेंकरून होणार काल प्राप्त जाला. त्या योगें दुसरें सुचूं नये. याप्रमाणें जालें. मातबर व बुद्धिवंत व शूर होते ते हतवीर्य जाले. महाराजांनीं नूतन पराक्रम करावा, नवें राज्यसाधन करावें, हें राहिलें नाहीं. सुभेदार प्रांतातील वगैरे, तैसेच गडकिल्ले यांचे कारभारी, यांजवरी हा कारभारांत खातो म्हणून चुगली करितांच त्याचा विचार न करितां त्यास आणावा, मारावा, नागवावा. अंतरच असलिया शिरच्छेद करावा. या भयेंकरून मातबर चार होते. ते कोण्ही जवळ बोलूं न पावत. त्यांस आपली आपलीच अबरू प्रतिष्ठा जतन होणें हेंच येऊन पडलें. एक कबजीचें सांगणे मात्र प्रमाण. त्या नादें महाराज चालणार. त्यासच अनुमोदन देणें. मग विचार काय राहिला? तजकरे घ्यावे, घरें बुडवावीं, नागवावें माणूस राज्यांत वाढले ते कांहीं परराज्यातून आणून वाढविले ऐसे घडत नाहीं. ऐशीं राज्यक्षयाचीं लक्षणें होत चाललीं. राज्य क्षयास जाणार त्या योगें [असे] घडत चाललें. वडिलोपार्जित सेवकांच्या प्रतिष्ठा राहिल्या नाहींत. सर्वही लघु मनुष्यें वृद्धिंगत जालीं. राज्यांतील सर्व कारभारी किल्ले सुभे यांणीं राजमुरा वाटणे इत्यादिक बारीक मोठी वर्तणूक करणें तें आज्ञा नेऊन करावी, तसें चालावें, हे थोरल्या महाराजांनीं रीत घातली. बंदोबस्त हुकुमाशिवाय काडी व हालावी असें केलें होतें. त्या चालीनें सर्व जागजागांचीं लिहिलीं यावीं. ते समयीं सर्वाध्यक्ष कबजी [यांजवर] अतिप्रीती, त्यांणीं इतका कारभार कोठवर करावा ऐसें म्हणावें.

व त्यांस 'छंदोगामात्य कविकलश पंडितराव' ऐसा किताब दिल्हा. तेव्हां सर्व आला कारभार, 'त्यांजकडे जा' म्हणावें. बावांनीं कागद पाहाणें केलेलेंच आहे. तथापि लिहिणार इतकें काय म्हणून लिहितात, यांत काय आहे. हंशील कलम ल्याहावें, तें चराठी कशास लिहितात व चंदीपर्यंत किल्ले घेऊन काय समजोन करणारांनीं केलें कळत नाहीं. किल्याचा बोभाट यावा, गनिमांनीं वेढा घालावा, त्याचें वर्तमान येथें येऊन पोहोंचून उपराळा जावा तों तो किल्ला जावा, लोक मारले जावे, हें पातक किती घडतें. व दुर्लौकीक मोठा होतो कीं नाहीं? राज्य आंगठीचें ठिकड असें आसपास असावें. पाहतां सर्व ध्यानांत येत असावें. म्हणजे उपराळाही होतो. बंदोबस्त यथास्थित राहतो. सेवक मर्यादेनें चालतात. असें अनेकप्रकारें [बावांनीं] कल्पना कराव्या, बोलावें. त्यांस महाराजांनी ऐकावें [हें] त्यांचें दैव! ब्राह्मण लघु असता योग्यता आली तेव्हां त्यास तर्क व कर्तेपणा, बुद्धी कोठील कळतच आहे. राजे तरि त्याचे स्वाधीनच वश जाले. राज्यभ्रष्ट होणार, तेणेंकरून कांहीं सुचतें न झालें. थोर थोर ज्यांणीं राज्याविशी पराक्रम केले, राज्य वृद्धीस नेलें व शूर पराक्रमी यांणीही ऐकावें, आचरण सकल पाहावें, आणि म्हणावें कीं, "देवांनीं आम्हांस कां ठेविलें? कैलासवास महाराजांनीं केला त्या अगोदर मेलों असतों अगर महाराजांनीं सर्व मारिले यांत मारिलें असतें तरि उत्तम होतें; परंतु असे दिवशीं हें पाहणें अनुचित. यांचें अन्न बहूत दिवस खादलें व या राज्यांत वाढलों, लौकिक मेळविला, तें व्यर्थ जिणें, ऐसें घडलें. महाराजांचें अकल्याण होतें. आम्हांस पराक्रम, बुद्धी असून व्यर्थ झाली." ऐसे बहूत श्रम करून "होणें तें होईल, पाहाणें प्राप्त; उगेच असावें." ऐसे सर्व करिते जाले. सर्वही हतवीर्य होऊन कांहींएक न बोलतां राहते जाले. पागा, हत्ती, सर्व कारखाने, फौज जिकडील तिकडे बेनिगेनें बुडाले, मेले, गेले. फौजेचा दरकार नाहीं. बुडाली लोक नामी, माणसें कर्तीं, चहूंकडे चार गेलीं. पिलाजी शिर्के व तानाजी शिर्के, गणोजी शिर्के हे महाराजांचे आप्त. यांणीं राजा वेडा जाला, कबाजीनें वश केलें, राज्य बुडतें, त्या अर्थीं हिय्या करून शिवाजी राजे, शिर्के यांचे भाचे, यांस घेऊन राज्यावर बसवावें. राजाराम काढून त्याचे हातें कारभार चालवून राज्य रक्षावें, ऐसें

राजकारण केलें. तें संभाजी महाराज यांस समजलें, फुटलें. आधींच क्रूरमर्जी, यांत यांजपासून अंतर ऐसें समजलें तेव्हां इतराजी केली. घरीं जप्ती पाठविली. [ घरें ] लुटलीं, जाळलीं. एक दोन शिर्के सांपडले ते मारिले. शिर्के जेथें असतील तितके मारावे ऐशी आज्ञा करून शिरकाण करविलें. ते समयीं दौलतराव शिर्के, गणोजी व देवजी शिर्के वगैरे पळोन सर्व शिर्के तितके कुटुंबसुद्धां हबसणांत गेले. चहूंकडे चार जाऊन मोगलाईंत जाऊन चाकऱ्या करूं लागले.

१६. [ इकडे ] औरंगजेब भागानगर घेऊन तेथील [ तानाशाह ] पातशाहा कैद केले. कैदेत असतां एके दिवशीं त्यांणीं मध्यरात्रीचे ठायीं चौघड्याचे वाजंत्री यांणी राग गाइला तो [ ऐकून ] बहूत खूष होऊन लाख रुपये बक्षीस त्यांस द्यावे म्हणून सांगितलें. आणि जवळ पोशाख होते ते पाठविले. हें वृत्त औरंगजेब यास समजलें तेव्हां लाख रुपये त्यांजकडे पाठवून नगारजीस बक्षीस देवविले. विजापुरास मसलत करून, कबजेंत आणून पादशाहा पुढें आले. शिवाजी राजे यांणी लोक चांगले पराक्रमी बाळगिले. मराठी राज्य केलें. किल्ले कोट भांडून घेणें [ तरि ] झाडी दुर्घट. राजे वारले तरी एक एक माणूस त्यांचे पदरीं त्यांहून अधिक पराक्रमी. याउपरि आपणास तरि तें स्थान घेणे. हा समय [ योग्य ] आहे. दोन पादशाहाती बुडविल्या. संभाजी राजे शिवाजीचे बेटे आहेत ते बेखबरदार आहेत, ऐसें ऐकितों. म्हणून बातम्या पाठविल्या तों इकडूनही खबरी अव्यवस्थित गेल्या. कबजीनें वश करून बेहोष आहेत, हें पक्कें समजलें. तेव्हां विचार केला कीं, "याज-उपरि बहूत आयास पडणार नाहींत. कसें राज्य येईल हे चिंता करीत होतों. संभाजी दैवहीन झाला. आमचा शिवाजीसारखा शत्रू वारला. आमचे ताले चांगले म्हणून याची अशी अवस्था झाली." या प्रकारें खुषी मानते झाले. याउपरि आपण निघाल्यापासून त्याचे गळां पडून, राजकारण करून आपलासा करावा म्हणत होतों. आणि इतके दिवस दम खादला. ते गोष्ट खुदाने आपणास बक्षीस केली. याउपरि मोहीम करावी, ऐसा विचार ठरविला. ते समयीं इलाचीबेग यांणीं प्रतिज्ञा करून बोलिला जे, "जशी रणथंबे येथील मसलत केली तेशीच ही मसलत जाऊन करितों. आपणास रवाना करावे" ऐसे बोलले. यावरि त्याची रवानगी केली. त्यांणीं हजार

दोन हजार फौज लोक घेऊन पुढें निघाला. पाठीमागें दहापांच हजार फौज आणखी घेतली.

१७. हें वर्तमान पादशाहांनीं मोहीम करून फौज रवाना केली, तें आलियावरि महाराजांनीं बावांस कळवावें सांगितलें. बावांनी विचार सांगितला, 'हे फौज आलियाची काय मुजाका आहे? प्रयोगास प्रारंभ करून एक क्षणांत नाश होय ऐसें करितों." त्याजवरि महाराज यांस सरकारकून व सरदार यांणीं सर्वांनीं विचार करून बोलले जे, "आम्हीं सर्व आहों. थोरले महाराजांनी जिवापलीकडे पाळिलें. ये समयीं जीवाभ्य श्रम करून दौलत वाचवूं. औरंगजेब याचे फौजेचा गुमान काय आहे? आज्ञा करावी म्हणजे जमाव करून तोंडावरि जातो. पागा वगैरे बोलवाव्या. सर्व सरदारांस पत्रें लिहावीं" ऐसें सांगितलें असतां, "बावांशीं बोला. त्यांचे विचारें होईल तैसें करा," ऐशी आज्ञा झाली. वारंवार बोलोल्ला कीं, "यास कोण्हाचा प्रवेश नाहीं, दर्शन नाहीं, ऐसा प्रकार बनला. तेव्हां स[illegible] म्हणजे [illegible]ार केला कीं, हा समय ईश्वरांनीं असा आणिला. याउपरि जीव व्यर्थ! आपण येथें जवळ असोन कांहीं कोणीं न केले व जालें नाहीं हें वांटयास घेऊं नये. म्हणोन निमित्यें करून एक एक मातबर सरदार सरकारकून निघोन जाते जाले. कितेक रायगडास गेले.

१८. इलाचीबेग विशाळगडाचे घाटें उतरून हजार पांचशेंनिशीं पुढें आला. बातमी नेली. त्यांत महाराज बेहोष, तजवीज तयारी कांहीं एक नाहीं. त्या अर्थी वकिलीस आलों ऐसा बाहाणा करून, पुढें पत्र पाठवून, दौड करून, संगमेश्वरीं जाऊन पोहोंचला. ते समयीं सर्व लोक राहिले तेही पळाले आणि रायगडास गेले. येसूबाईसाहेब व शिवाजी राजेही रायगडींच होते. फौज येऊन पावली. इलाची बेग आला म्हणोन महाराजांस बातमी सांगितली. तेव्हां "बावा कोठें आहेत? त्यांस बोलावा. कां आले ते शोध करून त्यांस पुढें भेटीस जावयास सांगा," ऐसें म्हणतात तों दरवाज्याजवळ येऊन पावले. तेव्हां लोकांनीं "अद्यापि सावध व्हावें. आपणांस पाठीशीं बांधून काढून पन्हाळ्यास नेतो." ऐसें बोल्ले असतां न ऐकत तों जवळ शेंपन्नास मात्र माणूस राहिलें. त्यांसाच उठोन दरवाज्यांत आले.

तो इलाचीबेग याणें पुढें होऊन धरलें आणि कैद केलें. कोणीं हत्यार धरिलें. त्यास तेच वेळेस मारिलें, कबजी बात्रासही कैद करून पादशाहा विजापूर प्रांत सर्व हस्तगत करून, तेथील पादशाहा किल्ल्यांत कोंडून, भोंवती फौज ठेवून, मोर्चे देऊन, तुळापुरीं मुक्कामास आले [होते] तेथें इलाचीबेग यांणीं महाराजांस धरून, माघारे जातां आपले लोक ठेवीत ठेवीत आला होता त्यांत मिळोन, दहापांच हजार फौजेनें जमावानिशीं तुळापुरास जाऊन पोहोंचला.

१९. त्या नंतर पादशाहास वर्तमान पोहोंचलियावरि कबजीस नेऊन गुजरला. तेव्हां पादशाहा बोलले जे, "हा आहमक कबजी, याणें एवढें राज्य राजास वेडें करून बुडविलें. यास लागलाच सुळीं देऊन, तीरमार करून मारा," म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें मारला. संभाजी राजे धरून आणिले ते समयीं औरंगजेब यांस्तव खुषी होऊन कृत्यकृत्य जाले. भागानगर व विजापूर हे बक्षीस देवकिरून हस्तगत जाली. हें तरि कांहीं एक आयास न पडितां पुढें ऽ आयासाचें काम तें सहज जालें. दरोबस्त दक्षण साध्य होऊन फत्ते जाली. हें चित्तांत येऊन बक्षीला फौज कलमी किती आहे विचारिलें. याउपरि एक वर्ण करावा. हिंदू ठेवूंच नये, म्हणून ओलें अन्न विकावें ऐसा हुकूम केला. तेव्हां सर्व वजीर यांणीं व सरदार यांणीं विचार केला जे, "पादशाहा या उपरि निरंकुश जाले [म्हणून] हे बुद्धी जाली. पुढें परिणाम ठीक नाहीं. जाणून आसदखान वजीर वगैरे उमराव यांस विचार पडला. फौज कलमी विचारली. तेव्हां मसलत राहिली नाहीं, हें जाणून लोक दूर बडतर्फ करावे म्हणतील. व ओलें अन्न विकणें यांणीं हिंदू कसे ऐकतील? परवरदिगार यांणीं जात निर्माण केली ती मोडती हें घडत नाहीं. हे दोन्ही बुद्धी पादशाहास चांगल्या जाल्या नाहींत. विनाशकाळ जवळच दिसतो." ऐसे तर्क करून विचार करिते जाले. ओलें अन्न विकण्यास सांगितलें. ते समयीं भीमा-पैलतीरीं पादशाहा होते. तेथून यत्किंचित हिंदू मातबर सरदार व वाणी उदमी जैसिंग आदिकरून हिंदू तितके निघोन परतीरीं जाऊन उतरले. ते समयीं मुसलमान थोडे, हिंदू बहूत, हें कळलें. वजिरांनीं "हें करणे चांगलें नाहीं. हिंदू फार, सर्व बदलल्यावरि उत्तम गती होणार नाहीं." ऐसें प्रकारें अर्ज केलियावरि मना करून चालतें तसें चालविलें. फौज

विचारिली, याउपरि दूर करतील हें जाणोन सर्वांनीं वजिरानी मसलत केली कीं, " दोन्ही पादशाहातीं तरि फत्ते जाल्या. एक महाराष्ट्र राहिलें, त्यास संभाजी हस्तगत जाले, परंतु किल्ले, कोट हातीं लागणें व त्यांचे भाऊबंद व बेटे आहेत, तसेच लोक मर्दाने शिवाजीराजे यांचे पदरचे उमराव कर्ते आहेत. राजा बेहोष जाला त्याचें फळ पावलाच. तत्रापि यास कैदेंत ठेविलियानें हे किल्ले कोट देवतील. यास्तव यास कसें करावें, म्हणून पादशाहा विचारतील, तेव्हां यास मारावें, ठेऊं नये, हेच सर्वांनी सल्ला द्यावी. हे जिवंत असतां त्यांचे राज्यांतील माणसांस दुग्धा पडेल. यांचा वचक धरतील. यास्तव यांस विल्हे लाविलें म्हणजे यांचे भाऊबंध सर्व सरदार एक होऊन किल्ले कोट बळावून भांडतील. मोहीम प्राप्त होईल. सर्व अलम यांचें पोट भरेल." असा विचार सर्वांनीं ठरविला.

२०. संभाजी राजे बत्तीस पस्तीस वर्षांत, तारुण्य, पूर्ववयांत, बहूत स्वरूप-सुंदर होते. पादशाहांनीं पाहून विचार केला कीं, " यास बाटवावा, मुसलमान करून नंतर मनसब सरदारी देऊन ठेवावा, म्हणजे मुसलमानी झाली. हा पुरुष चांगला व थोरले घरंदाज [कुळांतील] आहे" म्हणून विचारावयास पाठविलें कीं, " तुम्हीं बाटावें म्हणजे जीव वांचवून तुमची दौलत तुमचे स्वाधीन करितों." त्याजवरून राजे यांणीं उत्तर केलें कीं, "बाटा म्हणतां तरि हे गोष्ट घडावयाची नाहीं. ज्या अर्थी कैदेंत आलों, तेव्हां वांचणें तें काय? तुमचे विचारास येईल तें करावें. तथापि तुमची बेटी द्यावी म्हणजे बाटतों." ऐसें उत्तर सांगून पाठविलें. त्याजवरून पादशाहास कोप आला. आणि सर्व वजीर अमीर यांस विचारलें कीं, " यास काय करावें?" तेव्हां सर्वांनी सल्ला दिली जे, " हा आहमक आहे. बेहोष व उद्दाम आहे. याचा शिरच्छेद करावा." याप्रमाणें बोलतांच आयुर्दाय सरला तशी पादशाहास बुद्धी होऊन शिरच्छेद करावयास सांगितलें. तेव्हां तत्काळ आणून तुळापुरावरि शके १६१० विभवनाम संवत्सर यांत मारिलें. संभाजीराजे सुरतपाख म्हणोन पादशाहा बोलून ठेवीत होते. त्यांणीं उत्तर केलें कीं, तुमची बेटी द्यावी. त्याजवरून पादशाहा त्यांचा वध करितात, हें बेगमेस कळोन, सांगोन पाठविलें कीं, वध करूं नये, तो मारिलें याजमुळें बेगम बोलली जे, "त्याचा प्राण माझे नांवें करून गेला. याउपरि

आपण दुसरा भ्रतार करणार नाहीं." ऐसा निश्चय करून राहिली. हें पादशाहास समजलें.

[ मल्हार रामराव चिटणीसकृत संभाजीराजे यांचें चरित्र. कलम १४ ते २० ]

---

## क्रमांक १३ : : थोरले राजाराममहाराज यांचें चरित्र-प्रकरण

१. " हे कापडी दिसतात......परंतु कोण्ही मातबर आहेत."

सर्व देशांत पादशाहाची फौज फिरूं लागली. राज्य व्यापिलें. पन्हाळयास वेढा घालून विशाळगड रांगण्याकडे फौजा धावल्या. तेंव्हां बहूत विचार दुर्घट प्राप्त जाला. सहा चार माहिने दम खाऊन फौज मसलत बळावत नाहीं. एखादे किलियावर राहून किल्ला भांडवून दम खावा म्हणतांही किल्लेबंद झालें असतां परिणाम नाहीं. एखादे ठायीं बाहेर असतां दग्गा झाला [ तर ] तेंही ठीक नाहीं. त्याअर्थी कबिले एकादे किल्ल्यावरि ठेऊन जमाव येथून फोडावा. जिकडील तिकडे वारापाणी करून गेले, फुटले, ऐसें करून सर्वांनीं ज्यांस जसें कळेल तसे दाहापांच, एकटेदुकटे ऐसें करून व मोगलाईत रोजगारास जातों ऐसें करून, पागा घोडे जसें निभावेल तें करून चंदीस येऊन पोहोंचावें. आपण सडे होऊन पांच पंचवीस मुत्सद्दी सरदार ऐसे वेष बदलून, जंगम लिंगाईत कापडी यांचे वेष घेऊन चंदीस जाऊन पोंचावें. कबिल्यापाशीं रामचंद्र नीळकंठ यांणीं या प्रांतीं राहून, आम्ही तिकडे गेलियावरि कबिलेही युक्तीनें काढून पोहोंचवावे, रायगडचीही बातमी वरचेवर राखून, तीही काढून आणून तिकडे युक्तीनें शिवाजीराजे कबिले पोहोंचतसें करून, आपण याच प्रांतीं राहून संस्थानें जतन होतील तीं करून पुढें जसा विचार सुचेल तसें करावें, म्हणोन सांगोन ठेविले. आणि चंदीस निळोपंत प्रधान व हरजी महाडीक पूर्वीं संभाजी महाराज यांणीं

पाठविले होते त्यांस इकडील सर्व वर्तमान लिहून, " तुम्ही त्या प्रांतीं फौज व जमियत व स्थानें बहूत बहूत खबरदारीनें रक्षावींत, कायम असावें, तों आम्ही ही हरतऱ्हेनें तुम्हांपाशीं येऊन पावतों, " ऐशीं पत्रें लिहून व शहाणीं माणसें इतबारी यांजबरोबर सांगोन पाठविलें. आणि मुत्सद्दी व सरदार यांचे सर्वांचे मसलतीनें ठराव केला. लांबचा पल्ला निभावून गेलें पाहिजे म्हणोन गौप्यरूपें जावें. त्याजवरून संताजी घोरपडे व धनाजी जाधवराव व खंडेराव दाभाडे व प्रल्हाद निराजी व खंडो बल्लाळ चिटणीस ऐसे [ यांनीं ] महाराजसुद्धां लिंगाईत वाण्याचे वेष धारण केले. आणखीही कोणी सरदार मातबर यांस वेष देऊन सर्वांनीं एक मार्गें जावें हें ठीक नाहीं, घोळका न दिसावा, म्हणोन निराळे निराळे लावून दिल्हे. आणि गोकर्णावरून सौंध्यावरून श्रीव्यंकटेशावरून बेंगरुळावरून जावें [ असें ठरविलें. ] सोबत लोक आणखी निघाले ते बेंगरुळपर्यंत जाऊन पावले.

९. तेथें महाराजांचे पाय धुतां पाणी पायांवर घातलें. एक सेवक पाणी घालतो, एक पाय धुतो, एक पुसतो, हें तेथील लोकांनीं पाहिल्यावरि कानडे भाषेनें चर्चा केली कीं, " हे कापडी दिसतात, परंतु पायांवरि पाणी घालून पाय धुवून घेणार, तेव्हां कोण्ही मातबर आहेत. " असें आपले भाषेनें बोलतां यांतही कोणी भाषा जाणणार होते त्यांणीं ऐकिलें. कानडे निघोन कोटांत गेले. तेथें ठाणें औरंगजेबाचें बसलें होतें. तेव्हां बोलणें समजणारांनीं सांगितलें. यावरून बहूतच दुर्घट प्रसंग पडला जे, परिणाम ठीक दिसत नाहीं. कसें करावें ? म्हणतां विचार करितां खंडो बल्लाळ चिटणीस यांणीं सांगितलें कीं, " घाबरे न होतां महाराज व संताजी घोरपडे व जाधवराव व दाभाडे यांणीं एक मार्गें जावें. प्रल्हाद निराजी वगैरे यांणीं राहिले सर्वांस घेऊन एक मार्गें जावें. निघावें. आम्ही आमचे दोन चार असामी आहेत ते घेऊन येथें राहतों. चौकशी पडली असतां कजाखी करून नांवें न सांगतां सुटून येऊन प्रल्हाद निराजी यांणीं अमके स्थळीं दम खावा तेथें पोहोंचूं. न घडल्यासही कोठें तरी जाऊन गांठूं. सर्वांनींच गेलें असतां मागून धांवणें येईल. " म्हणून काढून दिले.

१०. ते गेलियावर कानडे यांणीं कोटांत वर्तमान सांगितलें. हे स्वयंपाक करून जेवितात तों चौकी आली. यांस धरून नेलें. कोण म्हणून विचारिलें.

" कापडी यात्रेकरू, श्रीरामेश्वरीं जातों. दहा पांच आणखी होते ते जिकडे जाणार तिकडे गेले. आम्हांस दुसरीकडे जाणें म्हणोन राहिलों, " सांगितलें असतां त्यांस मारहाण करूं लागले. डोईवर दगड दिले. चाबूक मारिले. परंतु कापडीच म्हणोन सांगितलें. शेवट राखेचा तोबरा दिला असतांही आम्हीं स्वच्छ यात्रेकरू म्हणोन पृथक् पृथक् माराहाण करून विचारीत असतांही सर्वांचें बोलणें सारखें [ पडलें ]. तेव्हां कचेरींत चौकशी करणार बोलले कीं, " यात्रेकरू हे खरेच. तसेच असते तरि इतके मारापुढें बोलते. यात्रेकरू यांस पीडा करणें ठीक नाहीं. " तीन चार दिवस कैदेंत ठेविलें तीन उपोषणें झालीं. यांणीं " आम्ही यात्रेकरू बंदांतून सुटल्यावांचून अन्नग्रहण करीत नाहीं, " ऐसे आग्रह धरून बसल्यावरि सोडून दिले. ते संकेताप्रमाणें तेथें जाऊन प्रल्हाद निराजी वगैरे एक जागां जाहले, आणि पुढें गेले. महाराजही चंदी नजीक जाऊन पोहोंचले. तेथें यांणीं सर्वांनीं जाऊन गांठिलें. एकत्र जाले. नंतर बेंगरूळचें वर्तमान चिटणीस व पारसनीस यांसि महाराजांनीं विचारिलें त्यांणीं झालेलें साविस्तर सांगितलें. तें ऐकून महाराज बहूत श्रमी झाले. या सर्वांनीं उत्तर केलें जे, ' स्वामिकृपेंकरून मुक्त झालों आणि आलों. आतां श्रमी होऊं नये ' असें बहूत प्रकारें समाधान केलें. चंदीस पूर्वीं लिहिलें होतें. आणखी लिहून पाठवून सूचना केली.

११. हें वर्तमान प्रधान व महाडीक व तेथें हणमंते होते त्यांस कळलियावरि महाडीक सर्व सलतनत घेऊन येऊन, महाराजांचें दर्शन घेऊन सर्वांस मंगळस्नान करवून, वस्त्राभरणें देऊन चंदीस घेऊन गेले. पोहोंचले. तेथें राजधानी व सर्व दौलत इकडील दौलत जमली ऐशीच होती, ते करूं लागले. महाराज पोंचले हें देशीं समजलियावरि कितेक सरदार, कारकून लोक, राज्यांतील कर्ती माणसें तितकीं हरप्रकारें नाना वेष धरून, बैलावर बसोन, ज्यांस जसें कळलें तसे गुप्त, प्रगट, रोजगार निमित्य, जाऊन पोहोंचले. त्यांचे सत्कार करणें, त्यांस योग्यता तसे वाढवणें, घोडीं हत्ती देणें, ऐसें करून फौज व जमाव पाडिला.

[ म. रा. चि. कृत थोरले राजाराममहाराज. कलम ७-११ ]

## २. मराठे बहुत कजाख

३४. (असो.) औरंगजेब पादशाहासारखा शत्रू (ज्याची) लाखों फौज (व) खजीना बेमुबलक, छकड्यास छकडे द्रव्याचे भरोन कोटिशा (ज्याचे) बरोबर चालत आहेत (अशाशीं लढणें,) आणि आपलें सैन्य (तर) थोडें. यास्तव मनुष्य राखून, जायां होऊं न देतां, मसलतींनें त्यांच्या सैन्यासभोंवतें हिंडोन, फिरोन त्यांस लांडगेतोड करावी; रयतेची मात्र वैरण राखून रानांतील वैरण जाळून टाकावी, रसद चालूं देऊं नये; आपल्या फौजेंत मणाची धारण, त्यांच्या लष्करांत शेराची धारण; अशा तऱ्हेनें करीत मराठी फौज किती आहे हा अदमास ध्यानांत येऊं देऊं नये; त्यांचे फौजेस चैन पडूं देऊं नये; त्यांचीं ठाणीं (व) त्यांजकडे प्रांत मुलूख वहिवाटींत होते, तेथील लोकांनीं इकडे लक्ष ठेवून वागावें; आपली फौज ज्या प्रांतीं जाईल त्या प्रांतांतील लोकांनीं, जमेदारांनीं, खंडणी देऊन त्यांचा बचाव करावा; मोंगलांची फौज असेल तेथें तेथें पंचवीसां तिसां कोसांचे छत्यांनीं राहून त्या फौजेस चैन पडूं देऊं नये, असें महाराज करिते जाले. लोभ करीतच असत. मोंगलांचे घोडे पाण्यावर आले असतां पाणी न पीत त्यांस मोंगली लोकानीं म्हणावें जे, पाण्यामध्यें धनाजी व संताजी दिसतो कीं काय? रात्रीं दिवसा कोणीकडून येतील, काय करतील, असें केलें. मोंगलाई फौजेंत आठही प्रहर भय बाळगीत. पादशाहासि बहूत आश्चर्य जाहलें कीं, “मराठी फौज ही बळावत आहे. अकस्मात यावें, बक मच्छ उचलून नेतो तसा घाला घालावा, शिपाईगिरीची शर्त करावी, प्रसंग पडल्यास माघारें पळून जावें. खाण्यापिण्याचा दरकार बाळगीत नाहींत. पाऊस, ऊन, थंडी व अंधारी कांहीं न पहातां घोड्यावरच हरभरे व भाकरी, चटणी, कांदे खाऊन धांवतात. त्यांस कसें जिंकावें? एक्या मुलकांत फौज आली म्हणोन त्यांजवर (फौजेची) रवानगी करावी, तों दुसरेकडे जाऊन ठाणीं घेतात, मुलूख मारितात. हे आदमी नव्हत, भूतखाना आहे!”

३५. म्हणोन आपण खांसा स्वारी साताऱ्यास आली आणि किल्यास मोर्चे बसविले. किल्ला न ये. लढूं लागला. चंदन वंदन कांहीं दिवस लढले. ते

दोन्ही किल्ले घेतले. आपण खांसा स्वारी करंजावर डेरे देऊन राहिली. त्याचें नांव पादशापूर म्हणोन ठेविलें. शाहाजादे यांस फौज देऊन परळीचे रस्त्यावर ठेविलें. शाहापूर असें त्या जागेचें नांव पडलें. किल्ल्याभोंवता खंदक खटला. सर्जेखान यांस सँदऱ्यानजीक ठेविलें. त्यांणीं पूर्वेकडील चांभार टेंकडीच्या खालीं डोंगर फोडून खिंड पाडली. तो रस्ता केला त्यास सर्जाखिंड म्हणत आहेत. कोंडोलीवर शास्तेखान फौजसुद्धां ठेविले. याप्रमाणें जिकडे तिकडे सरदार ठेवून वरतीं रसद जाण्याची बंदी केली. किल्ल्याभोंवते खंदक केले तेव्हां अगदीं बंदी जाहली. बाजारखेंडीवर धबधबा रचून तोफ दरवाजावर सुरू केली. येवतेश्वराचे डोंगरावरही तोफ चालविली. तसेंच पूर्वेकडील चांभारखेंडीवर सर्जेखानांनीं तोफा चढविल्या. याप्रमाणें पादशाहांनीं पुरीच अडचण करून जखडबंदी केली. परंतु किल्ला नये. किल्ल्यावरील लोक हिंमतीचे, प्रयागबावा प्रभू हे सुभेदार, त्यांणीं बहूत शर्त केली. किल्ला लढूं लागला. परळीवर परशुराम त्रिंबक होते. त्यांणीं शाहाजादे अजमशाहा यांशीं राजकारण राखून किल्ल्यावर मदत व रसद पावती करणें ती व सामान दारूगोळा पावता करावा. लोकांसही दीलदिलासा देऊन किल्ला लढविते जाहले. ते समयीं पादशाही लष्करांत धारण बहूत पडली. लष्करांत दाणा चारा मिळेना तेव्हां हलाकीत आले. बाहेरून मराठी फौजेची लांडगेतोड! रसद चालेना, कहीं येईना व किल्लाही येईना! जाणोन पादशाहा यांणीं हल्ला करण्याची तजवीज करविली असतां, आसदखान व पादशाहाजादे यांच्या सर्वांच्या विचारें मसलत वाढवावी, पादशाहास मराठे जातीचे कजाख हें समजावें, असाच बेत [ ठरला तो ] खानही राखीत आले. पादशाहांनीं श्रम केले ते निर्फळ होत असावे. तेव्हां किल्लेचे पूर्व भागीं ईशान्य कोनेस मंगळाईच्या बुरजाखालीं पादशाहांनीं सुरुंग करविला. पाटीभर माती काढून आणतील त्यास एक मोहोर द्यावी, असे लक्षावधी रुपये खर्च करून सुरुंग करविला. उडवावा ते वरच्यांस बातमी न समजावी, असा बेत राखून बुरजाखालीं दारूचे बुधले पुरून, मोर्चे हुशार राखून, आपण खांसा तक्तराव्यावर बसोन स्वारी बाहेर आली. त्या समयीं बत्ती देवविली. किल्ल्यावरील लोक पादशाहाची स्वारी पाहाणेस मंगळाईचे बुरुजावर वरील तटावर उभे राहिले. त्या समयीं मंगळाईचे बुरजाची सोंड शें दोनशें

हात वरतीं उडोन जेथील तेथें कायम झाली. त्या काळीं वरील लोक शें दोनशें तटाखालें पडोन मेले. खालील लोक मोर्चेबंदीचे बहूत मेले, व जाया झाले. कड्याचे दगड फुटोन तोफेच्या गोळ्याप्रमाणें लष्करांत पडोन कांहीं [ लोक ] जायां झाले व मेले. बुरूज उडाला ते समयीं धुराळ्याची गर्दी होऊन घटकाभर धुंदी जाली. धुंद निवळल्यानंतर किल्ल्यावरचे लोक हुशार होऊन नगारे, कर्णे तुतारे वाजवून तोफा [ त्यांनीं ] सुरू केल्या. जागां जागां लोक उभे राहून तटावरून धोंडे लोटले. तें [ कृत्य ] पादशाहांनीं पाहून आश्चर्य मानून, मराठे बहूत कजाख, आपण केल्याचे योगानें आपला नाश झाला [ असें पाहून ] तेणेंकरून संताप पावले.

३६. सुरुंग उडाला ते समयीं प्रयागजी प्रभु सुभेदार बुरुजानजीक झाडाखालें बसले होते तेथें दगड येऊन पडले. त्यांचें आयुष्य बलोत्तर ! तीन धोंडे तिहींकडे, मोठा धोंडा वर्ता एक, आंत घराप्रमाणें झालें. आणि वर मातीचा ढीग पडला. तेव्हां घरांत खोलींत असावें असा भास त्यांस होऊन ईश्वरांनीं [ त्यांचा ] बचाव केला. ते समयीं लोकांनीं चहूंकडे पाहतां हरळी जाहली जे, सुभेदार दिसत नाहींत. तेव्हां सर्व दरखदार व लोक मिळोन ज्या स्थळीं बसले होते तेथें येऊन पाहता मातीचा ढीग बुरजाप्रमाणें पडलेला. उकरून पाहतात तों झग्याचा पदर दृष्टीस पडला. त्याजवरून येथें आहेत असें ओळखून माती काढूं लागले. तों दगडाच्या आंतून [ ते ] बोलिले कीं, मी जिवंत आहे ! असें म्हटल्यावरून लोकांनीं माती दगड युक्तीनें काढून आंतून बाहीर काढिले. ते खैर होऊन निघाले. पुनर्जन्म झाला ! ! म्हणोन लोकांस पुन्हा हुशारी होऊन नगारे आदि वाद्यें केलीं. पुन्हा तोफा सुरू कर्तें झाले.

३७. तेव्हां सुरुंगानें किल्ला न आला, आपलाच नाश झाला, [ हें व ] किल्ल्यावर लोकांची शर्तमर्दी पाहून, पादशाहास अति कोप येऊन, तमाम लष्करांतील आपलीं हत्ती उंटें जमा करून आणविलीं व तीं मारून रचून किल्ल्यावर पायवाट करून हल्ला चढवावा म्हणोन हुकूम करून, खांसा तख्तराव्यावर बसोन पुढें चालू जाहला. हें वर्तमान आसदखान वजीर [ व ] अमीर यांस कळलें. त्यांणीं येऊन बहूत प्रकारें अर्ज केला, परंतु आग्रह न सुटे. हें पाहून आसदखान वजीर यांणीं शाहाजादे यांस जलदीनें सांगून

पाठवून बहादर शाहाजादे यांस आणविलें. ते व आपण पुढें उमे राहून हात जोडून अर्ज केला जे, "हे लक्षावधी जीव ईश्वराचे, यांस मारूं नये. ही गोष्ट खुदास मानणार नाहीं. आम्हांस हुकूम करावा. दोन चार दिवसांत हर-प्रयत्न करून किल्ला फत्ते करितों. ही गोष्ट आम्हांकडून न घडल्यास नंतर हजरतांनीं मर्जीस येईल तसें करावें." असें सांगोन पादशाहाची मर्जी ठिकाणावर आणोन डेऱ्यास जाणेविशीं विनंती केली. ते डेऱ्यास गेले. शाहाजादे यांणीं परशरामपंत यांजकडे सांगून पाठविलें कीं, "पादशाहाची मर्जी बहूत रुष्ट जाहली, आग्रहास पडले, [आतां] तुम्हीं आग्रह टाकावा. आग्रह न टाकिल्यास बहूत जीवांचा नाश होतो. हा द्रोहो तुमच्या माथां, यास्तव आग्रह सोडून पादशाहाची मर्जी राखावी. सुभेदार यांस सांगून पाठवावें, तह करून आपल्या लोकांचा बचाव करून किल्ला द्यावा."

[म. रा. चि. कृत थोरले राजाराममहाराज. कलम ३४–३७]

---

## क्रमांक १४ : : राजनीति

### १. श्री राजगुण-प्रकरण

राजगुणप्रकरण यांत राजाचे गुण व पट्टराणी व युवराजा यांचे आचार व्यवहार कसे असावें हें विस्तारें करून सांगतों. प्रथम राज्य असें म्हणावयाचें तेव्हां त्यास सात अंगें सांगेंकरून असावीं. तशीं असलियावर त्यास राज्य म्हणावें. हीं सात अंगें कोणतीं ? त्यांचीं नांवें काय काय ? तरि प्रथम अंग राजा, दुसरें प्रधानादि मंत्रिजन, तिसरें राष्ट्र, चवथें दुर्ग, पांचवें कोश, सहावें बल, सातवें सुहृद् आप्तविषयी लोक मैत्र. इतकीं अंगें यथा लक्षणिक असलीं म्हणजे त्यास राज्य असें म्हणावें. हीं सात अंगें सांगितलीं तीं यथायोग्य असावीं [म्हणून] सांगितलें तें कसें? तरि एक एक विचारें करून अंगलक्षणें सांगतों.

त्यांत प्रथम राजा. त्या राजाचींच विविक्षायुक्त चिन्हें सांगतों. एकाग्रें करून ऐकावीं. राजा म्हणजे सर्वांचें, समुद्रवलयांकित पृथ्वीचें, पालन करितो म्हणून त्यास राजा म्हणावें. सर्वांचें पालन करणार [हा] सत्वगुण श्रीविष्णूचा धर्म होय तेव्हां राजा पालन करणार विष्णु अंशाव्यतिरिक्त घडत नाहीं. विष्णुअंशच होय. व पृथ्वी-रक्षण अष्टदिक्पाल करितात व राजाही [करितो]. अष्टदिक्पाल यांचेही त्या राजाचे ठायीं अंश असतात. ते अष्ट-दिक्पाल कोणते? तरि इंद्र, वरूण, वायु, सूर्य, कुबेर, अग्नि, यम, रुद्र, ऐसे आठ देव. यांचे अंश असतात म्हणून राजा जो तो देवतांश म्हणावा. असे प्रकारचा राजा तो सर्व जगाची वृद्धि करणार होय. यास दृष्टांत. चंद्र उदयातें पावला असतां समुद्र परम हर्षातें पावून वृद्धिंगत होतो. तसा राजा बरवे प्रकारें धर्में करून पाहत होत्साता प्रजेचें पोषण करितो त्या योगें करून प्रजा व राज्य, वृद्धिंगत होतें. राज्याची व प्रजेची वृद्धि जाहलियावरि राजाही परम शोभा पावतो. प्रजेचें पालन धर्में करून राजा न करी तरि आपण प्रजेसह नाश पावतो. येविषयीं दृष्टांत. ज्या नावेस नावाडी नसतो ते नाव बुडते. तसें राजा प्रजेस बहुत धर्में करून पालन मंत्रीसह नीती करून न करी तरि तें राज्य बुडतें. प्रजापालन उत्तम प्रकारें करीत होत्साता शत्रु पराभव पावतात. प्रजा आमचा राजा ब्रह्मदेवासमानच म्हणतात. धर्मता-न्यायें करून चालणार राजा प्रजासह धर्म, अर्थ, कामसहित वृद्धीतें पावतो. याप्रमाणें राजा न चाले तरि प्रजांसह अधःपातास जातो. येविषयीं दृष्टांत. यवन परम नीच असतां कांहीं एक धर्म म्हणून स्थापून चालतात त्या योगें राज्य भोगितात. आणि क्षत्रिय कुळांत नहुष अधर्मेंकरून चालतां राज्यनष्ट होऊन अधःपातास गेला. यास्तव आधीं द्रव्यसंपादन करणें तें धर्मपूर्वक करावें म्हणजे राज्य वृद्धीतें पावतें. तेणेंकरून राजा सर्व सुखास पात्र होतो.

धर्मेंकरून द्रव्य संपादन करावें. त्याचें चतुर्विध राजवृत असावें. तें कसें म्हणाल तरि धर्मेंकरून द्रव्य संपादिलें त्याची वृद्धीही धर्मेंकरून करावी. तसेंच रक्षणही धर्मेंकरून करावें. तसेंच व्यय खर्चेंही धर्मेंकरून करावा. ऐसे चतुःप्रकारें करून द्रव्याचा विनियोग धर्मेंकरून राजानें करीत असावा. तें चतुर्विधवृत्त कसें तें विस्तारें करून सांगतों.

द्रव्य धर्में करून कसें संपादावें? तरि प्रजा यांणीं कृषि केली त्याज़पासून

उत्पन्न होईल त्याचा सहावा भाग घ्यावा. आणि प्रजेस अन्य कांहीं एक उपसर्ग न लागावा मांडलिक राजे अथवा अन्य संस्थानिक असतील त्यांचीं राज्यें असतील तीं पाहून त्यांस उत्पन्न होत असेल त्याचाही षष्ठांश घ्यावा. जो कोणी [ मांडलिक ] आपणांशीं विरोध करील त्याचें पारपत्य करावें. दुष्ट दुर्वृत्त असतील त्यांचें राज्य हरण करावें. अपराधी असतील त्यांजपासून त्यांचे अपराधानुरुप उत्पन्न होय असें द्रव्य घ्यावें. प्रजेंत कोणास पुत्र नसला तरि त्याचे दायाद कन्यादिक अधिकार असल्यास त्यांस द्यावे. कोणी नसल्यास त्याचें राजानें घ्यावें. वृत्यादि वादी प्रतिवादी यांचे न्याय-धर्मता-करून त्याजपासूनही द्रव्य घ्यावें. तें त्यांचें सामर्थ्य पाहून घ्यावें. याचें नांव धर्मद्रव्य-संपादन.

आता वर्धन कसें ? तरि सांगतों. वर्धन म्हणजे व्यवहार, एकोत्तर वृद्धि द्विगुणित होय तो करून व अन्य प्रकार धर्मं करून शास्त्रीं सांगितले तसे प्रकार करावे. सामर्थ्य पाहून कमीही घ्यावें. द्रव्य द्विगुणित वस्त्रें त्रिगुणित धान्य चतुर्गुणित रस अष्टगुणित घ्यावे.

आतां संरक्षण सांगतों. सांगितलें तसें द्रव्य संपादन होईल त्याचे पांच भाग करावे. एक भाग धर्म करावा, एक भाग संग्रहास ठेवावा, एक भाव दिगंत कीर्ति नेणार असे जन त्यांस यशप्रद असा द्यावा, एक भाग आपण उपभोग करावा, एक भाग आपणांपासून उपजीविका करणार सेवकजन त्यांस द्यावा. यासच रक्षण असें म्हणावें. या पांच प्रकारें द्रव्य विभागून खर्च केलें असतां इहलोक व परलोक साध्य होऊन अक्षय राहातें.

आतां व्यय कसा करावा ? तरि दान सत्पात्रीं पात्रापात्र विचार कनरू करावें. तसेंच देवालय-जीर्णोद्धार करावे. नूतन देवालयें करावीं. वापी, कूप, तटाक, आराम म्हणजे बाग करावे. धर्मशाळा बांधाव्या. ब्राह्मणांस अन्नदान व अन्नछत्रें करावीं. सर्व ज्ञातीस अन्नदान प्राणिमात्रीं करावें. उत्साह जयंत्यादि पर्वें व महान् ब्राह्मिष्ट ऋषि यांस साहित्ये पुरवावीं. स्वास्थें करून द्यावी. अनुत्पन्न असतील त्यांचे कुटुंबाची संस्था करावी. द्रव्य द्यावें. इतरही भिक्षार्थी यांस याचकांस विन्मुख न होतां द्रव्य द्यावें. त्यांचे मनोरथ पुरवावे. यज्ञ याग राजा याणें आपण करून ब्राह्मणांपासून द्रव्य देऊन करवावे. अग्नि-

होत्रें चालवावीं. धर्माचें लक्षण किती सांगावे? शास्त्रीं सांगितलें तसें त्या प्रमाणें पाहून करावें. तें दंभ व अभिमान न करितां सत्वबुद्धीकरून करावें. यास व्यय म्हणावें. हीं चार राजवृत्तें होत.

राजास विनीति मुख्यत्वें असावी, विनीति होण्याचें कारण सांगतों. नम्रता असावी. ते कोणते योगें येते म्हणाल तरि सच्छास्त्र–अवलोकनें व सत्संगे करून प्राप्त होते. सच्छास्त्र पाहतांच सकल धर्माधर्म समजतात. येणें करून इंद्रियनिग्रहही घडतो. इंद्रियनिग्रह व सच्छास्त्र–सत्संगती करून विनयता सहज प्राप्त होते. याचें नांव विनीतिवान् राजा म्हणावें. आणखी राजाचे ठायीं गुण असावे तेही सांगतो. शास्त्राभ्यास करावा. प्राज्ञ म्हणजे सकल शास्त्राचा अर्थ जाणावा. धृति म्हणजे धैर्यसंपन्न असावें. दक्ष म्हणजे सकलविषयीं चतुरता असावी. प्रगल्भता म्हणजे प्रौढता असावी. धारणा म्हणजे एकवार ऐकिलें त्याचें स्मरण खचित असावें. शक्ति असावी. त्या शक्तीचे तीन प्रकार. प्रभुत्व शक्ति म्हणजे निग्रहदंड करणें, अनुग्रह म्हणजे कृपा करणें, येविषयीं सामर्थ्यवान् असावें. दुसरें मंत्रशक्ति सकल राजकारणादि विचार प्राप्त जाणणें, व मंत्र-गोपन म्हणजे कोणास मंत्र न समजतां होत असावें, त्याचें विवरण मंत्रीसह सर्वकाल करणें, यास म्हणावें. उत्साहशक्ति म्हणजे कोणे एके कार्याविषयीं निरालस्यता व राज्यसाधन जाहले त्याजवर कृतकृत्य पूर्ण जाहलें अशी बुद्धि न धरितां नित्य नूतन संपादण्याचा ह्व्यास करणे, यास उत्साहशक्ति म्हणावें. हे तीन प्रकार शक्तीचे होत. आतां वाग्मिता म्हणजे सत्य आणि समर्पक मधुर अद्वितीय दुसऱ्याचें हृदय न दुखवेसें संभाषण करणें. दार्ढ्य म्हणजे ज्या कार्याचा निश्चय केला त्या पासून बुद्धि चंचल न होतां [तें] करणें. आपत्क्लेशसहिष्णुता म्हणजे समय परत्वें आपत्काल प्राप्त झाला तरि त्याचें दुःख न मानितां सोसणें. प्रभावता म्हणजे मोठी प्रतापयुक्त साहसें करून करणें. शुचि म्हणजे अंतरबाह्य पवित्र, मनाचे ठायीं कुटिलता नसावी, व बाहेर करण्यांतही नसावी. मैत्र म्हणजे आपले समान योग्य सद्गुणी असतील त्यांशी मैत्री करावी. त्याग म्हणजे सत्पात्रीं दान व सद्व्यय करणें. सत्य म्हणजे सत्यच बोलावें, ज्यास जें वचन दिलें तें रक्षावें. कृतज्ञता म्हणजे सेवक लोकांनीं सेवा निष्ठेने केली त्याची परीक्षा जाणून त्याचा गौरव व कृपा करून द्रव्यादि

देणें, आणि वाढवणें. कुल म्हणजे कुलपरंपरा धर्म चालत आले ते चालवावे, कुलवंताचे घरी कन्या द्याव्या, व कुलावंताच्याच कराव्या. शील म्हणजे उत्तम प्रकारचें आचरण असावें. दम म्हणजे इंद्रियनिग्रह. अभक्ष–भक्षण अगम्यागमन हे दोन मुख्य निग्रह असावे. या प्रकारें हे वीस गुण सांगितले. या लक्षणें करून राजानें असावें. याजप्रमाणेंच अमात्य व पुत्र व भृत्य व प्रजा यांजपासूनही शीक्षापूर्वक आचरण करवावें. ऐसे प्रकारें राजा अमात्यादिसह विनीतिआदि सांगितले गुणे करून चालत असतां विपुल लक्ष्मी राज्य पावतो.

[ काव्येतिहाससंग्रह, पुस्तक १०, पृ. १२ ते पृ. १५ ]

## २. बल-प्रकरण : धर्मयुद्ध

आतां धर्मयुद्धाचें प्रमाण सांगतों. धर्मयुद्धाचे ठायीं गज जे यांजवरि गजसादी याणींच जावें. व तुरंगयानी यांणीं अश्वारूढ यांजवरिच जावें, रथी यांजवरि रथी यांणीं, पदाति यांजवरि पदाति, यांजप्रमाणें यथायोग्य पाहून युद्ध करावें. यास धर्मयुद्ध म्हणावें. व आणखीही सांगतों. चतुरंग सेना असलिया जशास तसें योजावें. तें नसतां एक दोन अंगें करून सेना ज्याची असेल त्याशीं धर्मयुद्ध कसें करावें तेंही सांगतों. अश्वारूढ झाले आहेत त्यांजवरि तीन पदाति यांणीं जाऊन युद्ध करावें. गजावरि रूढ झाले यांजवरि पांच अश्वारूढ जे यांणीं जावें. हेंही धर्मयुद्धच होय. आतां अवध्य म्हणजे वधूं नयेत ते कोण कोण म्हणाल तरि तेच सांगतों. स्थलाचे ठायीं उभा आहे, वाहनावरी बसला नाहीं, व नपुंसक व हात जोडून आला त्यास व ज्याचा केशपाश सुटला आहे व वहनावरून उतरून पृथ्वीवर बसला आहे. व मी तुझा आहे असें प्रकारें म्हणणार त्यास व निद्रिस्तास व युद्धास सज्ज झाला नाहीं त्यास व नग्न झाला आहे व आयुध हातचे टाकिलें आहे त्यास व जो युद्धास उभा न राहिला व युद्ध अवलोकन करीत असेल त्यास व दुसऱ्याशीं युद्ध करीत असतां त्यास, आपण न मारावें. व भय पावला असा त्यास व पलायन करून जाणार त्यास व आणखी वृद्ध तसेच बाल व स्त्री व ब्राह्मण व मुखाचे ठायीं तृण धरून उभे राहणार व जे पाणी पीत असतील त्यांस, तसेंच भोजन करणारास व ज्यांणीं युद्धकवच आंगांत न घातलें त्यांस व

हत्ती व अश्व, रथी व दूत यांस न मारावें. व राजा जो आहे त्यास राजाव्यतिरिक्त दुसरे शूर यांणीं न मारावें. याजप्रमाणें धर्मयुद्धांत अवध्य सांगितलें. याजप्रमाणें कपटयुद्धाचे ठायीं हेच अवध्य आहेत.

आतां राजा जो याणें पुढें युद्धाचा प्रसंग प्राप्त झाला असतां शूर जे यांचें स्तवन करून त्यांस जो जे मागेल तें द्रव्य अलंकार भूषणें वस्त्र व सुवर्ण आदिकरून देऊन संतोषी करावें. ज्याची योग्यता [ जशी ] तशी पाहून द्यावें. म्हणजे त्याचे जयास्तव कोणता शूर युद्ध करणार नाहीं? सर्वही करतीलच आणि जयही पावेल. याजप्रकारें करून राजा जो याणें परराष्ट्र जिंकून प्रजा ज्या त्यांतें पिता जसा अपत्याचें करिजे तो असे रीतीनें धर्मेंकरून व नीतीकरून दयालुत्वें पालन करावें.

राजा यासि युद्धादिकाचेठायीं हिंसादि पातकें घडतात म्हणाल त येविशीं इतिहास सांगतों. धर्मराज यांणीं भीष्मास प्रश्न केला कीं, राज्य करण्यात नाना प्रकारची पातकें घडतात यास्तव क्षत्रियधर्मा इतका दुसरा कांहीं धर्म पापीयान् नाहीं. कांकीं यांत युद्धाचे ठायीं ज्याचें पूजावंदन करावें त्याचाच वध करणें प्राप्त होतें. व शिक्षर्थेही नाना प्रकारच्या हिंसा कराव्या लागतात. ऐसें असतां राज्य करण्यांत स्वर्गमोक्ष प्राप्ति व्हावी असें यांत कर्म कोणतें आहे तेंच कृपाकरून सांगावें. याजप्रमाणें विचारिलें असतां भीष्म उत्तर करितात कीं, पापी आहेत त्यांस शिक्षा करून राजा यास पुण्यवंत असे प्रकारचे साधुजन आहेत त्यांचे [ व ] गाई ब्राह्मणांचें पालन घडतें. व आश्रमधर्मेंकरून धर्मसंस्थापना होऊन प्रजेचें पालन करून राजे जे ते शुचित्व पावतात. व यज्ञही नाना प्रकारचे घडतात. दानें व्रतें घडतात. राजा यास जयसमयीं युद्धादिकाचे ठायीं हिंसा व द्रोह घडतो. त्यास राजा जो तो प्रजापालन धर्मेंकरून करितो येणेंकरून हें पातक राजा यासि नाहीं. प्रजेचें संरक्षण करणें हाच मुख्य क्षात्रधर्म होय. तेव्हां प्रजेस पीडा होतील त्यांचा परिहार करणें त्याचें पातक नाहीं. व हिंसा व द्रोह केला असें म्हणूं नये. प्रजा ज्या त्यांचें संरक्षण, पिता पुत्राचें करितो, तसे प्रकारें राजा येणें प्रजेचे पोषण पालन केलें असतां पुण्याची वृद्धिच होते. आणि प्रजा पालनाविशीं संरक्षणार्थ द्रोह घडतात [ तर ] त्यांचे

पालनें करूनच प्रायश्चित घडतें. राजा जो तो प्रजेस धनेंकरून व दानेंकरून व ज्ञातिधर्मैंकरून व दुसरा कोणी पीडा करीत असेल त्याजपासोन, चोरापासोन व अन्य क्लेशापासून रक्षितो व प्राणदान करितो, हाच उत्कृष्ट धर्म घडतो. येणें करून या लोकीं संपूर्ण भोग भोगून परलोकाचे ठायीं इंद्र-सलोकता पावतात. व ब्राह्मणांचे व गाईंचे संरक्षणार्थ आपले प्राणाची व गृहदारादिकांची ममता न धरितां युद्धास प्रवर्तून ब्राह्मणादिकांचें पालन करितो हाच राजा यास अनंत-दक्षणायुक्त यज्ञ केल्याचें फळ घडतें. स्वर्गाचे ठायीं देव पृथ्वीचे ठायीं उत्कृष्ट धर्म कोणता म्हणून विचार करितात. त्यांत शत्रूचे बाण आपण सोसितात व शत्रूस आपण मारितात, प्राणाची गणना न करितां प्रजा-पालन करितात, याजपेक्षां उत्कृष्ट धर्म कोणताही नाहीं म्हणतात. शरीराचे ठायीं जितके व्रण क्षतें होतात त्या संख्येंकरून अक्षयीं उत्तम लोकीं सुख भोगितात. संग्रामाचे ठायीं ज्याचे शरीरापासोन रुधिर प्रवाह पडतो त्या रुधिरतीर्थी स्नानें करूनच सकल पातकें भस्म होतात. संग्रामाचे ठायीं व्रणाच्या वेधना ज्या होतात त्या जे सोसतात त्या जशा तपें पंचाग्निसाधन इत्यादि करून वेधना करून सोसण्याचे श्रमापेक्षांही अधिक पुण्यदायक होतात. असें धर्मशास्त्रकर्ते बोलतात. ज्या शूरास स्वर्गसुखाची इच्छा असेल त्याणें महत्संकट युद्धाचे ठायीं साहाय्याची इच्छा न धरितांच युद्ध करावें. धर्मराजा रे! जे आपले संगती युद्धाचे ठायीं टाकून प्राणभयें करून स्वस्तिक्षेम बरास आले त्यांचें पालन व पोषण कदापि न च करावें. संग्रामाचे ठायीं शूर सहाय्य सोडून आपले प्राण वांचवावे ऐसें इच्छितात त्यांजवर इंद्रादि देवता क्षोभातें पावून नरकादि अधःपातास त्यांस नेतात. शूर जे आहेत त्यांणीं आपणा-पाशील शस्त्रें अस्त्रें सरलींही असतां लांकडें करून अथवा पाषाणें करून युद्ध करावें, शेवट हस्तेंच करून प्रहार करावे, शेवट पशु जैसा पादेंकरून हस्तें करून शिरें करून दंष्ट्रे करून करितात असे प्रकारें ही करावेंच. परंतु शत्रूस पराङ्मुख कदापि न व्हावें. क्षत्रियास हाच धर्म कीं घरीं खट्वा जे याचें ठायीं शय्येवरी कफ व श्लेष्मा आदीकरून रोगादि पीडा पावून परम श्रम भोगून मरण हेंच कोणी अधर्म होय. आतां क्षत्रियास मरण कसें घडावें म्हणाल तरि रणाचे ठायीं कदन करीत होत्साता ज्ञाति जय हिंसा परिवेष्टित तीक्ष्ण शस्त्रें करून सर्वही आंग भिन्न जहालें आहे ऐसें होऊन मरण पावावें.

हेंच श्रेयस्कर होय. शूरास नाना प्रकारचीं क्षतेंही झालीं असतां, आपले देहास कोठें काय जहालें हें भानही शूर जे यांस [नसतें]. कोठें कोणतेही भूमीचे ठायीं युद्धांत मरण जालें असतां तेच भूमी त्यास महाक्षेत्र ऐसी होऊन अक्षय लोक पावतो. यास्तव राजधर्मच उत्कृष्ट होय. यांतच नीतीनें राजा वर्तला असतां शास्त्र हेंच व ईश्वरी आज्ञा याजप्रमाणें प्रजापालनधर्में करून, व ज्ञानें करून ईश्वरतत्व जाणोन, सर्वकाळ भक्ति व भजन एकाग्रें करून व गाई ब्राह्मणांची सेवा पालन करीत होत्साता मोक्षासही पात्रच होतो. याज-प्रकारें ऐसें न करितां व राजा येणें राज्यरक्षणास योग्य पुत्र न जहाला असतांच राज्य त्याग केला तरि महत्पातकें त्याचे मस्तकीं. तीं कशीं म्हणाल तरि सांगतों. राजा येणें राज्याचा त्याग केला असतां संपूर्ण प्रजा व वर्णाश्रमधर्म आदि करून भ्रष्ट होतात. गाई व ब्राह्मणादि प्रजा यांस चोरादि पीडा होऊन वध होतात. तितकेही अधर्म राजा यासच घडतात. यास्तव राजा याणें राज्यच करून चतुर्विध पुरुषार्थ धर्म अर्थ काम मोक्ष हे साधावे. असे प्रकारें करून धर्मराजाप्रति भीष्में सांगितलें आहे.

[ काव्येतिहाससंग्रह, पुस्तक ११, पृ. ८७–९० ]

---

## क्रमांक १५ : : श्रीहनुमंतस्वामीकृत श्रीसमर्थांची बखर

### १. श्रीशिव–समर्थ भेट

इकडे शिवाजीराजे याच्या स्वाऱ्या तमाम फिरो लागल्या ठाणे किले सोडाविले प्रतापगडीं वास्तव्य होते माहालात निद्रा केली होती. चवकी पहारे किल्या कुलपे बंदोबस्त येथास्थित असता महारात्री गलयात मेखला पायात पादुका हातीं नारळ ऐसे खोलित जाऊन उभे राहिले. शिवाजीराजे यासी

जागे करुन नारळ दिल्हा. तुझे राज्यांत माहापुरुष कोणकोणते स्थानी हे श्रुत नाही ऐसा बेफाम म्हणून शिक्षा केली. शिवाजी राजे याणी चरणावर मस्तक ठेवून विनती केली की क्षमारुप व्हावे वास्तस्थान कोठे हे सांगावे. त्यास मसुराहून आलो नांव रामदास ऐसे म्हणता च सा। नमस्कार घातला तो स्वामी गुप्त जाहाले. राजाने पाहिले तो द्वार लाविली चवक्या पाहरे बंदोबस्त असता येणे जाणे कैसें जाहलें स्वप्न म्हणावे तरी प्रत्यक्ष दर्शन प्रसाद दिला. मसुराहून आलो म्हणून बोलले आणि गुप्त जाहाले तेव्हा कोणी अद्भूत सामर्थवान आहेत ऐसे चित्ती आणून दरवाजे उघडवून सर्व समुचय मिळवून मध्यरात्री कोणी आले होते हे तुम्हास श्रुत आहे की काय त्यास कोणी श्रुत नाही म्हणोन बोलिलेवर राज्याच्या नेत्रास आश्रु येऊन परम भाग्योदय मानिला. जे धन्य भाग्य होय दर्शन दिले. आंतपर स्वामी पूजा दर्शन देतील तर अन्न करु म्हणून प्रधान सुधा स्वारी करुन स्वामीच्या शोधास निघाले. मसुर शाहापुरी शोध केला. स्वामी तेथे नाही चाफली आहेत ऐसे शिष्यानी सांगितले. नंतर श्रमी होऊन ते दिवशी मुक्काम शहापुरी केला. तो मध्यरात्री राजा निद्रिस्त असतां स्वप्नीं येऊन सांगितलें की आज शष्टी म्हणऊन दर्शन दिले नाही. उदईक सिगणवाडीस येणे. तेथें भेट होईल म्हणताच राजा जाग्रत होऊन स्वप्न सांगितलें. प्राथकाळी कूच करुन चाफलास आले तो कल्याण गोसावी यासी बरोबर घेऊन सिगणवाडीस गेले तेथे गुराखी पोरे मिळवून येक वानर व आपण बैसले यास पाहून उभयतांनी सा नमस्कार घातिले. राजाची स्वारी पाहून पोरें पळू लागली त्यास अश्वासून राविली. जवळ येऊन चरणी मस्तक ठेविता सद्गदित होऊन विज्ञापना केली की दीनावर कृपा करावी व मग राजाची सुबुद्धि पाहून अनुग्रह केला. ते समई सुवर्णभुषेक पूजा करावी म्हणवून होन व मोहरा आणिल्या त्या पुढे आणून अभिषेक केला. ते द्रव्य गुराख्यासी लु (ट) वावे ऐसी आज्ञा केली. आज्ञा होता च पोरानें द्रव्य न्हेले. पुढे आज्ञा काय म्हणऊना विनंति केली त्यास आम्ही जो मंत्र सांगितला तो जप करावा उपासनेच्या ठायी प्रेम धरुन येथा न्याये राज्य करुन प्रजा पालन करावे. आम्ही मारुती स्थापिले त्याचे पूजेस पान्थल जमीन द्यावी. त्याजवरुन ततक्षणी जमीन नेमून देऊन सनदा पाई अर्पण केल्या. रामनवमीच्या उछाहास चाफळचे अनुष्ठानास अकराशे होन नेमणुक करुन

दिली. उपरांत आम्रवृक्षावरुन चढून राजेश्रीस प्रसाद आणून देणे म्हणऊन वानरास आज्ञा करता तीन फळे आंब्याची आणवून स्वामी पासी ठेविली आणि राजेश्रीस प्रसाद दोन फळे दिली. त्या च काली दोन फळ प्रसाद दिला. पुत्रद्वय समजोन राजा संतोष पावोन चरणीं मुस्तक ठेविता जाहाला. सेना समुदाये यासी शरकरा वाटिली दुंदुभी त्राटोन अनेक वाद्ये घोषयुक्त नृपतीस स्वामीनी आज्ञा केली की चाफलास रामचंद्रजीच्या दर्शनास जाणे. तेव्हा कल्याणस्वामी बराबर श्रीरामचंद्रजीस निरोप की राजा दर्शनास आला आहे यास मस्तकीचा तुरा प्रसादार्थ द्यावा. राजश्री समागमे कल्याण स्वामी जाऊन श्रीच्या कानी निरोप सांगितला. राजाने सा नमस्कार घालोन बध्धांजुली असता रामचंद्रजीनी तुरा मस्तकीचा राजापुढें टाकिला. कल्याण स्वामीनी सांगितलें कीं श्रीरामचंद्रजीनी तुरा आपणस दिला आहे घ्यावा. म्हणवून उत्तर केल्यावर कल्याणस्वामीनी तुरा राज्याचे मस्तकी खोवून विजय हो म्हणून आशिर्वाद दिल्हा. राजेश्रींनी श्रीरामचंद्रजीची पूजा येथासांग ब्राह्मणाकरवीं करवून समाराधना केली आणि स्वारी तयार केली. स्वामी प्रसादे अवरंगजेबास जिंकीन ऐसी उमेद धरुन स्वस्थानास राजा गेला. तदनंतर स्वामी चाफलास आले

[श्रीहनुमंतस्वामीकृत श्रीसमर्थांची बखर, पृ. १५५-१५७]

---

## क्रमांक १६ : : पेशव्यांची बखर

(सोहनीकृत)

### १. श्रीमंताचें लग्न

शके १७०४ मध्यें श्रीमंताचे लग्नाचा बेत ठरला. तेव्हां अगोदर सरंजामाची तयारी होऊं लागली. तमाम लोकांस बलावणीं करण्याचा बेत ठरला हिंदुस्थान प्रांतीचे राजेरजवाडे वगैरे संस्थानी यांजकडे बलावण्यांसाठीं वकील पाठविले. बुंदेले व कोटेवाले, जयपूरवाले व उदेपूर, डीग,

कुंभेरी, भरतपूर [ येथिल ] संस्थानी यांस बोलावणीं लग्नाचीं केलीं. नागपूरवाले भोसले यांसही लग्नाचें बलावणें गेलें. मारवाडांत जोधपूरवाले राजे यांसही बलावणें केलें. तसेंच गायकवाड यांसही बलावणें केलें. तसेंच हिंदुस्थानांत फौजा बाळगणारे शिंदे, होळकर, विसाजी कृष्ण बिनीवाले यांसही लग्नास येण्याची आज्ञा सरकारची झाली कीं, "आपापले जागीं सर्व बंदोबस्त करून, जेथें ठाणीं अंमल बसलेले असतील तेथें बंदोबस्त चांगला राखून, तितक्या फौजा तेथें ठेवून खाशाखाशांनीं लग्नास यावें," अशी आज्ञा होतांच त्याच बेतानें अवघा बंदोबस्त करून खांसे लग्नास निघाले. समागमीं हिंदुस्थानचे राजे रजवाडे, संस्थानी ज्यांस ज्यांस बोलावणीं होतीं तितक्यांस समागमें घेऊन निघाले. कोणीं खांसे आले व कोणीं कारभारी आले. अशा समुदायानिशीं निघाले. तसेंच गुजराथेंतून गायकवाड, आपला गुजराथेचा बंदोबस्त करुन निघाले.

इकडे पुण्याहून हैद्राबादेस नबाब निजामअलीखां यांस लग्नाचें बलावणें करावयास पुण्याहून कारकून सरंजाम देऊन पाठविले. ते हैदराबादेस वकील सरकारचे होते त्यांणीं नेऊन नबाबांस भेटविलें. सर्व मजकूर नबाबांस निवेदीत केला कीं, "आपण वडीलपणें येऊन समारंभ केला पाहिजे." त्यावेळेस नबाब खुषवक्तींत होते. म्हणोन संतोष पावले. नंतर नबाब बोलले, "बहूत अच्छा है;" असें बोलणें झाल्यानंतर नबाब निजामअलीखां यांणीं आपले फर्जंदास हुकूम केला कीं, "राव पंडत प्रधान इन्की शादी होती है तुमने साथ फौज लेके सरंजाम समेत पुणें शादीकू जाना." असा हुकूम नबाब पोलाजंग ह्यांस झाल्यानंतर सरंजाम फौजसुद्धां पोलाजंग डेरे दाखल झाले.

इकडे दक्षिण प्रांतीं संस्थानी होते त्यांस बलावणीं झाली. कितुरवाले देसाई, सुरापूरकर बेरड, रामदूर्गवाले भावे, नरगुंदकर भावे, सावनुरवाले नबाब, टिपूसुलतान यांस कारकून बलावण्यास गेले. त्यांणीं जाऊन टिपूसुलतान यांस बलावणें केलें. तेव्हां टिपूनें जबाब दिला कीं, "बहूत अच्छा है. हम् आते."

सातारकर महाराज लग्नासाठीं पुण्यास आणिले. कुरंदवाडकर, मिरजकर, तासगांवकर, अशी पटवर्धन मंडळी लग्नास निघाली. कोकणांतून राघोजी

आंगरे कुलाब्याहून लग्नास आणिले. आनंदराव हरबाजीराव धुळप हेही लग्नास आले. मराठे सरदार राघोजी घोरपडे, निंबाळकर, अक्कलकोटवाले भोसले, शिंदखेडकर जाधव, भोइटे, धायबर, असे सर्व सरंजामी, पोंवार सुपेकर, मलठणकर, अमदाबादकर, धारची पोंवार मंडळी, नगरदेवळेवाले सुद्धां लग्नास आले. जितक्यांना बलावणीं पोंचलीं, तितके सरंजामासुद्धां पुण्यास निघाले. असा समुदाय शहराभोवतीं जमा झाला. तमाम फौजा आपापले मिसळीनें आपापल्या जाग्यावर उतरल्या.

अशींच तमाम मामलेदार यांस सरकारचीं पत्रें लग्नास येण्यासाठीं गेलीं होतीं ते मामलेदार पुण्यास येऊन पोहोंचले. गुजराथ, कर्नाटक खानदेश वऱ्हाड माळवा, बागलाण, कोंकण व गंगथडी व कृष्णाथडी व नरीथडी व सातारा प्रांतीचे व पंढरपूर प्रांतीचे व माणदेशांतील व औरंगाबाद प्रांतीचे असे मामलेदार, आपले आपले सरंजामानिशीं पुण्यास दाखल झाले. तसेंच सरसुभे खानदेश व बागलण व कर्नाटक, गुजराथ व गंगथडी व कोंकण असे सर्व सरसुभे पुण्यास येऊन पोहोंचले. सरदारही आले. ज्यांस इस्तमेल जाण्याची योग्यता त्यांस श्रीमंत जाऊन घेऊन आले. ज्यांस कारभारी सामोरे जाऊन आणावयाचे त्यांस कारभारी यांणीं जाऊन आणिलें. अष्टप्रधान, पंतप्रतिनिधी, पंत-सचिव, पंत-मंत्री, पंत-सुमंत, पंत-अमात्य, पंत-न्यायाधीश, पंत-राजाज्ञा, पंत-डबीर, असे सारे बुलावण्याबरोबर पुण्यास आले. तितक्यांत श्रीमंत सामोरे जाऊन, बहुत मानानें पुण्यास घेऊन आले. सातारकर महाराजही आले. नबाब पोलाजंग यांस श्रीमंत पुढें जाऊन, इतमानें घेऊन आले. त्यांजला मुक्कामावर उतरवून त्यांचे खाण्यापिण्याचा व सर्व फौजेचे हत्ती घोडे, उंट इतक्यांच्या दाण्या रतिबाचा, जेथपर्यंत रहातील तेथपर्यंत एकदांच बंदोबस्त योग्यतेनुरुप करून दिला. तसेंच भोसले व गायकवाड, होळकर व अष्टप्रधान, किरकोळ सरंजामी, पटवर्धन, विंचुरकर, रास्ते व घोरपडे व निंबाळकर, दरेकर व पोंवार, असे सर्व मानकरी व पागे, इतक्यांचे शिलेदार, एकांडे पथकी असा सर्व समुदाय जमा झाला. सर्वांची नांवनीशी लिहीतां मोठा विस्तार होईल.

या प्रमाणें तयारी होऊन, वधूनिश्चय बाळाजी बहिराव थत्ते यांची कन्या नेमस्त झाली. लग्नाचा बेत माघमासीं ठरला. कृष्णाजी नाईक थत्ते

यांच्यायेथें लग्नसमारंभ करावयाचा ठरला. शहरांत आमंत्रण सर्व शहरास झालें. सरकारी मंडळी मामलेदार मंडळी एरवीं शहरचे लोक, ब्राह्मण मंडळी, गृहस्थ, भिक्षुक, अग्निहोत्री व दिक्षित व शास्त्री व वैदिक व ज्योतिषि, अशीं सर्वांस आमंत्रणें केलीं. बाहेरचे सरदार गायकवाड व भोसले व होळकर व नबाब, खेरीज राजे रजवाडे हिंदुस्थानचे, इतक्यांचे वकील होते तितक्यांचे फौज सरंजामीं सुद्धां बलावणीं केलीं. अष्टप्रधानसुद्धां आमंत्रणें झालीं.

अशी सर्व सिद्धता होऊन दोन्हीं मंडपीं देवस्थापना झाली. नवरीची उष्टी हळद श्रीमंतांस आली. देवस्थापना झाली त्या दिवसापासून शहरांत लाख घरास सिधे चालू झाले. घरांतील घरधन्यांस, आणखी बिऱ्हाडें होतीं त्या-सुद्धां टीप घेऊन सीधे पंचपक्वान्नाचे दहा दिवसपर्यंत चालू होते. तसेंच बाहेरून लष्करें होतीं त्यांस सरंजाम पोंचते होऊं लागले. उत्तम सिधे पक्वान्नासुद्धां द्यावयाची आज्ञा झाली. ज्या दिवशीं देवस्थापना झाली, त्या दिवसापासून आहेराचा समारंभ पांच दिवसपर्यंत होत होता. आहेराच्या कापडाचे शतावधी भोत भरले. श्रीमंतपूजन थत्ते यांजकडून यावयाचें त्या दिवशीं वाड्यांत मोठा समारंभ झाला. सर्वत्र लहानथोर सरदार होळकर, भोसले, गायकवाड, पाटणकर, दरेकर, घोरपडे, निंबाळकर, सितोळे, भोइटे, धारकर, पोंवार असे किती गणतीस धरावे? तसेंच सर्व पागे तसेंच शिलेदार, तशीच सर्व मंडळी त्या सभेस आली. ब्राह्मण सरदार पटवर्धन, विंचुरकर, रास्ते, राजेबहादर, आपा बळवंत, बन्याबा बापू मेहेंदळे, बहिरो अनंत बेहेरे, बारामतीकर, आंगरे, नबाब पोलाजंग वगैरे सारे त्या सभेस आले. महाराज सातारकर यांस तख्त बसावयास केलें होतें. तेथें जाऊन महाराज बसले. सारी मुत्सद्दी मंडळी व कारभारी व कारकून व नानाफडणीस; व हरीपंत तात्या, बाजीपंत अण्णा, रामचंद्र गणेश, विसाजीपंत बिनीवाले, विठ्ठलपंत वाकनीस, महादाजीपंत गुरुजी, नारोपंत परचुरे, बाळाजीपंत लेले, बाबुराव केशव, लक्ष्मणपंत देशमुख, नारोपंत चक्रदेव, सदाशीवपंत करमरकर, गोविंदराव काळे, गोविंदराव पिंगळे, फडचे व बेऱ्हड्यांतील व जामदार-खान्यांतील व एकबेरजेंतील व शिलेखान्यांतील व जिन्नसखान्यांतील व तोफखान्यांतील व हशमांकडील, त्या त्या कारखान्यांतील दरोगे सरदार कारकूनासमवेत त्या सभेस येऊन बसले. गोविंद शिवराम खाजगीवाले

व पानशे व बजाबा पुरंदरे, पोतनीस, चिटणीस, मुजुमदार, असे सर्व त्या सभेंत येऊन बसले. कोकणचे सरदार धुळप व खानविलकर वसई आरमाराचे सरदार सर्व त्या सभेंत उभे आहेत. त्या सभेंत ५० पन्नास काठी सोन्याची उभी राहीली आहे. खेरीज रुप्याचे काठीवाले यांचा नेम नाहीं. थत्ते यांजकडील मंडळी श्रीमंतपूजन घेऊन आली. तीही सभेंत येऊन बसली. सारी सभा नानांनीं अवलोकून पाहीली आणि चोपदारास विचारलें, "कोणीं यावयाचा राहीला कीं काय?" असा शोध करीतां दादाजी गंगाधर निसबत होळकर व बाळाजीपंत ठोसर असे राहीले होते, त्यांस बलावणीं जातांच तेही येऊन हजर झाले. अशी सारी मंडळी येऊन बसली. कळवंतीणीचे नाच होतात. वाजंत्र्यांचे बाजे होतात, चौघडे वाजतात. त्या समयीं शिलेदार कारकून असामी दोघे नानांनीं जवळ बोलावून त्यांस उभयांस सांगितलें, "तुम्हीं आरसे महालांत जाऊन दाजिबा आपटे व मोरोपंत भावे यांस सांगावें कीं, सकळ मंडळी येऊन बसली आहे व महाराज येऊन तख्तावर बसले आहेत. थत्ते यांजकडील श्रीमंतपूजनविधी घेऊन बसले आहेत, अशी विनंती करून श्रीमंतांस लवकर घेऊन यावें." असा निरोप कळतांच उभयतां आंत जाऊन त्यांनीं श्रीमंतांस विनंती केली. विनंती करीतांच सरकारची स्वारी उठली. अंगावर पोषाक तमामी केला, डोकीस फेटा तमामी, आंगांत निमा, पायांत विजार घालून समागमें दाजीबा आपटे प्रमुख मंडळी निघाली. श्रीमंतांचे मस्तकीं शीरपेंच व कलगी व तुरा मोत्यांचा व कानांत चौकडा, गळ्यांत मोत्यांच्या व पाचेच्या माळा, हातांत पोंच्या, अशी स्वारी सरकारची निघाली. समागमें खिजमतगार मंडळी आपापले हुद्दे हुद्दे घेऊन चालते झाले. अशी स्वारी सरकारची मंडळी जेथें सभा होऊन बसली होती त्या दरवाज्याजवळ येतांच सारे चोपदार ललकारताच समोर महाराजांनीं पाहीलें. त्यावेळेस दाजीबा आपटे यांनीं श्रीमंतांचे हातावरून फुलांचा हार गुंडाळून तेथून श्रीमंत आदब बजावित चालले. ते तख्तापाशीं जाऊन, मुजरा करून, राजापुढें उभे राहीले. त्यावेळेस सकल सभा, नबाब पोलाजंग सुद्धां, उभी राहीली. त्यासमयीं एकदांच साऱ्या चोपदारांची ललकारी झाली. तेव्हां नानासुद्धां कित्येकांचे नेत्रांस आनंदाश्रू लोटले. मग महाराजांनीं श्रीमंतांस बसावयास जागा दाखविली तेथें श्रीमंत महाराजांचे उजवे बाजूस तख्तानजीक बसले. नंतर श्रीमंतपूजन

विधी झाला. त्यावेळेस भिक्षुक, ब्राह्मण, शास्त्री, पंडीत, ज्योतिषी, अग्निहोत्री वैदिक बसले होते, त्यांस देकार वांटिला. सर्वत्रांस पानसुपारी झाली. अत्तरगुलाब, हार, गजरे तुरे, सर्वत्रांस मानकरी व शिल्लेदार व परराज्यांतील आले होते, त्यांस देऊन समारंभ झाला. अवघी मंडळी श्रीमंतांची आज्ञा घेऊन जाती झाली. महाराज राजे उठले. त्यांस श्रीमंत दरवाज्यापावेंतों पोंचवित गेले. तेथून महाराज यांनीं श्रीमंतांस आज्ञा केली कीं, "माघारें जावें." नंतर दुसरे दिवशीं तेलफळ नवरीकडे सरकारांतून निघालें. त्यावेळीं थत्ते यांचे मांडवांत वऱ्हाडी व मानकरी व मुत्सद्दी व सरदार व बाहेरील संस्थानी वगैरे लग्नास येतील त्यांची मुदारत करण्यासाठीं थत्ते यांचे मांडवांत राघोजी आंगरे सरखेल यांची व हरीपंत फडके यांची नेमणूक झाली. वऱ्हाडी मानकरी यांची बसविण्याची योग्यता पाहून ज्या ज्या ठिकाणीं जे जे बसावयाचे त्या त्या ठिकाणीं बसवून, अत्तरगुलाब, पानसुपारी, हार, तुरे, गजरे, वाटावयास सरकारांतून कारकून नेमले. त्यांस ताकीद दिली कीं, "तात्या व सरखेल सांगतील त्याप्रमाणें तुम्हीं चालावें." अशी नेमणूक तेथिल झाली.

इकडे सरकारांत आहेराचा समारंभ चालला. राजे महाराज सातारकर, अष्टप्रधान, नबाब, भोसले, होळकर, गायकवाड, मानकरी मंडळी घोरपडे, निंबाळकर वगैरे मुत्सद्दी मंडळी यांचे व मामलेदार मंडळी व सरसुभे, संस्थानी राजेराजवाडे यांचे, सर्व वकिलांचे, तसेंच पागे, पथके, शिल्लेदार, रिसालदार या सर्वांचे आहेर सरकारांत आले. रुखवताचा समारंभ होत आहे तों वर न्यावयास थत्ते यांजकडून आले. वरप्रस्थानाची सिद्धता झाली.

श्रीमंत देवांस नमस्कार करुन स्वारी बाहेर निघाली. थोरला हत्ती विनायक गज, आणवून त्याजवर रुप्याची अंबारी ठेविली. त्यांत श्रीमंत बसले. पाठीमागें खवासखान्यांत आपा बळवंत व अमृतराव पेठे हातीं चवऱ्या घेऊन बसले. पुढें खास जिलबीस बोथाटीबारदार, विटेदार व बाणदार व लगी त्यांच्यापुढें खासबदार अशी जिलीब पुढें चालली. जिलबीपुढें वाजंत्र्यांचे ताफे ताशेमरफे दोनशें वाजूं लागले. त्यापुढें चौघडे वाजूं लागतात. त्यांचेपुढें जिलबीचे हत्ती शेंपन्नास चालिले आहेत. त्यामध्यें जरीपटक्याचा हत्ती. मार्गे कोतवाल घोडे पांचसातशें सोन्याचे गंडे पट्टे व

पाठीवर भरगच्ची झुली, गळयांत मोहोरापुतळयांच्या माळा, [ असे चालिले. ] जिलबीच्या हत्तीपुढें पांचहजार खांसे, घोड्यावर स्वार होऊन बंदुकीचे आवाज करीत चालिले आहेत. त्यांच्यापुढें सांडणीस्वार शेंदोनशें व सुतरस्वार शेंपन्नास तोफांचे आवाज करीत चालिले. त्यांच्यापुढें दहा हजार स्वार चालिला. अशी स्वारी लग्नास वाडा डावा घालून निघाली. तेव्हां आघाडी पानशे यांचे वाड्यापाशीं होती. श्रीमंतांच्या अंबारीमागें साहेब नौबती वाजत चालल्या. वाड्यापासून तोफखान्यापावेतों एकसारखा फौजेचा थाट उभा राहीला आहे. सरकारचे अंबारीमागें वऱ्हाडणी बायका यांणीं चालावें. बायकांमध्यें पुरुषांची दाटी न होई अशा बेतानें सभोंवतीं शिपाई चालिले. त्यांच्यामागें भिक्षुक मंडळी, शास्त्री, पुराणिक, अग्निहोत्रि, ज्योतिषी व वैदिक असा समुदाय चालला. त्यांच्यामागें मोठाले सरदार, मानकरी, होळकर, गायकवाड, भोसले, विंचुरकर, पटवर्धन, राजे बहादर, गणेशपंत बेहेरे, बहिरो अनंत, घोरपडे, निंबाळकर, जाधव, दरेकर, पाटणकर, थोरात, मोहिते, भोईटे, अक्कलकोटवाले, असे मानकरी चालीले. त्यांच्यामागें सातारकर महाराज अष्टप्रधानसमवेत, व त्यांच्यामागें नबाब पोलाजंग आणि राजे रजवाडे, संस्थानी, परराज्यांतील वकील, असा समुदाय मिरवत चालला असतां, त्यांच्यामागें सरकारची मुत्सद्दी मंडळी, नाना फडणीस सुद्धां समागमें कारकून मंडळी, शेट सावकार, उदमी असा पुण्यांतील समुदाय चालला. त्यांच्यामागें पागे सकल व कारखानदार सरकारचे व दरकदार, पोतनिस, चिटणीस, मुजुमदार असे मिरवत असतां, त्यांच्या पाठीमागें पागा घोड्यावर स्वार होऊन चालले. उंटावरील नौबती शतावधी वाजतात. अशा थाटानें व अशा समुदायानें मोठ्या सरंजामानें चालत असतां शहरचे लोक दुरस्ता माड्यांवर व गच्च्यांवर उभे राहून तमाशा पाहातात. त्या समयीं शहरचे लोकांनीं सोन्यारुप्याचीं फुलें श्रीमंतांवर उडविलीं, अशी स्वारी समारंभानें नवरीचे मंडपांत पोहोंचली.

त्या समयीं जलकुंभ मस्तकीं घेऊन दासी पुढें उभ्या. दहींभात वरून ओंवाळून टाकीले. कुळंबिणी घागरी घागरी घेऊन उभ्या होत्या त्यांस देणगी देऊन, स्वारी मंडपांत दाखल होऊन वरासनीं बसली. वरकड मंडळी मंडपात दाखल झाली. अगोदरच राघोजी आंगरे व हरीपंत तात्या सोयऱ्यांचे

मंडपांत तरतुदीस ठेविले होते, त्यांनीं पुढें येऊन, सारे मंडळीस आंत घेऊन जाऊन, ज्या ज्या ठिकाणीं योग्यतेनुरूप बसावयाचे तसे बसविले. श्रीमंत बसले त्याठिकाणीं आपा बळवंत व अमृतराव पेठे व दाजीबा आपटे वगैरे झाडून मंडळी बसली. नंतर मधुपर्क-विधि होऊन पाणि-ग्रहण-विधि झाला. त्या समयीं वाजंत्र्यांचे बाजे, चौघडे व नौबती अशीं एकदांच सारीं वाजूं लागलीं व तोफांची सरबत्ती झाली. मग विवाह-होम होऊन ब्राह्मणांस दक्षिणा मंडपांत वाटली. मंडपांत वऱ्हाडी होते त्यांस पानसुपारी, हार, गजरे, तुरे वाटिले. मग सर्वत्र मंडळी सरकारचा निरोप घेऊन निघाली ती आपापले ठिकाणीं गेली. श्रीमंत मात्र राहीले.

तेथें चार दिवश समारंभ भोजनाचा झाला. मुत्सद्दी मंडळी व बाहेरचे वऱ्हाडी सरदार वगैरे ह्या अवध्यांस चार दिवस यथासांग सोहळा झाला. बाहेरचे सरदार मंडळी व मराठे मानकरी यांस भोजनें सरकार-वाड्यांत झालीं. मोठी दक्षणा देकार रमण्यांत झाला. चार दिवस झाल्यावर साडे होऊन, वरातेची मिरवणूक निघाली. त्या दिवशीं शहरांत सारे रस्ते झाडून, सडे टाकून, चिराकदानें लाविलीं. सरकारची स्वारी अंबारींत बसून वाड्यांत यावयास निघाली. सारे सरदार, मानकरी, राजेरजवाडे, सातारकरमहाराज, अष्टप्रधान व पोलाजंग, आपले सरदार लोक-सुद्धां जसे जाते वेळेस लग्नास गेले तसेंच येतेवेळीं त्याच थाटानें मिरवत हवया, नळे, चंद्रज्योती, झाडें नानातऱ्हेचीं सोडीत सोडीत मिरवत सुमुहूर्तानें वाड्यांत झाले. नाचरंग सर्व होऊन, लक्ष्मीपूजन होऊन, सर्वांस पानसुपारी वगैरे अत्तर गुलाब, हार, तुरे वाटले. मग सर्वांस घरीं जाण्याचा हुकूम झाला. सर्वत्र आपापले ठिकाणीं गेले.

दुसरे दिवसापासून सर्वत्र लोकांस मेजवानीचीं आमंत्रणें करून भोजनास बलाविलें. मंडळी तितकीच आली. वाढावयास सर्व कारकून मंडळी नेमीली. तूप वाढावयास शहरचे सराफ नेमीले. एका एका पदार्थास एक एक कारकून नेमिला. सारे कारकून पितांबर नेसून, शालजोड्या कंबरेस बांधून, वाढावयास लागले. चार चार कारकुनांमागें एक एक शिष्या हातीं ओलीं धोत्रें घेऊन वाढणारांचे घाम पुशीत असे. असा रोज समारंभ होत राहिला. होळकर, गायकवाड, भोंसले, व सरकारचे मानकरी–घोरपडे, जाधव,

निंबाळकर, पाटणकर, दरेकर, मोहीते, शिरके, थोरात, धुलप, खानविलकर, अशी मंडळी व पागे, पथके सुद्धां, शिलेदार, एकांडे, अशा अवघ्यांस भोजनास घालून सर्वांस पोषाग योग्यतेनुरूप दिले. तसेंच ब्राह्मण सरदार विंचुरकर, पटवर्धन, रास्ते, बेहेरे, बाहिरो अनंत, राजेबहादर, बारामतीकर, आपा बळवंत, बन्या बापू मेहेंदळे, पुरंधरे, पानशे, अशा सर्वांस अलंकार, वस्त्रें योग्यतेनुरूप दिलीं.

[ पेशव्यांची बखर, पृ. ११५-१२३ ]

### २. रंगाचा समारंभ

आतां पुढें रंगाचा समारंभ करावयाचा असें नाना व तात्या व पाटील-बोवा यांचें बोलणें होऊन, तिघेही उठून, श्रीमंत आरसे महालांत होते तेथें जाऊन, श्रीमंतांशीं पाटीलबोवा मुजरा करून बसले. तसेंच नाना व तात्या नमस्कार करून बसले. त्या दिवशीं दरबार आरसे महालांतच झाला. असे बसले आहेत तोंच पाठीमागून आपा बळवंत व अमृतराव पेठें व माधवराव रामचंद्र, बन्याबापू मेहेंदळे व निळकंठराव खाजगीवाले, महादाजीपंत गुरुजी, त्रिंबकराव राजे बहादर, बाहिरो अनंत पुरंदरे, परशुरामभाऊ पटवर्धन, रंगराव ओढेकर, विंचुरकर, पानशे, मराठे सरदार मंडळी असा दरबार त्या आरसे महालांत झाला असतां, महादजी शिंदे यांणीं श्रीमंतांस विनंती केली कीं, " हिंदुस्थानांत मोठे राजेरजवाडे हुताशनीचा रंग खेळतात त्याप्रमाणें रंग पुण्यांत व्हावा. आतां हुताशनी तर गेली. परंतु चैत्र शुद्ध प्रतिपदेस तसा रंग करावा असें माझ्या मनांत आहे. तेव्हां सरकारच्या मर्जीस येईल तें खरें." तेव्हां समस्त कारभारी, मुत्सद्दी, सरदार, मानकरी व पागे बसले होते तितक्यांचा रुकार रंगाविषयीं पडला. " साऱ्यांचे मनांत ही गोष्ट आली. आतां सरकारची आज्ञा कायती व्हावी." असें बोलणें महादजी शिंदे यांचें ऐकून श्रीमंत म्हणतात, " तो रंग राजेरजवाडे कसे खेळतात हें सांगावें." त्याजवर महादजी शिंदे यांणीं जयपूरचा व उदेपूरचा व मथुरेचा व आग्ऱ्याचा व गोकुळचा व वृंदावन येथिल रंगाचा मजकूर श्रीमंतांस विदित केला. तो ऐकून श्रीमंतांचे मनांत गोष्ट भरली व सर्वांचे रुकार पडले होते त्याजवरून श्रीमंतांचे मनांतही वाटलें, " आपण तसाच रंग खेळावा." असें झाल्या-

नंतर चैत्र शुद्ध १ चा नेम ठरला. पाटीलबोवांस आज्ञा झाली कीं, "रंगाची तयारी करावी." वाड्यांत रंग करावयाची आज्ञा खाजगीवाले यांस झाली. खेरीज ज्या रस्त्यानें कारभारी व सरदार व पागे होते तितक्यांस आज्ञा झाली कीं, "इतक्या मंडळीनें तुम्हीं रंगाची तयारी आपापले ठिकाणीं करावी." त्यांत हरीपंत तात्या फडके व माधवराव रास्ते यांस आज्ञा झाली कीं, "तुम्हीं दोहों ठिकाणीं रंग मोठा करावा." अशी आज्ञा सर्वांस होऊन दरबार बरखास्त झाला. पाटीलबोवा आज्ञा घेऊन वानवडीस गेले.

मग शिंदे यांणीं तयारी रंगाची आपले लष्करांत केली. तसेंच ज्या ज्या रस्त्याचे लोकांस आज्ञा झाली त्यांणींही आपले ठिकाणीं रंगाची तयारी दुरस्ता केली. तसेंच शिंदे यांचे लष्करांत रंगाची तयारी केली. खेरीज जागोजागीं वाटेनें सरकारचे व शिंदे यांजकडील हौद भरून ठेविले. गुलालची तयारी झाली. सरदार, मानकरी व पागे, पथके, शिलेदार, एकांडे मुत्सद्दी व मानकरी व कारकून मंडळी असे तमाम तयार होऊन वाड्यापाशीं आले. तशीच सर्व फौज व हत्ती व सांडणीस्वार असे तयार होऊन उभे राहीले. सरकारचीही निघण्याची तयारी झाली. निघावयाचे वेळेस वाड्यांत थोरल्या चौकांत बिछायत करून सरकारची स्वारी येऊन तेथें बसली. त्यावेळेस नाना व तात्या व आपा बळवंत, पेठे, त्रिंबकराव, परचुरे, नारोपंत चक्रदेव असे सर्व लहान थोर, खेरीज ब्राह्मण सरदार-रास्ते, विंचुरकर, ओढेकर, बाहिरो अनंत, राजे बहादर, पानशे, पुरंदरे, माधवराव रामचंद्र, मराठे मंडळ घोरपडे, निंबाळकर, पाटणकर, मोहीते, दरेकर, मानाजी फांकडे, तोत्याजी जाधव, पाठीमागोन पटवर्धन, माधवराव रामचंद्र बिनिवाले व बेहेरे-असे सर्व येऊन नाचास बसले. तमाम पागे धायबर निकम, भोईटे, थोरात, बाबूराव अनंत, भास्कर जगन्नाथ, निळकंठराव रामचंद्र, अवधूतराव यशवंत, असे बावन्न पागे बैठकीस येऊन दाखल झाले. वानवडीहून महादजी शिंदे तयार होऊन सरकारची स्वारी न्यावयास आले. असे समाज वाड्यांत मिळाले. तेथें रंग खेळावयास प्रारंभ झाला. त्या रंगाची वर्णना किती करावी ? हजारो गुलालगोटे उडुं लागले. रंगाचे बंब चालूं लागले. तसाच गुलाल खंड्यांचे खंड्या वाड्यांत उडाला.

असा रंग खेळून सरकारची स्वारी सायंकाळचे दहा घटका दिवसास

वानवडीस जाण्यास अंबारींत बसून खवासखान्यांत महादजी शिंदे व आपा बळवंत पाठीमागें बसले. वाडा डावा घालून, सरकारची स्वारी बुधवारांतून, कापडआळीनें आदितवारांत हरिपंत तात्यांचे वाड्यापाशीं येई तोपर्यंत वाटेनें सरकारचे लोकांनीं रंग करून ठेविला होता, त्यांनीं एकच गर्दी रंगाची केली. तसेंच हरिपंत तात्यांचे वाड्यापाशीं स्वारी आल्यानंतर तेथें दोन घटकांपर्यंत रंगाचा मार झाला. त्या रंगाच्या योगानें रस्त्यानें चिखल पडला. व शेंकडो पल्ले गुलाल उधळला. अशा दोन घटिका येथें रंग खेळून सरकारची स्वारी पुढें रंग खेळत चालली. शेंकडों पल्ले गुलाल हत्तीवर ठेविला होता तो रस्त्यांत उधळीत चालले. असे नाकझरी उतरून रास्ते यांचे पेठेंतून चालले असतां तसे खेळत रास्ते यांच्या वाड्यापाशीं आले. तेथें रास्ते यांनीं रंगाचा समारंभ केला. गच्च्यांवरून रंगाचे बंब 'उडुं लागले. तेव्हां स्वारीमध्यें जसा पर्जन्य पडतो असा रंग पडूं लागला! दोन घटिका स्वारी तेथें रंग खेळून वानवडीस स्वारी दाखल झाली.

मग जेथें श्रीमंत बसावयाची जागा केली होती तेथें ते जाऊन बसले. तेव्हां झाडून सरदार, मानकरी व पागे व मुत्सद्दी व कारकून त्या कचेरीस येऊन बसले. बसल्यानंतर दोन घटीकापर्यंत नाच व गाणें झालें. नंतर रंग खेळावयास प्रारंभ झाला. रंग खेळतां खेळतां रंगाचे पाट नदीस मिळाले. असा रंग द्वापारयुगीं श्रीकृष्ण भगवान खेळले. तसा कलियुगीं श्रीमंत सवाई माधवराव खेळले. असा कोणीं खेळावयाचा नाहीं व मागेही कोणीं खेळला नाहीं! रस्त्यामध्यें गुलालाचा पेर व रंगाचा चिखल झाला तो किती गणतीस धरावा? असा रंग खेळल्यानंतर सरकारची स्वारी स्नानास उठली. त्यासमयीं शिंदे यांणीं शेंकडो कढया पाण्याच्या तापत ठेविल्या होत्या. शेंकडो ब्राह्मण पाणक्ये (हातांत) घंगाळ घागरी घेऊन उभे. असा बंदोबस्त स्नानाचा ब्राह्मण मंडळीचा झाला. तसेंच मराठे सरदार, मानकरी यांचा केला होता. मग अवघ्यांचीं स्नानें झाल्यानंतर ज्या कचेरीस रंग खेळले त्याच मखमाली डेऱ्यांत फरास यानें येऊन, ती बिछायत काढून, नवी बिछायत घालून तयारी केली. सर्व मंडळी लहान-थोर स्नानें करून नवीं वस्त्रें घेऊन येऊन कचेरीस बसलीं. मग नाचास प्रारंभ झाला. मग महादजी शिंदे यांनीं श्रीमंतास सर्व पोषाग जवाहीर,

शिरपेंच व तुरा वगैरे गळयांत मोत्यांच्या माळा असा दिला. तसेंच सर्व कारभारी, मुत्सद्दी व कारकून मंडळी व शिलेदार लोक व मानकरी व हुजरातेचे लोक व पागे, पथके असे सर्वांस शिंदे ह्यांनीं पोषाग वाटून नंतर पानसुपारी, अत्तरगुलाब, हार, तुरे गजरे दिले. इतका समारंभ होईतों तीन घटिका रात्र झाली.

मग सरकारची स्वारी पुण्यास यावयास निघाली. तेव्हां हजार पांचशें दुशाका हत्तीवर लावून मोठ्या थाटानें स्वारी मोठ्या डौलानें चालली. ज्या समयीं स्वारी माघारी आली त्या समयीं शहरांत दुरस्ता चिराकदानें करून, लोक लोक आपापल्या माड्यांवरून दिवे लावून तमाशा पहावयास उभे राहिले. त्यांनीं त्या दिवशीं सोन्यारुप्याची फुलें श्रीमंतांचे अंबारीवर उडविली. अशा थाटानें स्वारी वाड्यांत दहा घटका रात्रींचे अमलांत दाखल होऊन श्रीमंत मसनदीवर बसले. सर्व मंडळीस पानसुपारी, अत्तरगुलाब देऊन घरीं जाण्यांची आज्ञा सर्वांस झाली. त्या समयीं सर्वांनीं नजर नजराणें करून आपले ठिकाणीं सर्व लहानथोर गेले. असा रंगाचा समारंभ झाला.

[पेशव्यांची बखर, पृ. १३९-१४४]

---

## क्रमांक १७ : : खड्यांच्या स्वारीची बखर

**' राव पंडित प्रधान जय असे '**

दसरा आला. ते दिवशीं नानांनीं रात्रौ श्रीमंतांस सोनें देऊन, आपण एकटेच प्रस्थानीं निघोन गारपिरावर डेरे देऊन उतरले. दुसरे दिवशीं शास्त्री, पंडित व जोशी मेळवून सभा केली. श्रीमंतांस उत्तम मुहूर्त पाहिला. तो नानांचे पाठीमागें पंधरा दिवशीं खांसा स्वारी निघावयाची, तों नानांनीं आपण पुण्यांत येऊन खांसे अंबारीच्या खवासखान्यांत चवरी वारावयास बसोन मोठ्या समारंभानें खांसा स्वारी प्रस्थानीं निघोन गारपिरावर डेऱ्यांत

जाऊन उतरले. पूर्वी पाटीलबावा यांणीं हिंदुस्थानांतून पाच्छाई यांची स्वारी व वजीरी व नालखी व पालखी माहीमरातब आणिली होती, व बहुत दौलत अपरंपार आणिली होती. त्यावेळीं पुण्यांत सोन्याचा धूर निघत होता. सगळे पृथ्वींतील वकील पुण्यास होते. फिरंगी यांजकडील वकील मालीट म्हणोन होता. सगळे वकिलांस ताकीद जाहली कीं, सर्वांनीं स्वारी बरोबर यावें, पुण्यांत कोणी राहूं नये. त्यावरून वकील मंडळ गारपिरावर येऊन उतरलें. ब्राम्हण मुत्सद्दी पुण्यांत बहुत होते, त्यांस ताकीद झाली कीं, जेवढ्यास घोडे बसावयास असतील त्यांणीं स्वारी बरोबर यावें. त्याजवरून मुत्सद्दी मंडळी व सरदार व मानकरी व पागे, पतके व लहान मोठे झाडून सरंजामी सुद्धां गारपिरावर डेरा दिला होता तेथें जाऊन उतरले. एक महिना तळ गारपिरावर दिला होता. तेव्हां नाना बोलले कीं चार सावकार बरोबर असावे. सध्यां पैक्याची गरज आपल्यास नाहीं. समयीं वर्षा सहा महिन्यांनीं छावणी जाहल्यास पैक्याची गरज लागेल. म्हणोन हरिभक्त सावकार यास बलावून आणिलें आणि विचारिलें कीं, "तुमचे जवळ आज यावेळेस पैक्याची तयारी किती आहे?" त्याजवरून त्यांणीं उत्तर दिलें कीं, "यावेळेस ऐशीं लक्षांचे तोडे घरांत बांधिलेले आहेत. येण्याजाण्याची अटक पाहिली नाहीं. आठा चहूं दिवसांची मुदत दिली असतां दहा पांच लक्षांची आणखी तयारी होईल." असें उत्तर दिलें. त्याजवरून नाना बोलले कीं, "याप्रमाणें ऐवजाची तयारी आहे कीं काय?" तेव्हां हरिभक्त बोलले कीं, "कारकून पाठवून मोजदाद करावी म्हणजे खात्री होईल." दुसरे सावकार कर्णे व रास्ते व बाकडे तेथें होते व बानोडे व ताबेकर असे असे बलावून त्यांस विचारिलें कीं, "तुमच्या जवळ आज ऐवजाची तयारी किती आहे?" तेव्हां कोणी सावकार एक कोट रुपये या वेळेस तयार आहेत असें बोलले, कोणी पाऊण कोट आहेत असें बोलतात, व कोणी सावकार पन्नास लक्ष. असें सावकार बोलूं लागले. तेव्हां नाना बोलले कीं, "आम्हांस गरज लागल्यास पैका घेऊं. स्वारी बरोबर असावें." सावकार यांस पालखीचीं वस्त्रें देऊन, सावकार खुशाल होऊन गारपिरावर येऊन उतरले.

नंतर दुसरे दिवशीं गारपिरावरून कूच होऊन कोरेगांवचे मुक्कामीं गेले.

तेथें मोंगल यांचे वकील बरोबर होते, त्याणीं पेशव्यांचे लष्करांत चोर बातमीनें टीप घेतली. यांजबरोबर फौज किती आहे? तेव्हां हुजुरांत मानकरी पंचवीस हजार व गारदी पंचवीस हजार व शिंदे यांजबरोबर चाळीस हजार, होळकर यांजबरोबर पंधरा हजार व पांढरपेशे मुत्सद्दी ब्राम्हण यांचीं धोत्रें वाळत घालावयाच्या दांड्या पंधरा हजार होत्या. याप्रमाणें धोत्रे भोजन-भाऊ बहुत आहेत. यांणीं तरवार काय मारावयाची आहे? आपण दर कूच पुढें यावें. असें वकील याणीं खुशालीचें वर्तमान निजाम अल्ली यांजकडे लिहून पाठविलें त्यांजकडे आमचे वकील गोविंदराव काळे, यांणीं तिकडील वर्तमान लिहून पाठविलें कीं, मोंगल यांजबरोबर लाख फौज व चाळीस हजार पठाण लढाऊ तोफखाना व जनानखाना दीडशें बायका बरोबर होत्या. त्या खेरीज नाटकशाळा ऐशीं होत्या. त्या जनानखान्याच्या अंबाऱ्या ऐशीं बरोबर होत्या. दर अंबारींत बायका दोन दोन याजबरोबर बैंगनी पलटण सजविलें होतें. याप्रमाणें सरंजाम होते. म्हणोन वकील यांचें लिहिलें आलें. याप्रमाणें दिनचर्यांचें वर्तमान त्यांचे वकिलांनीं तिकडे लिहावें आमचे वकिलांनीं इकडे लिहावें.

पुढें कोरेगांवाहून कूच होऊन काष्टी तांदळीचे मुक्कामीं गेले, तों तेथें तासगांवकर परशुरामभाऊ पटवर्धन सोळा हजारानिशीं आले. त्यांस सामोरे खांसा स्वारी कोसभर जाऊन भेटले, आणि मोठ्या समारंभानें जाऊन आणिले. येऊन उतरले. पुढें तेथून कूच होऊन भिलवाडीचे मुक्कामीं गेले. तों नागपूर-वाले रघोजी भोंसले तीस हजारानिशीं आले. त्यांजबरोबर बाणांचा सरंजाम बहुत होता. त्यांस खांसा स्वारी तीन कोसावर सामोर जाऊन मोठ्या इतमा-मानें येऊन उतरले. त्याजवरून त्यांचे वकिलांचीं अवसानें गेलीं. त्याणीं नबाब यांजकडे लिहून पाठविलें कीं, "पूर्वी लिहिलें होतें, फौज पेशव्यांची कांहीं नाहीं. हल्लीं तासगांवकर पटवर्धन व नागपूरवाले भोंसले मिळाले. पन्नास हजारानिशीं येऊन भेटले. फौज बहुत जमत चालली." तेथून कूच होऊन पुढील मुक्कामीं गेले तों हिंदुस्थानांतून शिंदे यांची फौज सरदार जिवबादादा व लखोबा नाना शेणवी होते त्यांजबरोबर फौज पंचवीस हजार व कंपु दोन, नळी बेवीस हजार व तोफखाना तीनशें या प्रमाणें सरंजाम होता. त्यास खांसा स्वारी कोसभर सामोरे जाऊन भेटले. मोठ्या सन्मानानें येऊन उतरले.

बाजार बुणगे सुद्धां. दोन लाख फौज जमली. या शिवाय लहान मोठे सरंजामी बहुत येऊन भेटले, ते कोठवर लिहावे ?

दुसरे दिवशीं त्याचे वकिलांस बोलावून जिवबा दादाकडून जलदबाराची कवाईत करविली. तीनशें तोफांचा व बेवीस हजार कंपु नळीचा पांच आंख मोजीत तों एकदांच आवाज होई. या प्रमाणें चार घटीका कवाईत करविली. नबाब यांचे वकिलांस दाखविली. वकील यांचीं अवसानें गेलीं. वकील ह्मणो लागले कीं, 'या आगी पुढें कोण ठरेल ? याजवरून वकील यांणीं निजाम-अल्ली यांजकडे लिहिलें कीं, तुम्हीं पुढें येणें तें विचार करून येणें. तिकडील मश्रुलमुल्ूख यांचे दिवाण यांस बहुत गर्व जाहला होता. ते म्हणो लागले कीं, "पेशव्यांची फौज किती आहे ती आधीं पाहून घेऊं. तेथून बालेघाटाचे सुमारें येऊन उतरले होते. हे ज्या मुक्कामीं होते, तेथून कूच होऊन सिनानदी आहे तेथें मुक्कामास आले. तो मुलूख मोंगल यांचे सरदार रावरंभा निंबाळकर परांडेवाले यांजकडे होता. आपला मुलूख पाठीं मागें टाकून त्यांचे मुलखांत गेले. निजाम अल्ली मोंगल पेशवे यांस वीस कोसांचें अंतर राहिलें. इतकें जवळ येऊन ठेपले. तेथून सिनानदी वरून दुसरे दिवशीं कूच करून विंचरणा नदीवर जाऊन उतरले. त्याला व यांला दहा कोशांचें अंतर राहिलें. तेथें आठ दिवस मुक्काम जाहले.

एके दिवशीं शिंदे व होळकर यांसि बलावून विचारलें कीं, "तुमचे बरोबर पेंढार किती आहे ?" तेव्हां ते बोलले कीं, पंचवीस हजार आहेत. त्याचे सरदारांस बलावून सांगितलें कीं, आमची पेशव्यांची पूर्वापार चाल अशी आहे कीं, अगोदर त्यांचे मुलखांत व त्याचे आमचे भंवताला दोनशें कोसांत आपला मुलूख खेरीज करून दिवा मिळूं नये. याप्रमाणें हुकूम झाला. पेंढार याचे सरदारांस सोन्याचीं कडीं व पोषाख दिले, आणि त्यांस सांगितलें कीं, तुम्हांस लूट माफ आहे. मग पेंढार यांणीं मोठीं मोठीं शहरें अवरंगाबाज व पैठण व जालनापूर व दुसरीं कितीक शहरें व मुलूख जाळून लुटून फस्त केला. दोनशें कोसांत दिवा नाहीं. मग त्यांजकडे कोठून रसद येईल ? आधींच पेंढार आणि त्यांत हुकूम झाला, मग काय विचारावयाचें आहे ?

एके दिवशीं बाबा फडके तलाव्यास बाहेर पांच चार कोसावर गेले होते. तेथें निजाम अल्ली मोंगल यांची कही घांटाखालीं होती त्या कहीच्या बरोबर

स्वार रखवालीस पांच हजार होते. व बाबांबरोबर पांच च्यारशें स्वार होते. त्यांची व यांची वाटेनें गांठ पडली. त्या वेळेस बाबा फडके पळाले. तेव्हां फडके यांची दहा पांच घोडीं कहीवाल्यांनीं धरून नेलीं. त्यांजबराबर स्वार भारी होते. त्यांणीं मागें जाऊन मश्रूल मुलूख यांजपाशीं खुशालीचें वर्तमान सांगितलें, "हरिपंत तात्याका बेटा तो भाग गया. याजप्रमाणें पेशवे यांची फौज आहे." त्याजवरून मश्रूल मुलूख यांणीं खुशालीचें वर्तमान ऐकून तोफखाना सोडला व साखरा वाटल्या. आणि रात्रौ आमचे गोविंदराव काळे यांस बलावून भांडांचा तमाशा केला. सोंगें बहुत आणिलीं. कशीं म्हणाल तरि नाना फडणीस व दौलतराव शिंदे व परशराम भाऊ अशीं नांवें घेऊन सोंगें आणिलीं. आमचे वकिलास दाखविलीं. आणि बोलले याप्रमाणें पुढें व्हावयाचें. असें आमचे वकिलास सांगितलें. चार प्रहर तमाशा जहाला. गोविंदराव काळे वकील आपले डेऱ्यांत जाऊन पत्रें श्रीमंतांकडेस लिहिलीं. तमाशाचें वर्तमान लिहिलें. तीं पत्रें श्रीमंतांकडेस आलीं. गोविंदराव काळे यांचे दिवाण गोविंदराव पिंगळे इकडे नानाकडेस होते, त्यांणीं पत्रें श्रीमंत व नानांस वाचून दाखविलीं.

मग नानांनीं थोरला डेरा दळबादल म्हणोन होता तो उभा करविला. त्या डेऱ्यांत पांच हजार मनुष्यें बसत असा होता. तिसरे प्रहरीं सगळे मानकरी शिंदे, होळकर, भोंसले, पटवर्धन यांस बोलावून कचेरी जहाली. तेथें वकिलाचीं पत्रें आलीं होतीं, तीं राजश्री त्रिंबकराव परचुरे यांस सांगितलें कीं, पत्रें सगळे मानकरी यांस मोठ्यानें वाचून दाखवावीं. त्याप्रमाणें त्यांणीं वाचिलीं. सर्वांनीं वर्तमान ऐकलें. मग श्रीमंतांनीं दौलतराव शिंदे व भोंसले यांची मस्करी केली, "पत्रें ऐकतां, पुढें विचार काय करावा? निजाम अली व मश्रूल मुलूख याणीं अशीं सोंगें आणूं नयेत तीं आणिलीं." मग शिंदे यांणीं विनंती केली कीं, "आम्ही आजपर्यंत स्वारी केली नाहीं. पाटीलबावा यांचा लौकिक. आमची पहिली स्वारी, परंतु महाराजांचे प्रतापें करून काय मौज होईल ती पहावी." याप्रमाणें विनोद केला. बहुत हास्य केलें. राजश्री परशरामभाऊ पटवर्धन बाजूस बसले होते, त्यांस बलावून सांगितलें कीं, "स्वारीचें ओझें तुमचे डोकीवर आहे. या मध्यें पोक्त मोठें तुम्हीच आहां, तुम्ही डोई दिल्याशिवाय पल्ला येणार नाहीं." मग भाऊंनीं विनंती केली

कीं, “ शिंदे, होळकर, भोंसले असे मोठमोठे आहेत, व आम्हीही पाठीमागें आहोंच.” मग नाना बोलले कीं, “ दोन टोळ्या केल्या पाहिजेत, आमचे तर्फें भाऊ तुम्ही व बाबा फडके असे नेमावयाचे.” मग शिंदे यांस विचारलें कीं, “ तुम्ही आपले सरदार कोण नेमितां ? ” त्यांणीं सांगितलें कीं, “ आमचे तर्फेनें जिवबादादा व लखोबा नाना.” मग भोंसले यांस विचारलें, “तुम्ही आपले सरदार कोण नेमितां ?” तेव्हां त्यांणीं सांगितलें कीं, “ आमचे तर्फेनें विठ्ठलपंत सुभेदार.” होळकर याणींही आपले तर्फेनें एक दोन सरदार नेमिले. नाना म्हणाले तुम्ही खाशांनीं श्रीमंताजवळ असावें. पुढें सड्या फौजांनिशीं लढाई करावी. मग खाशांवर पाळी येईल. आणि पोतनीस यांस बोलावून सांगितलें कीं, “ पोषाख आणावे.” परशराम भाऊंस शेला, पागोटें, शिरपेंच कंठी, व तुरा दिला. जिवबादादा व लखोबा नाना व विठ्ठलपंत सुभेदार व होळकरांकडील सरदार यांस याप्रमाणें पोषाख दिले. हे मोठमोठे मोहरे होते. वरकड मानकरी यांस विडे दिले. आणखी सांगितलें कीं, आपले गोटांतून सड्या फौजा निवडून बाबा फडके पुढें पांच चार कोसांवर जाऊन पूर्वींच उतरले होते; कारण छापा येईल; असें समजोन चवदा हजार हुजुरात मानकरी होते तेथें जाऊन उतरावें म्हणोन सांगितलें. बरोबर बाजारबुणगें घेऊं नये. लढाईस सड्या स्वारीनिशीं जाऊन उतरावें. सडी फौज लढाईस पुढें किती गेली म्हणाल, तर साठ हजार होती. जेथें भाऊंची उडी पडेल तेथें साठ हजारांची उडी पडावी, याप्रमाणें सांगितलें. इतक्यांचा मोड होईल तेव्हां मग खाशांवर पाळी येईल. मग दोन टोळ्या केल्या. खासे अवघे श्रीमंतां-पाशीं राहिले.

त्याजवरून दुसरे दिवशीं निजामअल्ली बालेघाटा खालीं उतरून आले, तेथें एक दोन दिवस झाले. तेथून परांडा किल्ला बारा कोस होता. त्या किल्ल्यावर त्यांणीं बहुत सरंजाम केला होता. निंबाळकर यांजकडे किल्ला होता. जसे आमचे शिंदे, होळकर मोठे सरदार, तसे निंबाळकर त्यांचे सरदार. त्यांचा बेत तेथून कूच करून परांड्यांचे रोखें जावें. किल्ला पाठीमागें घालून तोंड द्यावें. आपल्यास किल्ल्याचा आश्रय आहे. पेशवे यांस पाठीमागें कांहीं आश्रय नाहीं. याप्रमाणें बेत होता. वकील यांणीं श्रीमंत यांस बातमी लिहिली, उद्यांचा दिवस जाऊन परवां येथून कूच करून परांड्याचे रोखें

जाणार त्यास तुम्हीं परवां तेथून घाला घालावा. परांड्याचे रोखें जाऊं देऊं नये. याप्रमाणें पत्रें आलीं. तीं नानांनीं वाचून पाहून श्रीमंतांकडेस दाखविलीं आणि परशराम भाऊंकडे पाठविलीं कीं, याप्रमाणें परवांचा बेत राखावा. त्याजवरून भाऊंनीं पत्रें वाचून पाहून दुसरे दिवशीं संध्याकाळीं तमाम सगळया गोटांत ताकीद केली कीं, उद्यां पहांटेची प्रहर चार घटिका रात्र आहे तों स्नानसंध्या भोजन करून दिवस उदय पावत आहे तों सर्वांनीं तयार असावें. सगळया लष्करांत जिकडे तिकडे तयारी होत आहे, कोणी जीनबंदी करीत आहे, कोणी भाकरी खात आहे, तों इतक्यांत तिकडून बातमी आली कीं, निजामअल्ली कूच करून चालते झाले. बरोबर सरंजाम भाकरींच्या कंठाळा घोड्यांवर भरल्या, पाण्याच्या पखाला उंटावरून घेतल्या, बाजार बुणगे मध्यें घालून मोठ्या आराब्यानें चालले. त्याचें चालणें मिजाशी बहुत, दिवसांतून चार कोस म्हणजे भारी. याप्रमाणें मिजाशी. इकडे परशराम भाऊ, यांचें खास पथक आठशें स्वारांची तयारी जाहली होती. बाकी फौज तयार होत होती. भाऊंचे लेक दोघे बरोबर होते, आपा व बाबा. पुतण्या विठ्ठलपंत सुभेदार होते ते पुणें मुक्कामीं भाऊंस म्हणत होते कीं, "तुम्हीं सर्वांस पालख्या दिल्या आणि मजला पालखी कां नाहीं?" मग भाऊ बोलले कीं, "तरवार मारावी आणि पालखी मेळवावी!" तोही विठ्ठलपंत बरोबर होता. मग भाऊंनीं सगळया गोटांत सांगून पाठविलें कीं, आम्ही पुढें तलाव्यास जातों, तुम्हीं मागाहून लौकर यावें.

याप्रमाणें सांगोन आठशें स्वारांनिशीं भाऊ चालते जहाले. खरड्याचें आलीकडे तीन कोस घोडेगांव होता, तेथें लहानशी टेंकडी होती त्याजवरून चढोन खालीं लवणांत निजामअल्ली कूच करून जात होता. त्याजला व यांजला कोसा सवाकोसाचें अंतर राहिलें. भाऊंनीं दुरबीण लावून त्यांचे लष्कारांत पाहिलें तों इतक्यांत त्यांची कांहीं दहापांच हजार फौज पुढें वाढली होती. ती त्या डोंगरीचे आड होती ती भाऊंचे दृष्टीस पडली नाहीं. भाऊंनीं बाजूस पाहिलें तों जवळ टोळी देखिली. तों भाऊ बोलले कीं ही फौज कोणाची आहे? तेव्हां समजलें कीं, गनीमाची आहे. ते पुढें आल्याची बातमी होती कीं, परशरामभाऊ म्हणतात ते पुढें आले आहेत. भाऊंची टोळी थोडकी पाहून त्यांणीं पुढें चाल केली. मग भाऊ म्हणों लागले कीं

मागें पळावें तरी ठीक नाहीं आणि आमच्या फौजा अजून आल्या नाहींत. तेव्हां भाऊंनीं सांडणी स्वार मागें जलद पाठविला कीं, तुम्हीं लौकर यावें. आमचें लढाईचें तोंड लागलें. मग भाऊ घोड्यावरून खालीं उतरून श्रीमंतांस साष्टांग नमस्कार घातला आणि बोलले कीं, आतां महाराजांचे पाय समर्थ आहेत. इतकें बोलून घोड्यावर स्वार झाले, आणि दोन हातींचे पट्टे उघडे केले, आणि घोडा पुढें घातला. इतक्यामध्यें गलीमाचे पांचचारशें स्वार पुढें येऊन तेथें हातघाई जुंपली. भाऊंचे ४०० स्वार पडले व त्याचें ५१४ शें. तों इतक्यांत भाऊंचा पुतण्या विठ्ठलराव याणें घोडा पुढें घातला. आणि दोन पठाण मोठे ठार मारिले. आणि मागें परतला तों तिकडून गोळी आली ती उरावर लागली. लागतांच घोड्यावरून खालीं पडला तो ठार जाहला. हें पाहून भाऊंचे चिरंजीव आप्पा होते, त्यांणीं घोडा पुढें घालून विठ्ठलराव याचा मुर्दा उचलून पालखींत घालून मागें पालखी रवाना केली. जीवंत मेला पाहिला नाहीं. मोहरा गनीम नेईल म्हणोन जलदी केली. तों तिकडून दहा-पांच पठाण येऊन एकानें भाऊंवर हात टाकिला. तों डोळ्यावर जखम जाहली. दोघे चिरंजीव बाबा व आप्पा यांणीं भाऊंवर हात टाकिला त्या पठाणास ठार मारिला. तों इतक्यांत भाऊ शंभर स्वारानिशीं राहिले. बाकी स्वार पडले. तिकडून बाबा कूच करून जात होते, ते लढाईचें तोंड लागतांच तेथेंच राहिले. इकडे भाऊंचें अवसान गेलें. तों इतक्यांत मागाहून विंचूरकर यांचें पथक व निळकंठराव रामचंद्र परभू पागे होते त्याचें पतक आलें. आणि विंचूरकर यांचे बरोबर चारशें स्वार होते त्यांस बातमी लागतांच धांवत आले, आणखीं म्हणो लागले कीं, भाऊ कोठें आहेत? मग भाऊ बोलले कीं, तुमचा बाप होऊन पुढें उभा राहिला आहे. मग असे रागानें बोलले कीं, तुम्हांस यावयास एवढा उशीर काय? मग तीं दोन्हीं पतकें पुढें सरून लढाई बहुत केली. त्याजकडील लालखान पठाण सरदार मोठा होता, तो हत्तीच्या हवद्यांत बसून तिरंदाजी करीत होता. हत्ती ठेंगणा होता. विंचूरकर यांजकडील बारगीर सिपाई तरवार मारणारा चांगला होता, त्यानें घोडा पुढें घालून हत्तीच्या आंगाशीं भिडोन, हत्तीच्या हवद्यांतील लालखान पठाण खांसा मोहरा पाडिला. तों इतक्यांत त्यांजकडील वजीरखान पठाण सरदार मोठा होता, तो पुढें दहापांच

स्वारांनिशीं धांवत आला. त्याजवर निळकंठराव रामचंद्र परभू हा पुढें जाहला. आणि वजीरखानास ठार मारिलें. मोठे मोहरे त्यांजकडील दोन पडले, व आमचा मोहरा एक विठ्ठलपंत पडला. इतक्यांत बाबा फडके दहाबारा हजारांशीं येऊन पोंचले. व जिवबादादा व लखोबानाना व विठ्ठलपंत सुभेदार सगळे फौजानिशीं येऊन पोंचले. हें पाहून त्याजकडील असगूलखान सरदार लढत होता तो परतला. पहिली हातघाई तों मागें परतला आणि गोट जेथें थांबला होता तेथें गेला तेव्हां राहिली तोफांचे तडाक्यास बारा पंधराशें मुर्दा पडला.

मग जिवबादादा यांणीं तीनशें तोफांचा खटारा पुढें लाविला, आणि बेवीस हजार नळी पळटणाची उभी राहिली. एक बाजूस हुजुरात मानकरी उभे राहिले. व एक बाजूस विठ्ठलपंत सुभेदार बाणांचा सरमजाम घेऊन उभे राहिले. दिवस सकाळचा सहा घटिका आला. मग तोफा तोफांची लढाई लागली. मग तिकडून गोळे इकडे येऊं लागले व इकडून गोळे तिकडे जाऊं लागले. एकच तडाका तोफांचा उसळला. संध्याकाळचा दिवस सहा घटिका राहिला, एकच मारा जाहला. इतक्यांत त्यांजला वारा सोईचा होता धूर आमचे लष्करांत येऊं लागला. मग भाऊ बोलले कीं, वारा जर कृपा करील तर बरें आहे. मग भाऊंनीं श्रीमंतांचें स्मरण करून वाऱ्याची प्रार्थना केली कीं, महाराजांचें पुण्य आहे तर तूं कृपा कर. असें म्हणतात एक दोन घटिकेंत वारा तिकडे फिरला. धूर इकडे येत होता तो तिकडे जाऊं लागला. मग भाऊंस अवसान आलें. मग भाऊ म्हणों लागले कीं, वाऱ्यानें कृपा केली आतां भीत नाहीं. मग राजश्री सखारामपंत पानसे यांस पुढें बलावून सांगितलें कीं, थोरल्या तोफा तोफखान्याच्या पुढें आणाव्या. पलटणी तोंफांनीं काम होत नाहीं. मग सखारामपंत पानसे यांणीं सतरा तोफा पुढें ओढिल्या. त्या तोफा बहुत मोठ्या होत्या. एक एक तोफेस बैल दोनशें ओढावयास लागत अशा होत्या. त्या तोफा सुरू होत तों अस्तमान जाहला. मग त्या तोफा सुरू जाहल्यावर दणाण झाला. तिकडे अस्तमान होतांच मशाला लागल्या. हवयांचा उजेड पुढें बहुत पडला. मग विठ्ठलपंत सुभेदार यांणीं बाणांचें छत करून सोडिलें. आणि जशी परजन्य वृष्टी होते, त्याप्रमाणें बाणामागें बाण सोडून एकच मार केला. आणि सर्वांनीं एकदांच हरहर

महादेव ! करून एकदांच उड्या घातल्या. मोठी लढाई मातबर जाहली. अशी रात्र प्रहर होई तों मोठी ख्याती लढाईची जाहली. जिवबादादा यांणीं मोठी मर्दुमी केली. माणसें पडलीं त्याची संख्या त्या वेळेस राहिली नाहीं. आमचे तर्फेनें गोविंदराव काळे वकील तिकडे होते, त्यांणीं नबाब यांचे लष्करांत फितूर केला. पठाण चाळीस हजार पुढें तोंडावर लढत होता, तो फितूर होतांच पठाण मागें पाय घेऊं लागले वाय बार करूं लागले. मग नबाब यांणीं पाहिलें कीं, आपले लष्करांत फितूर दिसतो, पठाण तुटून पडत नाहींत. असें पाहून जरिपटका नबाब यांणीं फिरविला. निजामअली याची बुद्धि फिरली. श्रीमंतांचें दैव थोर म्हणोन, ईश्वरीअवतार म्हणून त्या वेळेस यश आलें. नबाब मागें फिरतांच मश्रूलमुल्ख दिवाण पुढें तोंडावर त्यांणीं मागें पाहिलें तों खांसे फिरले, जरिफटका फिरला. हें पाहून मश्रुलमुल्ख फिरले, आणि पळत चालले. आमची फौज आंगावर मारीत चालली तों दोन कोस अंगावर गेली. तोफखाना त्यांचा लुटून आणिला पेंढारी यांणीं त्याजकडील घोडे, राऊत, थकले असें पाहून शेले पागोटीं लुटून घेऊं लागले. पेंढार यांणीं एकच घाई केली. नबाब यांणीं मागें जाऊन खरड्याच्या गढींत खांसे शिरले. आणि जासुदाबरोबर चिठ्ठी पाठविली कीं, "रावपंडित प्रधान जय असे. लढाई महकूब करावी. आम्ही तहाचें बोलणें लावितों, तुम्हीं जें मागाल तें देतों, शरण आहों." याप्रमाणें जासूद, सांडणीस्वार व भालदार बोलावयास आले. मग भाऊ बोलले कीं, हल्ला करून लुटून घ्यावें, पहातां काय ? तों इतक्यांत गोविंदराव काळे वकील त्यांजकडे होते, त्यांणीं चिठ्ठी लिहिली कीं, "नबाब शरण आले त्यांस मरण द्यावयाचें नाहीं. यांचा आपला भाऊपणा आहे. यांणीं या समयास आपल्यावर स्वारी करूं नये. बरें असो. तुम्हीं लढाई महकूब करावी करीत नसल्यास शिक्के कटार पाठवितो." याप्रमाणें लिहिलें वकील यांचें आलें. मग भाऊंनीं लढाई महकूब केली. तो इतकियांत दुसरी चिठ्ठी वकील यांची आली कीं, "लढाई महकूब कराविली खरी, परंतु नबाब हे रोखून बसले आहेत. रात्रीं लढाई महकूब करून सकाळीं पुन्हा लढाईचें तोंड द्यावें असा बेत दिसतो. आपल्यास पाणी नाहीं. डोहो पाण्याचा त्यांणीं राखिला आहे. त्याजकडे सांगून पाठवावें कीं, तुमच्या मनांतून सल्ला करावयाचा असल्यास पाणी आमचें स्वाधीन

करावें. नाहीं तरि आतांच हल्ला या वेळेस करितों." असें सांगून पाठविलें. तों त्याजवरून तो अडला. रात्रीचा विषय पडला. म्हणोन त्यांणीं आपली फौज पाण्यावरून उठविली. मग आमचा कंपू पाण्यावर जाऊन उतरला. मग भाऊंनीं फौजेच्या चार टोळ्या करून त्यांची फौज मधीं घालून उतरले. नबाब खासे मात्र गढींत शिरले होते, फौज दरोबस्त बाहेर होती. नबाब यांचे बरोबर चारण यांचे बैल चाळीसहजार दाण्यांनीं भरलेले होते, ते पेंढार यांणीं लुटून पेशव्यांच्या लष्करांत आणिले. त्यांस दाणा व पाणी नाहीं. लोटाभर पाणी निजामअल्ली यांचे लष्करांत द्यावें आणि एक रुपया घ्यावा व शेरभर पीठ द्यावें आणि रुपया घ्यावा. अशी याप्रमाणें त्यांची अवस्था केली. नबाब याचें तहाचें बोलणें लागलें. तों प्रातःकाळ जहाला.

परशरामभाऊ यांचा पुतण्या विठ्ठलपंत सकाळचे सहा घटिका दिवसास लढाईंत पडला, व भाऊंस जखम लागली त्या वेळेस भाऊंनीं हातचिठ्ठी नानाकडे मागें लिहून पाठविली कीं, "आमचा गळाठा फार आहे, स्वारीची गोष्ट कठीण दिसती." मग नानांनीं चिठ्ठी पाहून नानांचेंही अवसान गेलें. नानांनीं लौकर भोजन करून, प्रस्थान बरोबर घेऊन, सरकारचे व नानांचे मध्यें डेरा पेठे यांचा होता, तेथें प्रस्थान देऊन सरकारचे डेऱ्यास आले. तों श्रीमंत जेऊन उठावयास जहाले होते, इतक्यांत नाना आले. मग देवघरचे राहुटींत गालीच्या टाकून श्रीमंत व नाना व आपा बळवंत व गोविंदराव पिंगळे असे तेथें बसले. आणि नानांनीं भाऊंकडील चिठ्ठी आली होती ती श्रीमंतांस दाखविली, आणि विनंती केली कीं, "येतांना पेठ्यांचे डेऱ्यास प्रस्थान ठेवून निघोन आलों आहों. पुढें सड्या स्वारींत जावयाची आज्ञा असावी. कारण भाऊंचा गळाठा बहुत आहे, म्हणोन जावयाचें." हें बोलणें नानांचें ऐकोन श्रीमंत बोलले कीं, पुढें जाण्याचें कारण काय? संध्याकाळपर्यंत गलिमाचा फडशा होतो, न जाहला तर तुम्ही व आम्ही बरोबरच जाऊं. पुढें जावयाचें कारण पडत नाहीं. संध्याकाळ पर्यंत स्वारी फत्ये होती, संशय नाहीं." महाराजांचें उत्तर ऐकोन नानांनीं विनंती केली कीं, "आपण बोलत नाहीं, भगवान् गोपाळ कृष्ण बोलत आहेत! आपण ईश्वरी अवतार आहांत. आपल्या मुखांतून निघेल तें प्रमाण." नानांचे मनांतून पुढें जावयाचें नव्हतें, परंतु महाराजांचे मुखांतून

काय निघतें तें पहावें. मग श्रीमंत व नाना कचेरीच्या डेऱ्यांत जाऊन बसले. तों इतक्यांत शिंदे व होळकर व भोंसले खांसे अवघे श्रीमंताजवळ येऊन बसले. अवघ्यांच्या डांका सांडणीस्वारांच्या होत्या. घटिके घटिकेची बातमी कळत होती. संध्याकाळ जाहला. मग शिंदे व होळकर व भोंसले जेवावयास जावयाचा निरोप मागूं लागले, मग श्रीमंतांनीं उत्तर केलें कीं, "आज निरोप कोणास द्यावयाचा नाहीं. खांशांनीं अवघ्यांनीं आमचे पंक्तीस जेवावयास रहावें. खाशी मंडळी पंक्तीची असेल ती निवडून बाकी फौजेस निरोप द्यावा. शेवट पर्यंत काय वर्तमान लढाईचें येईल तें पाहूं, नाहीं तर याच पायीं पुढें जाऊं." मग खांशी मंडळी पाहिली तों सहाशें असामी खांसे मात्र राहिले. मग वांकनीस यांस बलावून सांगितलें कीं, स्वयंपाक लवकर करावा. मग वांकनीस यांनीं दहा, पांच आचारी लाऊन स्वयंपाक करविला. तों रात्र सहा घटका जहाली. नंतर भोजन होऊन कचेरीस डेऱ्यांत आले. तों रात्र दहा घटका जाहली. तों इतक्यांत लष्करचें खुशालीचें वर्तमान अकरावीचे अमलांत बाबा फडके यांचा सांडणीस्वार घेऊन आला. फडके यांणीं चिठी लिहिली कीं, "नबाब कोसभर मागें हटले. आम्ही आंगावर मारीत चाललों आहों. पेंढार यांनीं त्यांची खराबी बहुत केली." हें खुशालीचें वर्तमान ऐकून सांडणीस्वारास सोन्याचीं कडीं व पोषाख बक्षीस दिला. पुढें तेरावीचे अमलांत जिवबा दादा यांचा सांडणीस्वार खुशालीचें वर्तमान घेऊन आला. जिवबा दादांनीं चिठी लिहिली कीं, "निजामअल्ली दोन कोस मागें हटले. आणि त्यांचा तोफखाना आम्हीं लुटून आणिला आहे. स्वारी फत्ते आहे." हें ऐकोन सांडणीस्वारास शेराचें कडें सोन्याचें बक्षीस दिल्हें, व पोषाख दिल्हे. पुढें पंधरावीचे अमलांत परशराम भाऊ यांचा सांडणीस्वार खुशालीचें वर्तमान घेऊन आला. भाऊंनीं सकाळची चिठी गलबलीची लिहिली होती, व हल्लीं खुशालीची चिठी लिहिली कीं, "तीन कोस निजामअल्ली मागें हटून खर्ड्याच्या गढींत शिरले, आम्ही आंगावर मारीत गेलों, व तेथें फौजेच्या चार टोळया करून त्यांची फौज मध्यें घालून सभोंवता वेढा देऊन उतरलों. नबाब यांचें तहाचें बोलणें लागलें आहे. स्वारी फत्ये आहे." याप्रमाणें चिठी पाहून घेऊन सांडणीस्वार भाऊंचा आला होता, त्या स्वारास सोन्याचीं कडीं दोन व पोषाख बक्षीस

दिल्हा. मग नानांनीं वांकनीस यास हाक मारून सांगितलें कीं, " साखरेचीं पोतीं आणून साखरा वाटाव्या, व तोफखानाही सोडावा." म्हणोन हुकूम जाहला. मोठी खुशाली जाहली. मग सगळे खासे उठोन निजावयास गेले.

[ खर्ड्याच्या स्वारीची बखर. पृ. ४ ते १६ ]

---

## क्रमांक १८ : : हरिवंशाची बखर

### १. 'ध' चा 'मा'

६७. पुढें श्रीमंत नारायणरावसाहेब राज्याधिकारी, परंतु श्रीमंत दादासाहेब कारभारांत पुढें जाहले. श्रीमंत रावसाहेब यांचे वेळेस जे बंदींत होते ते सारेच पुढें सरले. सखारामपंतबापू हे दिवाण श्रीमंत रावसाहेब यांचे वेळेस बंदींत होते ते श्रीमंत दादासाहेब यांच्या लक्षानें वागणार. याप्रमाणें सारी सृष्टि नवी जाहली. श्रीमंत नारायणरावसाहेब मुजऱ्याचे मात्र धनी. सारा कारभार श्रीमंत दादासाहेब करीत. याप्रमाणें नऊ महिने सुरक्षित गेले. श्रीमंत रावसाहेब यांनीं सांगितलेंच होतें कीं, याचे कपाळीं राज्य नाहीं; तोच समय प्राप्त जाहला. पुढें श्रीमंत दादासाहेब यांची कन्या दुर्गाबाई हिचें लग्न जाहलें.

६८. श्रीमंत नारायणरावसाहेब हूड होते. कारभारी यांचा बहुमान रक्षीत नसत. एके दिवशीं पर्वतीस स्वारी गेली तेथें सारे बोथाट्या खेळत होते. याप्रमाणें खेळ खेळत असतां श्रीमंतांनीं नाना फडणीस यांचें पागोटें बोथाटीनें पाडिलें, आणि हंसूं लागले जे, नाना, तुमचें पागोटें खालीं पडलें. तेव्हां नानांनीं उत्तर केलें कीं, मी कारकूनच आहें. माझें पागोटें पडलें हें कांहीं आश्चर्य नाहीं. स्वामींनीं आपलें पागोटें संभाळावें! असें उत्तर केलें. परंतु नानांनीं सूचना केली हें कांहीं समजलें नाहीं! सूचना कोणती तर, कांहीं सखारामबापूसीं श्रीमंत दादासाहेब यांचें खलबत जाहलें, यांत श्रीमंत नारायणरावसाहेब यांस कैद करावें असें ठरलें. ती सूचना नानांनीं श्रीमंतांस

या प्रकारें केली, परंतु त्यांच्या समजुतींत आली नाहीं. श्रीमंतांजवळ हरिपंत फडकेही होते, परंतु केवळ राजकारणांत पडत नव्हते. श्रीमंत रावसाहेब यांनीं एकांतीं श्रीमंत नारायणरावसाहेब यांस सांगितलें होतें जें, काय करणें तें हरिपंत याचे विचारें करीत जा, तर कांहीं दिवस वांचशील नाहींपेक्षां तुझ्या जिवास कठिण आहे; असा बहुत बोध केला होता. कांहीं कांहीं विचारीत. कोणती गोष्ट पोटांतही फारशी रहात नव्हती, यामुळें हरिपंत फारशी लगट करीत नव्हते.

६९. तों फितूर जाहला जे, यांस कैद करावें. त्यास सुमेरसिंग गाडदी व खरकसिंग गाडदी हे उभयतां पांच हजार गाड्यांचे जमातदार, त्यांस सांगितलें जे, श्रीमंत नारायणरावसाहेब यांस तुम्हीं धरावें; म्हणजे तुम्हांस बक्षीस गांव इनाम वगैरे मिळतील. त्यांनी उत्तर केलें कीं, आम्हांस दस्तऐवज करून दिला तर आम्ही हा उद्योग करूं. असें म्हणतांच श्रीमंत रघुनाथराव दादा-साहेब यांनीं दस्तऐवज करून दिला जे, नारायणराव यांस धरावें, नंतर तुम्हांस अमुक बक्षीस देऊं. असें नाना प्रकारें लिहून दिलें. तों आनंदीबाई रघुनाथराव दादा यांची पत्नी, तिनें गाड्यांस बोलावून सांगितलें जे, तुम्हांस धरावें असें लिहून दिलें; त्यास धरिलें असतां पुढें कांहीं लोक तिकडे, कांहीं इकडे, असें होऊन राजकारण उभें राहील. त्यास मारून टाकावें हेंच बरें, म्हणजे एकछत्री जाहलें! असेंच करावें. नंतर गाडदी यांनीं उत्तर केलें कीं, आपण 'धरावें' असें लिहून दिलें आणि मारावें कसें? तेव्हा आनंदीबाईनीं सांगितलें कीं, तुम्हांस मारावें असें लिहून देतें. तुमचा कागद कोठें आहे तो आणवावा. नंतर त्यांनीं कागद आणून दिला; तेथें 'धरावा' जें होतें तें तेथेंच 'मारावा' असें करून दिलें. 'ध'चा 'मा' केला. नंतर सारा मजकूर ठीकच होता!

७०. याप्रमाणें बंदोबस्त करून जे दिवशीं मारावयाचें, तेच दिवशीं श्रीमंत गांवांतच पुणें मुक्कामीं सासुरवाडी होती तेथें भोजनास सहकुटुंब गेले होते. इकडे वाड्यांत नाकेबंदी होऊन तलब चढली म्हणोन गाडदी जमा जाहले. श्रीमंत सासुरवाडीस भोजन करून विडे घेतात तों कोणी सूचना केली कीं, आपण वाड्यांत जाऊं नये. कांहीं दंगा फितूर आहे, त्यास कृपा करून वाड्यांत जावयाचें करूं नये तेव्हां त्याजवर रागें भरले आणि

तसेच पालखींत बसोन वाड्यांत आले. आणि तिसरे मजल्यावर खबूतरखाना होता. तेथें अम्मळ उभे राहिले. तों उभयतां गाडदी तेथें आले आणि विनंति केली कीं, महाराज! आमची तलब चढली याची वाट काय? आमचा रोजमुरा फडशा करून द्यावा. श्रीमंतांनीं आज्ञा केली कीं, तिसरे प्रहरीं कचेरीस विनंति करावी. नंतर काय जी आज्ञा व्हावयाची ती होईल. गाडदी यांनीं उत्तर केलें कीं, आम्हांस कचेरीची काय गरज! आपण धनी. आपण फडशा करावा. तों श्रीमंत तेथून खालीं येऊं लागले. तों जिना उतरतांनाच गाडदी यांनीं लगट केली कीं, आम्हांस येथें ऐवज द्यावा; नाहींपेक्षां आम्ही उतरूं देणार नाहीं. तों इच्छारामपंत ढेरे म्हणून कारकून होते ते गाड्यांस रागें भरले जे, असा दंगा केल्यानें ऐवज मिळतो कीं काय! असें उचलून बोलतांच त्यांनीं तलवारी ओढून इच्छारामपंतास ठार मारिलें. तों श्रीमंत जिना उतरून खालीं आले. तों चौकांत पूजेच्या गाई दोन बांधिल्या होत्या त्या गारद्यांच्या नागव्या तलवारी पाहून बुजाल्या आणि दावीं तोडून गारद्यांच्या अंगावर आल्या. तों तेथें फुरसत सांपडली. नाहीं तर तेथेंच श्रीमंतांस मारावें असें होतें. गाई आडव्या येतांच गाड्यांनीं तलवारीनें गाई ठार मारिल्या! तों श्रीमंत पार्वतीबाईचे खोलींत गेले, आणि सांगितलें कीं, काकी, मला गाडदी मारितात तेव्हां पार्वतीबाई बोलली कीं, मी तुला लपवितें. तूं कांहीं भिऊं नको. आणि तुला मी पारही करितें. असें म्हणाली. तों श्रीमंतांनीं उत्तर केलें कीं, मी दादासाहेब यांजकडे जातो. असें म्हणून तेथून निघाले. तों गाडदी यांनीं गांठिले तों तेथें कुणबीण होती ती आडवी जाहली. तिलाही ठार केली. गारद्यांस खून चढला. तों दादासाहेबांजवळ श्रीमंत जाऊन कमरेस मिठी घालून बोलले कीं मला मारूं नका. किल्ल्यावर कैद करून पीठमीठ लावून ठेवा! मारूं नका! असें दीन वचन बोलले तेव्हां दादासाहेबांस दया आली. तों गाडदीही तेथें आले. आणि बोलले कीं, आतां आम्ही यास जिवंत सोडणार नाहीं. हा वांचल्यास आमचीं रांडापोरें डाणकास वांटील! सर्पास दुखवून सोडितों कीं काय? असें म्हणतांच दादासाहेब म्हणाले कीं, अरे, बाळास मारूं नका! असें म्हणून हात पुढें केला. तों आंत खोलींत तेथेंच आनंदीबाई होती तेथून दादासाहेब यांस म्हणाली कीं, "आतां कांकणें हातांत घाला" असें म्हणून गाड्यांस सांगितलें कीं,

उभयतांस मारून टाका!!! तों गाड्यांनीं एकवार टाकिला तो दादासाहेब यांचे हातास लागला. तों तुळ्या पवार आनंदीबाईचा खिसमतगार होता त्यानें श्रीमंतांचे पायांस धरून दादासाहेब यांचे कमरेपासून ओढिलें. तों चाफाजी टिळेकर श्रीमंत माधवरावसाहेब यांचा खिसमतगार तसाच श्रीमंतांवर पडला. तों गाडदी यांची तलवार चालली तेथें कांहीं बाकी राहिली नाहीं! उभयतांचे तुकडे एके ठिकाणीं जाहले. श्रीमंत साखरभात भोजन करून गेले तो पोटांतून तसाच पडला! हें कृत्य रघुनाथरावदादा यांचेसमोर जाहलें. गर्दी जाहली तो दिवस शके १६९५ भाद्रपद शुद्ध चतुर्दशी. याप्रमाणे जी गोष्ट न व्हावयाची ती झाली.

७१ नंतर गाडदी याणीं वाड्यावरून रघुनाथराव यांची द्वाही फिरवून 'दीन्' गाजविला. तों श्रीमंत गंगाबाईसाहेब पालखींत बसून वाड्यांत आली. तों बाहेर हांक जाहली कीं गाडदी वाड्यांत शिरून गाड्यांनी दंगा केला. असें म्हणतांच हुजरातीचे लोक व पागे तमाम फौजा तयार होऊन आल्या. गाडदी यांनीं दिल्ली दरवाजा लाविला. पानसे यांनीं तोफखान्यांतून तोफा ओढून आणून म्हणाले जे, वाड्यास तोफा लावून वाडा उडवून देतों! गाडदी यांनीं वरून सांगितलें जे, जी व्हावयाची ती गोष्ट सरकार हुकुमावरून जाहली. आतां तुम्ही आक्रोश कां करतां? आतां सरकारच्या पायापाशींच लक्ष ठेवा!

७२ याप्रमाणें वरून बोलतात तों त्रिंबकरावमामा हातांत भाला आणि घोड्यावर बसोन आले, आणि बोलले कीं काय पहातां! ××××× ना तोफेचे तोंडीं द्या! असें बोलतांच गाड्यांनीं वरून मामास मुजरा करून बोलले कीं, मामासाहेब, आपण पुढें येऊं नये. आला असतां गोळी घालूं! आपण सडे आंत यावे. असें म्हणतांच घोड्यावरून उतरून पाय उतारा दिंडींतून मामा आंत गेले. ते रघुनाथराव दादाजवळ गेले तों मारलेले मुडदे गाशांत गुंडाळून आंत खोलींत ठेविले होते. तों रघुनाथरावदादा बोलले कीं, मामा, माझ्या कपाळास ही गोष्ट आली! आपण आंत जाऊन पहावें. त्रिंबकरावमामा यांचे मनांत नारायणराव जखमी असतील, असें वाटून आंत जाऊन पहातात तों फक्त मांस राहिलें! नंतर तसेंच बाहेर येऊन रागानें रघुनाथरावदादा यांचे तोंडापुढें हात नेऊन बोलले कीं, श्रीमंत बाजीराव-

साहेब यांचे पोटीं पोरगी जन्मास आला असतास तर एक्या ब्राह्मणाचें घर उभे राहतें! हें काय केलेंस!!! असें म्हणतांच दादासाहेब कपाळास हात लावून उगेच राहिले. आणि मामास म्हणाले कीं आतां पुढें याचे दहनाचा विचार करावा. मामा बोलले कीं, अरे दहन कशाचें करितोस? मलाही मारून टाक म्हणजे झालें! तुझ्या घरीं ब्राह्मण कोण येतो? दहन कोण करितो? असें अनेक प्रकारें बोलले. रघुनाथरावदादा परम पुण्यवान्, स्नान संध्याशील, परंतु स्त्रीचे योगेंकरून अनर्थास पावून अपेश माथां घेतलें. पूर्वीही राज्यनाशास कारण स्त्रीच. तसेंच आतांही जाहलें.

७३ तों प्रहररात्र जाहली. ब्राह्मण कोणी मिळेनात. परंतु प्रयत्नानें तैलंग ब्राह्मण दोन असामी मिळाले. नंतर मशाल लावून ते तुकडे निवाडिले. शूद्राचे एकीकडे काढून हे तुकडे ब्राह्मणांजवळ दिले. तों गाडदी कांहीं दरवाजा उघडीनात! नंतर दिंडींतून प्रेत बाहेर काढिलें. तों श्रीमंत गंगाबाईसाहेब यांनीं आग्रह केला कीं, मी सहगमन जाणार. होणार बलवत्तर! श्रीमंतांचा उदयकाळ होऊन सर्वांचीं पारिपत्यें करून प्रजेस सुख द्यावयाचें होतें, यामुळें अकस्मात् आनंदीबाईचे मुखांतून आलें जे जातीस कोठें? तुझी पाळी चुकली आहे! तेव्हांच वाग्देवता 'तथास्तु' म्हणाली! याप्रमाणें मागें वर्तमान जाहलें. नंतर प्रेत बाहेर काढून अग्निसंस्कार त्रिंबकरावमामानीं करविला! तो संस्कार त्रिंबकरावमामानीं म्हणून करविला! नंतर मध्यरात्रीचे सुमारास पागे पतके सारे निराश होऊन माघारे आले. पानसे यांनींही तोफखाना माघारा नेला. एक गाडदी खेरीज करून बाकी सारी फौज अगदीं दिलगीर जाहली. सर्वांचे मनांतून जे, रघुनाथराव यांचे पाय भुईस न लागत येविशीं प्रयत्न करावा.

७४ पुढें दुसरे दिवशीं गांवांतील शिष्ट ब्राह्मण बोलावून विचार आरंभिला जे, कांहीं प्रायश्चित करावें, म्हणून जमा करून रामशास्त्री यांस बोलावून आणिलें. तों हें वर्तमान होतांच शास्त्रीबावा यांनीं आपलीं मुलें माणसें माहुलीस रवाना करून आपण हातांत पंचपात्र घेऊन सोंवळयानीं वाड्यांत आले. तों रघुनाथरावदादा कचेरीस बसले आहेत. तों शास्त्रीबावा येतांच श्रीमंतानीं नमस्कार केला. तेव्हां शास्त्री बोलले कीं, नमस्कार न करणें तुम्हांस अशौच आहे. असें बोलतांच वरकड पंडित म्हणाले कीं, शास्त्रीबावा, आपणास यजमान यानीं बोलाविलें जे, गाडदी यांचे हातून हें कर्म जाहलें; परंतु शब्द-

दोष श्रीमंतांवर आला, त्यास कांहीं प्रायश्चित करावें; यामुळें आपणास बोलविलें. तेव्हां शास्त्रीबावा म्हणाले कीं, प्रायश्चित कशाचें करतां व कोणास देतां? ब्रह्महत्या, गोहत्या, स्त्रीहत्या, बालहत्या जेथें जाहल्या तेथें कोणतें प्रायश्चित पुस्तकांत लिहिलें आहे? एक प्रायश्चित. यांस देहांत प्रायश्चित करावें! शिसें तापवून प्राशन करावें, किंवा दर्भाचें गृह करून आंत बसावें आणि अग्निसंस्कार करावा. यांतून वांचल्यास पुढें प्रायश्चित करावें. असें म्हणतांच सारे पंडित बोलले शास्त्रीबावा, आपण असें काय म्हणून बोलतां? हे बोलले कीं, मला यांचे राज्यांत कांहीं रहावयाचे नाहीं. तुम्हांस रहावयाचे असेल म्हणून तुम्हीं ग्रंथाखेरीज भाषण करतां! मी माणसें रवाना करून सोंवळयानीच आलों. मी असाच निघणार. कालपासोन जलस्पर्श देखील नाहीं केला! मी जीवित्वास उदार जाहलों. मर्जी असल्यास आणखी एक ब्रह्महत्या करावी! याप्रमाणें शास्त्रीबावा बोलतांच कोणी एक बोलेनासे जहाले. शास्त्रीबावा तसेच निघोन माहुलीस आले, नंतर अन्नव्यवहार केला! मागें कांहीं प्रायश्चित केलें नाहीं.

[ हरिवंशाची बखर, कलम ६७ ते ७४ ]

---

# क्रमांक १९ : : मराठी ऐतिहासिक शिलालिपि



### १. चिताऱ्यानें सुरत लिहून नेली

त्यानंतरें दिल्लींद्र अल्लीयदिल्शाहा उभयतानीं शिवाजीराजाचे वर्णना केली जे–राजा स्वतेव शूर, भाला, वर्ती, तरवार वगैरे सकला युद्धांचे हातही राजास चांगले कळताहेत. भाल काठीचे आयुधहीं नूतन येक कल्पविलें. दुसरे आपण श्रीमंत होऊन दरयेक कामें आंगें कडून प्रयासाचेंहीं करणें. याखेरीज सकल जनरंजक अतिशय बुद्धिवंत धैर्यवंत हीं राज्यकरणाराचीं अंगें साम, दाम, भेद, दंड, हीं चारी प्रयत्नेहीं समय जाणून करणारे आणि जे

साधारणें कडून कैशा प्रबल कार्यातेंहीं अतिश्रमें कडून कार्य जाणूनहीं आणि करणारहीं व परम नीतीवंतहीं आणी दयावंतहीं शरणागत संरक्षणहीं नीट करितो. रूपौदार्य गुणेंकडूनहीं पूर्ण आहे. या इतुक्या गुणेंकडूनहीं वरिष्ट आहे. ते मात्र नव्हे. ईश्वरवरप्रसादहीं येणेकडून भलत्याठायीं अनेक निधी सांपडताती. शत्रूच्या लाखो फौजा मध्ये राजाकडील सैनीक स्वल्पजन जेथून हरहर महादेव म्हणून शब्द करून येऊन पडतांच परसैन्य समग्र वाताहत होऊन जातें. ऐशा राजास जिंतणें असाध्य बरें, स्नेहानें आप्त होऊं म्हणालियां तेणेंकडून आपल्यास लाघवहीं आहे. दुसरें तेव्हां प्रयासकरितां या राजाचे वाटे जाऊन रणें करून आपला फौजेचा व द्रव्याचा नाश न करितां उगाच आपुले ठांयीं असणें बरें म्हणून अलीयदलशाहा व अवरंगजेबहीं आपले ठांयी स्वस्थ राहिले. तेव्हां दिल्लेश्वर ऐशे अवरंगजेबानी फौज सन्नहाकरून शिवाजी-राजावरी अपणच युद्धास जाणें म्हणून निघाल्या समयीं आपले फौज समग्र शिवाजीराजाचे पराक्रमें भयें कडून मग्न आहेत. ही पाहून मनीं कांहीं खिन्नशा व आपल्या फौजेवरी रागहीं धरून चालेकरून जातेवेळेस येक्याप्रदेशी नदींत आपण बसल्या खास घोड्यास आपणच अनालस करून पाणी पाजविलें. तेव्हां तो घोडा एकदम्म पाणी पीवून परतून दुसरेंदा पिणेस तोंड पाण्यासमीप नेतेसमयीं उसळून पाण्यास आलीकडे कांठावरी येऊन परतून पाण्याकडे पाहिनासे झाला. तेव्हां बाच्छाई वरी होते. त्यानी सांभाळून बसून आपल्या घोड्यास पाहून येथेंहीं शिवाजी आला काय कां घाबरा झालास म्हणून फौजेकडे पाहिले. तरी त्याफौजेचे चित्तहीं व्यग्र जाणून तेथेंच मोकाम करून शिवाजी राजास जीत धरून पहावें म्हणून अनेकप्रयासें केले. परंतू साध्य जाहले नाहीं करितां त्यांचा सुरत तरी लिहून आणून पाहावी म्हणून योग्य ऐशा चितार्‍यास पाठविले. आपण तेथून कूचकरून मुरडून स्वस्तळास पावले. त्या चितार्‍याने येऊन बहुत दिवस समय पाहिला परंतु राजाची रीत, देश, सांपडण्याचे आयासाकरितां राहिल्या स्थळी राहणे नाहीं. येका देशावरी जाताहेत म्हणून राखून असते वेळेस पलीकडें एक प्रदेशीं वीसगावें, तीसगावें, भोई वरी आहेत म्हणून ऐकणें. तेथें जाऊन पावतोरी आणखी कोठेंकीं वर्तमान कळणें नाहीं अशांत शिवाजीराजानी अमुकादेश बांधिला, आमुके राज्य बांधिले, अमकी ठाणी ठेविले, पलीकडें अमुक्या राज्यावरी

चाली केले ऐसें ऐकणे मात्र परंतु राजे दृष्टिपथास येईनात. ऐसे अनेक दिवस फिरत असतां येक्या दिवशी मोहिमेचे वेळेस या व खळक अनेक पुढे ओढणे. िनखळ स्वार मात्र तीनिलक्ष स्वार जमाव निशीसी शिवाजीराजे राज्यसाधण्याचे कार्योद्देशेंकडून त्वरेने जाणार अशास त्या चितार्‍याने पाहिलें. तेंव्हांचा अवसर शिवाजीराजे भल्या घोड्यावरी स्वार होऊन शिरीं मुंडास, माजांत माजचोळना, जोडे, छत्री, पासोड्याची पंचगी, वाछण, हातीचा माला, खांद्यावरी ठेवून मस्तकाने दाबून घेवून जोंधल्याचे शेतांत जाणार हाती जोंधल्याचे कणीस घेऊन दोन हाताने ते कणस चोळून फकरामारून त्याचा भुलटा घोड्यांचे तोंडांत देत होते. तैशा अवसरांत चितार्‍यानें पाहून त्याचरीति सुरत लिहून नेवून औरंगजेबापासी दिल्हा. ते पाहून आश्चर्य मानिले जे शिवाजीराजा नीतीने लक्ष स्वाराचा सरदार श्रीमंत तसा राजा कार्य साधणेच्या तात्पर्यास्तव येकेठायीं उतरून न्याहरी करावयाचा विळंवनांत कार्यनासून जाईल म्हणूनहीं जवळील सरदार आपल्या मनोगतानुसार कार्यकरणेस खोळंबतील म्हणूनहीं जोंधळ्याचे कणस चोळून खावून त्याचा भुलटा घोड्यासहीं चारिणार्‍या राजाचा हुशार आणी प्रयासीराजा साजणार. कोणत्या विषयीं प्रयास करिणे व्यर्थ म्हणून दृढ मानून स्वस्त राहिले.

[पृ. ५०–५२]

## २. येकोजीराजे तंजावर किल्ला प्रवेश केले

येकोजीराजे बेंगळूरीं राज्यभार करीत असतांना तंजावूर राज्यांत राज्य करणार नायडकूटानी त्रिचनापल्लींत राज्य करणार नायडकूटासीं बिगाड पडून तिरचनापल्लीचे नायड बलवंत झाल्याकारितां त्यांकडून आपले राज्य अपहृत होईल म्हणून दृढ मानून त्या त्रिचनापल्लीच्यानी तंजाउरच्या किल्ल्यावरी युद्ध करीत असतां निर्वाहनाहीसें विजापुरास अल्लीयादिल्शाहा बाच्छाईकडें हेजिबास पाठविले. त्याने जाऊन खादार एक खलासखान व अबदल्हलीम या दोघे वजीरांस अनसरून त्यांच्या गुजराताने बाच्छायाची भेटी घेवून आपुले यजमानाचा हवाल जाणविले. तेंव्हां अल्लीयदिल्शाहानी या खादारऐक खलास व अबदुलहलीमासच कुमुकेस जा म्हणाले. त्यांनी अपली फौजच

पुरना अणखी कुमक पाहिजे म्हणालयाकरितां एकोजीराजे बेंगळूरी होते त्यांस दस्तक देऊन त्यांसहीं बरोबरी घेऊन जा म्हणाले. तैसेंच तें उभयतां वजीर बेंगळूरास येऊन एकोजी राजाची भेटी घेऊन दस्तक दिल्हे. राजानी ते दस्तक मानून या उभयतां वजीराशी घेऊन तंजाउरचे वकीलहीं येकोजी-राजास कुमुकेस्तव प्रार्थना केले. तेंव्हां येकोजीराजे सकळ सन्नाहानिशीं कुमुकेस येताना वाटेस आरणीचें राज्य साधून वेदाजीभास्कर यास आरणीचे किल्लयांत ठेऊन तंजाउरास येऊन त्रिचनापल्लीच्यांसी 'युद्ध करून त्यासीं पळवून तंजावुरच्यास मोकळीक करून आपण बेंगळूरास प्रयाण होउन तिरुमलवाडींत राहिले. तेंव्हां त्यांची स्त्री दीपाबाईसाहेब पूर्णगर्भिणी समागमें होते. येकोजीराजे तिरमलवाडीस उतरलें तेंव्हां दीपाबाई साहेबास प्रसवकाल होऊन येकोजीराजास द्वितीय पुत्र शक १५९६ राक्षस संवत्सरीं तिसरे शरफोजी राजे जन्मले. तेंव्हां येकोजीराजास स्वप्नांत देवानी येऊन सांगीतलें जें " तुम्ही तंजावरचें राज्य सोडून जावू नका. तुमचे वंशा परंपरेने हे राज्य भोगावें यास कारण आहे. उद्या पाहाटे तुम्हास संविधान येईल " म्हणून सांगीतले. तैसेंच दुसऱ्यादिवसीं तंजांवरांतून योग्या योग्य चर्चामुळें येकास येक भेद पडून अमात्यपण करणारहीं बिगडून तिरमल्वाडींत होते त्या येकोजीराजांस तुम्ही हे राज्यपरिपालन करावें म्हणून प्रार्थिले. ईश्वर संकल्प टाळतां नये म्हणून अंगीकार करून येकोजीराजे तंजावर किल्ला प्रवेश केले हे पूर्वोत्तर पुढें विस्तारे कडून तंजावूरप्रांती या राजवंशाचेराजे राहिले.

[पृ. ५४-५५]

# टीपा

## क्रमांक १ : : महिकावतीची बखर

महिकावतीची उर्फ माहिमची बखर ही आजवर सांपडलेल्या सर्व बखरींत अत्यंत जुनी बखर आहे. मात्र ती एक बखर नसून निरनिराळ्या सहा बखर-वजा गद्यपद्य प्रकरणांचा समाहार आहे. तसेंच हीं प्रकरणें निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या व्यक्तींनीं लिहिलेलीं आहेत. प्रकरण एक व प्रकरण चार ओवीपद्यांत असून तीं भगवान् नंद दत्तनामें कोण्या पुरुषानें लिहिलीं आहेत. बखरींतील अंतर्गत पुराव्यावरून असें दिसतें कीं, भगवान् दत्ताला प्र. २-३ आणि ५-६ अशीं चार प्रकरणें मिळालीं, आणि त्याला असें दिसलें कीं, प्रकरण दुसरें व तिसरें मिळून एक स्वतंत्र हकीकत आहे आणि प्रकरण पांचवें व साहावें मिळून दुसरी स्वतंत्र हकीकत आहे. पहिल्यांत महिकावतीच्या राज्यांतील सर्व कुळांची श. १०६० पासून वंशपद्धति होती व दुसऱ्यांत प्रामुख्येंकरून पाठारे प्रभूंची वंशपद्धति दिली होती. या ज्या दोन स्वतंत्र हकीकती वा बखरी भगवान् दत्ताच्या हातीं पडल्या, त्याला त्यानें एकेक पद्य उपोद्‌घात् जोडला. याप्रमाणें प्रकरणें १,२,३ मिळून एक बखर बनली आणि प्रकरणें ४,५,६ मिळून दुसरी बखर सजली. राजवाड्यांच्या मतें भगवान् दत्ताच्यानंतर आणखी एक अनामक संहिताकार आला व त्यानें पहिल्या व दुसऱ्या बखरींत एकच धागा आहे असें मानून, या दोन्ही बखरी एकापुढें एक लावून, जणूं त्यांची एक बखर बनविली. आज उपलब्ध असणारी 'महिकावतीची बखर' ती हीच होय.

वस्तुतः प्रकरण दोन आणि त्याला परिशिष्ट म्हणून जोडलेलें प्रकरण तीन यांतील हकीकत म्हणजेच खरी महिकावतीची बखर होय. प्रकरण दोनचा कर्ता केशवाचार्य. त्यानें मालाडचा तत्कालीन देसला नायकोराव याच्या सांगीनें श. १३७० मध्यें ही प्रकरण दोनमधील हकीकत लिहिली. तिचें तो जें कारण सांगतो, तें मोठें हृदयद्रावक आहे. सर्व कोकणप्रांत म्लेंच्छार्णवाखालीं बुडाल्यामुळें सर्वत्र भ्रष्टता माजून महाराष्ट्रधर्म बुडाला होता. तेव्हां श्रीदेवी

कुळस्वामिणीनें 'धर्म माहाराष्ट्र रक्षाया कारणें राजश्री नायकोरायास स्वप्न दिल्हें' कीं केळव्यापासून मुंबईपर्यंत सर्व गांवचे, सर्व जातींचे व सर्व गोत्रांचे खलक जमवून त्यांस केशवाचार्यांच्या मुखें महाराष्ट्रधर्म सांगीव. नायकोरायानें केशवाचार्यांच्या संमतीनें मालाड उर्फ म्हालजापुर येथील जोगेश्वरीचे देवळांत जमलेल्या भव्य समुदायापुढें राजा बिंबापासूनची वंशपद्धति कथन करून महाराष्ट्रधर्माचें निरूपण केलें. ह्या बखरीच्या रचनेचा वृत्तांत हा असा; आणि बखररचनेचा काळ श. १३७० मधील फाल्गुन मास.

प्रकरण ५ व ६ पैकीं ६ वें प्रकरण आधीं, म्हणजे श. १४०० मध्यें लिहिलें गेलें व त्यानंतर ६० वर्षांनीं ५ वें प्रकरण लिहिलें गेलें असावें असें राजवाड्यांचें अनुमान आहे. प्रकरण ५ चा कर्ता अनामक असून ६ चे कर्ते नायक व कावळे असे आहेत. बखरीच्या (६ व्या प्रकरणाच्या) अखेरीस संवत् १५३५ म्हणजे श. १४०० असा लेखनकालहि नमूद केला आहे.

१. केशवदेव येशवंत जाला.

हा उतारा प्रकरण दोनमधील आहे. मही बिंबाच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र केशवदेव लहान पांच वर्षांचा असल्यानें राणी कामाई इजकडे राज्य चालविण्याची जोखीम आली. येथपासून तों भैसेदुर्गाचा राजा जाश्वद्या उर्फ जसवंतसिंग याचा केशवदेवानें पराभव केला, तेथपर्यंतची हकीकत आहे. राणी कामाईविषयीं प्रधानाला पापवासना उत्पन्न झाल्यामुळें निर्माण झालेला प्रसंग व पुढें केशवदेवास राज्याभिषेक झाल्यानंतर धारचंपावतीच्या भोजराजाशीं त्याचें झालेलें युद्ध हे दोन प्रसंग या उताऱ्यांत बखरकारानें वर्णिले आहेत.

पृ. १ **राजा बिंब**—माहिमदेशाचा राजा प्रतापबिंब याचा पुत्र मही बिंब. मही बिंबानें श. १०६९ पासून श. ११३४ पर्यंत राज्य केलें.

**कामाई**—मही बिंबाची उतारवयांतील शेवटची व तरुण पत्नी.

**केशवदेव**— मही बिंबाचा पुत्र.

**भोज**— धारचंपावतीचा राजा.

**पितामोहो येसि गद्यपद्य म्हणता जाला**—आसपासच्या लहानसाहान संस्थानिकांचा आजा अशा अर्थाचे बडेजावीचे पोवाडे केशवदेवाचा भाट संस्थानिकांचा राज्यांतून गाऊं लागला.

तत्कालीन पोवाडे हे संस्कृतमधील चंपूकाव्याप्रमाणें गद्यपद्य अशा दुहेरी स्वरूपाचे असत. महाराष्ट्रांतील पोवाड्यांची परंपरा किती जुनी आहे हें या केशवदेवावरील पोवाड्यावरून दिसतें. राजवाडे यांच्या मतें पोवाडा हें एक प्रकारचें दृश्य नि श्राव्य असें नाटक आहे. "त्यांत अनेक पात्रें असतात. मुख्य शाहीर व त्याचा साथीदार हे दोघे पोवाड्यांतील व्यक्तींच्या सोंगांची बतावणी करतात. मुख्य पात्राची बतावणी मुख्य शाहीर किंवा गोंधळी तर करतोच, पण त्याहूनहि अधिक काम शाहीर करीत असतो. नाटकांत ज्याला सूत्रधार म्हणतात...त्या सूत्रधाराचेंहि काम तो करतो. बतावणीचें व कथानकाचा धागा शाबूत ठेवून कथेचें तात्पर्य तिऱ्हाइतपणें सांगण्याचें काम शाहीर उर्फ सूत्रधार कांहीं गद्यांत करतो व वीरश्रीचा अतिरेक झाला असतां एकदम पद्याच्या वातावरणांत उड्डाण मारतो. वीरश्रीचा संचार होऊन जे वृत्तमय बोल शाहीराच्या मुखांतून प्रतिभेच्या विकसनानें अनिवारपणें प्रसवूं लागतात ते बोल पोवाडानामक चंपूकाव्यांतील पद्य होय." (महिकावतीची बखर-प्रस्तावना, पान ३८) शाळिग्रामांनीं (व त्याच धर्तीवर नंतरच्या संशोधकांनीं) छापलेले पोवाडे केवळ पद्य असल्यानें अपूर्ण आहेत हें राजवाड्यांचें विधान या संदर्भात विचार करण्यासारखें आहे.

**दळवै बोलाविला**— दळवैय्याला बोलाविलें

**आज्ञा दिधली जर सेना सिद्ध करावी**— 'जर' शब्द 'कीं' या अन्वयार्थी सरसहा या बखरींत योजिला आहे. त्याच अर्थी 'जे' शब्दहि क्वचित् येतो.

पृ. २ **तो सिंध्याहि वारिला**— त्याला सिंध्यानें मागें ओढलें.

**वाहते यंत्र आळा दिधला**— वाहतें यंत्र = वाहन, रथ;
आळा दिधला = अलंकार दिला.

**येकसार**— ग्रामविशेष.

**जश्वद्यान घेतले**— जश्वद्यानें (जसवंतदेवानें) घेतलें.
'न' हा तृतीयेचा प्रत्यय आहे.

उदा.—'मग अधिकारियान देसायाला हंकारा केला.' 'त्याचें वृत देसल्यान काढली.'

**नाथ फोडावी**— दरवाजाचा अडसर फोडावा.

पृ. ३ **नाथ पडे**— अडसर पडे.

२. माहाराष्ट्रधर्मरक्षिका ॥ तुम्हा सुप्रसंन्न असो ॥

हा उतारासुद्धां प्रकरण दोनमधीलच आहे. नायकोरावाच्या आज्ञेनें केशवाचार्यानें महाराष्ट्रधर्माचें निरूपण ज्या प्रसंगीं केलें त्या प्रसंगाचें व महाराष्ट्रधर्माचें वर्णन प्रस्तुत उताऱ्यांत आहे. महाराष्ट्रधर्माचा प्रथमोच्चार केशवाचार्यानें केला. कारण त्या वेळीं ' खल्लक सैनिक ईनामक सर्व रईत अजम शेख अल्लावदिनाची जालिं ' होती. क्षत्रियांनीं राज्याभिमान सांडला, शस्त्रें सोडलीं कृषि धरली; सोमवंशीयांनीं कारकोणी व गांवखोती पत्करिली; शिंदे वतनें सांभाळून यवनाची सेवा करूं लागले; आचारहीन जाले; गोत्र, प्रवर, कुळस्वामीण, कुलगुरु यांस विसरले; म्हणून केशवाचार्यानें त्यांना एकत्र जमवून प्रवृत्तिप्रधान महाराष्ट्रधर्म सांगितला. केशवाचार्यांच्या मतें महाराष्ट्रधर्म म्हणजे महाराष्ट्र देशाचा धर्म नसून महाराष्ट्रिक लोकांचा उर्फ मराठा लोकांचा धर्म आहे. म्हणजे येथें महाराष्ट्र शब्द देवधर्मवाचक नसून कर्तव्यवाचक आहे. केशवाचार्यानंतर रामदासांनीं श. १५७० च्या सुमारास महाराष्ट्रधर्माचा पुनरुच्चार केला. अव्वल इंग्रजींत न्यायमूर्ति रानडे व राजारामशास्त्री भागवत यांनींहि महाराष्ट्रधर्मासंबंधानें लेखन केलें. रानडे या महाराष्ट्रधर्मांत देवधर्मवाचक अर्थ पाहात, तर राजवाडे कर्तव्यवाचक अर्थ पाहात. राजवाडे यांच्या मताला पुष्टी देणारा अर्थच केशवाचार्य काढतांना दिसतो. देशाचार, कुळाचार, वंशाचार व देवशास्त्राचार या आचारांना केशवाचार्य धर्म म्हणतो. हा धर्म महाराष्ट्रे भवाः अशा महाराष्ट्रीयांना, म्हणजे मराठ्यांना, म्हणजेच ब्राह्मणापासून तो अंत्यजापर्यंत जेवढे म्हणून महाराष्ट्रीय लोक असतील त्या सर्वांना लागूं पडणारा सामान्य धर्म आहे. मराठा कोणाला म्हणावें हेंहि केशवाचार्य सांगतो. महाराष्ट्र शब्दाचा अपभ्रंश माराष्ट्र. महाराष्ट्रे भवाः माहाराष्ट्राः । महाराष्ट्र म्हणजे मराठा.

पृ. ३ **नायकोराव**— मालाडचा क्षत्रिय देसला. याला श्रीदेवी कुळस्वामिणीनें स्वप्नांत येऊन केशवाचार्यांच्यामुखें महाराष्ट्रधर्म सांगाविण्यास आदेश दिला.

**केशवाचार्य—** यानेंच नायकोरावाच्या आज्ञेनें महाराष्ट्रधर्माचें निरूपण केलें. महिकावतीच्या मुख्य बखरीचा ( प्रकरण दोनचा ) कर्ता हाच.

पृ. ४ **अहिनळवाड्या होउन—** 'होऊन' हा पंचमीचा प्रत्यय दिसतो. प्रस्तुत बखरींत तो 'होन' 'होवोन' या रूपांतहि आढळतो. राजवाडे हा प्रत्यय पंचमीच्या 'सुंतो' पासून व्युत्पादितात. ( पाहा—म. बखर, प्रस्तावना. पा. १३ ).

**हेत मी ( देवी ) पुरवितो—** पुरवितें किंवा पुरवित्यें. हा दिसण्याला पुल्लिंगी क्रियापदप्रयोग कोकणी लकबीचा द्योतक आहे.

**हें स्वप्न......सांगविला—** स्वप्न शब्द संस्कृतांत प्रायः पुल्लिंगी आहे. सबब केशवाचार्यानें प्रौढपणानें स्वतःहि तसाच वापरलेला दिसतो.

पृ. ९ **प्रतापश्या—** प्रतापश्या किंवा नागरशा यांतील 'श्या'–'शा' प्रत्यय फारशी 'शहा' पासून आलेले नसून वैदिक सह् ( बलवान् असणें ) >साह् > सा > शा—श्या या रीतीनें मराठींत आलेले आहेत. ( पाहा— राजवडे : म. बखर, प्रस्तावना, पा. ७८ ) मात्र येथें प्रतापशा, नागरशा हे शब्द क्षत्रियवाचक आहेत.

पृ. ११ **कानडा रामराजा—** विजयानगरचा राजा.

पृ. १२ **मुळधर्म महाराष्ट्र इ.—** मूळ महाराष्ट्रधर्म म्हणजे ( १ ) स्नान, ( २ ) गुरुपदेश आणि ( ३ ) मंत्रजप. स्नान म्हणजे शुचिर्भूतपणा; गुरुपदेश म्हणजे सर्व जातींत श्रेष्ठ जो ब्राह्मण त्यानें उपदेशिलेला आचारव्यवहार-प्रायश्चित्तादि धर्मसमूह तो; आणि मंत्रजप म्हणजे गुरुपदेशानुरूप श्रद्धायुक्त आचरण.

**३. ज्याची भाख जाईल तो निरर्थक जन्मी**

पृ. १२ **राया नागरस्या—** उत्तर कोंकणांतील माहीम, ठाणें व चेऊल येथें राज्य करणारा राजा.

**काटि हात ७ इ.—** सात हातांची काठी व १२ काठ्यांचा बिघा भागडचुरीनें सुरू केला. दर दोन बिघ्यांस चार फऱ्यांचा हारा असा राजभाग त्यानें ठरविला. १२८ बिघ्यांचा एक चावर. जुनी तऱ्हा मोडून नवीन तऱ्हेची ही कमावीस भागडचुरीनें सुरू केली व सरकारी उत्पन्न वाढाविलें. महाराष्ट्रांत दादोजी

कोंडदेव, चतुर साबाजी यांजबरोबर याबाबतींत भागडचुरीचें नांवहि घेतलें पाहिजे.

पृ. १३ **स्त्रिवेशनि**— स्त्रीव्यसनी

**परंत**— 'परंतु' असावें.

**मामार पक्षि**— मामाच्या घरीं ?

पृ. १४ **मोहटे पाहाटि**— मोठ्या पहाटे.

**अश्वार**— स्वार.

पृ. १५ **भागडचुरि मारिला, शिर घेतलें** इ०—वस्तुतः भागडचुरी मारला गेला नव्हता. इतकेंच नव्हे तर कांहीं एक दुखापत न होतां तो निसटला होता. परंतु प्रस्तुत प्रकरणीं तो मारला गेला या समजुतीनेंच पुढील घटना घडलेल्या आहेत.

**पेढोपेढिस**— पिढ्यान् पिढ्या ?

**दढाव**— दृढ भाव.

---

## क्रमांक २ : : राक्षेस तागडीचा रणसंग्राम

राक्षेस तागडीच्या रणसंग्रामाची ही स्वतंत्र बखर आहे. तंजावर शिलालेखाप्रमाणें ही कानडी वळणाच्या मराठी भाषेंत लिहिलेली आहे. डॉ. कृष्णस्वामी अय्यंगार यांच्या मतें हिचें मूळ कानडी असावें. तथापि मराठी बखरींत हिला भाषेच्या व विषयाच्या दृष्टीनें स्वतंत्र स्थान दिलें पाहिजे हें प्रो. द. वा. पोतदारांचें मत (पाहा. विविधदर्शन पृ. १२२, 'मराठींत विजयानगर') कोणालाहि मान्य व्हावें.

राक्षेस तागडीच्या युद्धाचा तिथिनिर्णय व समरक्षेत्राचा निर्णय यांबाबत संशोधकांनीं अंदाज दिले असले तरी निश्चित मत आढळत नाहीं. रा. य. खु. देशपांडे यांनीं उल्लेखिलेल्या एका जीर्ण पोथींत या युद्धाच्या मितीच्या पांच नोंदी आढळतात. (भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष १०, अंक १, शके १८५१). परंतु त्या बनावट मानण्यास त्याच पोथींत भरपूर आधार सांपडतो. हें युद्ध

तंगडगी व नालत्वाड या गांवांच्या दरम्यान झालें असावें असाहि एक तर्क आहे. (पाहा — रा. नारायणराव राजपुरोहित यांचें टांचण : भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष १० अं. १ श. १८५१).

कृष्णेच्या कांठीं असलेल्या रकसगी व तंगडगी या दोन खेड्यांनजीक विजयानगरचा राजा रामरावो याचा तळ होता. त्यावरून 'राक्षस तागडी' हें अन्वर्थक नांव या युद्धास बखरकारांनीं दिलें. मुसलमानी इतिहासकार यासच तालिकोटचें युद्ध म्हणतात. महाराष्ट्रांत पानिपतचें जें महत्त्व तेंच कर्नाटकांत 'राक्षस तागडीला'; कारण यांत निजामशाहा, अदिलशाहा, कुतुबशाहा व बेरीदशाहा यांनीं 'एकोळा करोनि' रणीं रामरावो निवटीला. प्रस्तुत बखर युद्धानंतर लौकरच म्हणजे श. १४८७ च्या श्रावणांत (इ. स १५६५) लिहिली गेली. परंतु मूळ बखर अजून हातीं लागली नसून तिची श. १६०६ मधली नक्कलच उपलब्ध आहे. या बखरीची भाषा स्पष्टपणें १५ व्या शतकांतील आहे व तिचा लेखक लढाईच्या वेळीं हयात असावा असें सहज अनुमान करतां येतें. बखरकाराचें नांव, बखरीच्या अखेरीस असणाऱ्या उल्लेखावरून, वेंकटाद्री तकेल निसीदा असें दिसतें.

हें युद्ध श. १४८६ माघ शु. ५ रोजीं झालें. युद्धाच्या आदले रात्रीं रामराजाला जें दुष्ट स्वप्न पडलें तेथपासूनचा पुढील भाग प्रस्तुत उताऱ्यांत घेतला आहे.

जुन्या लेखांतून विरामचिन्हें वापरण्याची पद्धत नसे. प्रस्तुत बखर जेव्हां भा. इ. सं. मं. च्या द्वितीय संमेलनवृत्तांतांत छापली, तेव्हां ती मुळाबरहुकूम विरामचिन्हविरहित छापलेली आहे. येथील उताराहि मुद्दाम त्याबरहुकूम विरामचिन्हविरहितच छापला आहे. त्यावरून विरामचिन्हविरहित लेखन कसें असे याची कल्पना येईल.

पृ. १७ **असावलिया** — असोले नारळ दिले. त्या वेळचा निरोप देण्याचा हा प्रकार असावा.

**उतरतफेसी नवगोजी (डेरा) देऊनु** — 'देऊनु' हें कृदन्त ज्ञानेश्वरींतील 'करूनु' 'घेऊनु' या रूपांची आठवण देईल.

पृ. १९ **एक डुमाल होउनु** — एकामागें एक उभें राहून.

---

## क्रमांक ३ : : शिवछत्रपतींचें चरित्र

'शिवछत्रपतींचें चरित्र' हें शिवाजीचें पहिलें चरित्र होय. तें लिहिणारा चरित्रकार कृष्णाजी अनंत सभासद नामें 'पुरातन माहितगार' होता. त्यानें राजारामाच्या आज्ञेनें चंदी चंदावर येथें हें चरित्र वा ही बखर श. १६१९ मध्यें लिहून पूर्ण केली.

कृष्णाजी सभासदाचें उपनांव हिरेपारखी होतें व तो काश्यपगोत्री देशस्थ ब्राह्मण असावा. शिवाजीपासून राजारामापर्यंतच्या काळांत तो दरबारचा सभासद असावा. सभासद म्हणजे राजदरबारीं सभेंत बसून सल्लामसलत देणारा शिष्ट पुरुष. (पाहा—राजवाडे. प्रस्तावना खंड–पा. २१७) त्यावरून त्याला सभासद हें नांव पडलें असावें.

प्रस्तुत सभासदी बखर शिवाजीच्या मृत्यूनंतर १७–१८ वर्षांनीं लिहिली गेली ही गोष्टहि नमूद करण्यासारखी आहे. शिवाजीच्या पराक्रमाचें तिच्यांतील वर्णन 'त्रोटक व स्थूल' स्वरूपाचें दिसलें तरी शैलीदार आहे.

### १. अफझलखानाचा वध

प्रस्तुत उताऱ्यांत अफझलखानाच्या वधाचा प्रसंग वर्णिला आहे. याच प्रसंगाचें वर्णन मल्हाररामराव चिटणिसानें 'सप्तप्रकरणात्मक चरित्र' यांत कसें केलें आहे आणि जेधे यांच्या शिवकालीन करीण्यांत हीच हकीकत कशा प्रकारें दिली आहे हें ताडून पाहाण्यासारखें आहे.

पृ. २३ **हें वर्तमान**—शिवाजीनें 'पातशाही किल्ले घेतले, देशहि काबीज केला. एक-दोन राज्यें बुडविलीं' इत्यादि वर्तमान.

**पातशाही रुजुवात होते**—पातशाही हुकुमांत होते.

**चढे घोडियानिशीं**—एकदांहि घोड्यावरून न उतरतां.

पृ. २४ **संभाजी राजियास जसें मारलें** इ० हा संभाजी शिवाजीचा वडील बंधु. याच्याबद्दल एका प्रतींत पुढील मजकूर आढळतो. "......तिघे पुत्र जाले. त्यामध्यें संभाजीराजे वडील. यांसि विजापुराहून वेगळी दौलत जाली होती. यांसि बडी साहेबीण, बाईल सुलतान महंमद याची स्त्री, विजापुरीं

होती. तिणें विश्वासघात करून विषाची लुगदी दिली, तेव्हां ते मेले." (पाहा—टीप. १५ पृ. ३, सभासदकृत शिवछत्रपतींचें चरित्र)

पृ. ३० **वाघनखाचा मारा करतांच इ.**— प्रस्तुत बखरींत शिवाजीनें वाघनखाचा उपयोग केल्याचा जो उल्लेख आहे तो परमानंदकृत 'शिवभारतां'त नाहीं. (पाहा—श्लो. ३३-५१) त्या ऐवजीं शिवाजीनें आपल्या तरवारीचें टोंक खानाच्या पोटांत खुपसलें व आंतडीं बाहेर काढलीं. (श्लो. ३७-४०) असें वर्णन आहे.

२. राजियाचें देहावसान

या उताऱ्यांत शिवाजी राजांचें देहावसान वर्णिलें आहे. संभाजी व राजाराम यांबद्दल शिवाजीनें केलेलें भाकीत म्हणजे बखरकार राजारामाच्या पदरीं होता याचा अप्रत्यक्ष पुरावाच आहे. परंतु त्यांच्या तोंडचीं वाक्यें व केलेलें वर्णन, तसेंच त्यांच्या मृत्यूनंतर झालेल्या उत्पातांचें वर्णन हें सारें सांकेतिक असलें, तरी तें बखरकाराच्या लेखनशैलीचें द्योतक आहे.

पृ. ३२ **अमासवणी (?)**— मासे मरून पडल्यानें खराब, दुर्गंधी झालेलें ?

---

## क्रमांक ४ : : आज्ञापत्र

'आज्ञापत्र' अथवा 'मराठेशाहींतील राजनीति' हा राज्यशास्त्रावरील एक उत्तम प्रबंध आहे. लेखक अत्यंत अनुभविक असून, त्याची दृष्टि मोठी मार्मिक आणि सूक्ष्म असावी असा प्रत्यय प्रबंधाच्या पानोपानीं येतो. भाषाहि तितकीच डौलदार आणि अभिजात आहे. परंतु ऐतिहासिक वाङ्मयांतील या 'अमूल्य रत्नाचा' कर्ता कोण याविषयीं संशोधकांत अजून मतनिश्चिति झालेली नाहीं. सामान्यपणें हें प्रकरण रामचंद्रपंत अमात्य बावडेकर यांच्या नांवावर मोडत होतें. परंतु तें अमात्यकृत नसावें असें दर्शविणारे अंतर्गत पुरावेहि आढळतात. प्रो. कोलते यांच्या मतें नीळकंठ मोरेश्वर पिंगळे, शंभू छत्रपतीचा प्रधान, हा याचा लेखक असावा. (पाहा— प्रो. कोलते आणि प्रो. पांढरीपांडे यांच्या प्रस्तावना—'आज्ञापत्र': वीणाप्रकाशन, नागपूर १९३९).

प्रस्तुत प्रकरणाच्या कर्तृत्वाबद्दल वाद असला, तरी त्याच्या लेखनकालाबद्दल वाद निर्माण होण्याचें कारण नाहीं. कारण त्याचा उल्लेख ग्रंथारंभींच स्पष्टपणें केला आहे : 'स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ४२, मन्मथनाम संवत्सरे, मार्गशीर्ष शुद्ध चतुर्थी गुरुवासरे (शनिवार ?) क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपति स्वामी यांणीं समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री रामचंद्र पंडित अमात्य हुकमतपन्हा यांसी आज्ञा केली ऐसीजे' : राज्याभिषेक शक ४२ म्हणजे शके १६३८ (स. १७१६) मध्यें शंभू छत्रपतीनें रामचंद्रपंत अमात्यास आज्ञा करवून हा ग्रंथ लेहवून घेतला.

ऐतिहासिक वाङ्मयांत यासारखेच दुसरे ग्रंथ म्हणजे मल्हार रामराव चिटणीसकृत 'राजनीति' प्रकरण (पाहा क्र. १४ ची टीप) व नाना फडणीसानें मुद्दाम लिहवून घेतलेला 'नारायण व्यवहार शिक्षा' हे दोन होत.

'आज्ञापत्राचीं' एकूण नऊ प्रकरणें असून त्यांतील अखेरचें 'मराठ्यांचें आरमार' हें प्रकरण येथें निवडलें आहे. प्रकरणाचे अखेरीस 'याप्रमाणें हुजरात गडकिल्ले आदिकरून परम सावधतेनें वर्तत.' इत्यादि वाक्यें सबंध आज्ञापत्राची अखेर दर्शवितात.

---

## क्रमांक ५ : : पाणिपतची बखर

रघुनाथ यादवकृत 'पाणिपतची बखर' ही पानिपतानंतर लगेच दोन वर्षांनीं [श. १६८४ : इ. स. १७६२] लिहिली गेली. दिम्मत चिटणीस रघुनाथ यादव यानें ही गोपिकाबाईसाहेबांच्यासाठीं मुद्दाम तयार केली. बखरीचे अखेरीस बखरकार लिहितो, "एक बारनीस शत्रूकडील व श्रीमंताकडील या उभयतांच्या दिनचर्येचें वर्तमान दफात्यास चिटणिसांनीं बार केली. त्यांची संगत पाहून, कच्चा मजकूर सेवेशीं निवेदन करावयाकरितां यथामतीनें बखर सजवून" तयार केली आहे. बखरकाराच्या खंद्या लेखणीची साक्ष पानोपानीं वाचकास मिळते.

### १. कलियुगींचें भारत

पानिपतच्या युद्धांतील एका लढाईचें वर्णन प्रस्तुत उताऱ्यांत आढळतें. ' दखनी लोक बडे हरामजाद ! तरवारीस आपणास ऐकत नाहींत ' असे उद्‌गार इराणीदुराणीस या लढाईत काढावे लागले. मात्र यांतच बळवंतराव मेहेंदळे पडले.

### २. भाऊ कल्पांतींचा आदित्य भासला

पानिपतच्या युद्धांत अखेरीस जो संग्राम झाला, ज्यांत भाऊसाहेबांनीं उडी घेतली व ज्यांमुळें सर्वनाश झाला त्या प्रसंगाचें वर्णन प्रस्तुत उताऱ्यांत केलें आहे. कौरव-पांडवांच्या संगरतांडवांतील उल्लेखांनीं वर्णनाची परिणाम-कारकता वाढविण्यांत रघुनाथ यादव वाकबगार दिसतो. युद्धाच्या धुमश्चक्राचें त्याचें वर्णन तर वाचकांपुढें तो प्रसंग प्रत्यक्ष उभा करतो.

पानिपतचा हा प्रसंग १४ जानेवारी १७६१ मध्यें घडला.

---

## क्रमांक ६ : : भाऊसाहेबाची बखर

पानिपतावर ज्या अनेक बखरी लिहिल्या गेल्या त्यांपैकीं अनेक दृष्टींनीं उत्कृष्ट बखर म्हणजे ' भाऊसाहेबांची बखर ' होय. पानिपतानंतर लौकरच ती लिहिली गेली असावी. ' पोष्य कृष्णाजी शामराव मुक्काम दिली इंद्रप्रस्थ. कृतानेक साष्टांग नमस्कार— प्यादाचा फर्जी नजीबखान रोहिला होऊन... सवा लक्ष फौजेनिशी भाऊ गर्दी होऊन प्यादेपात कशी झाली हें सविस्तर ल्याहावें म्हणून आज्ञा. ' या सुरवातीच्या वाक्यावरून बखरीचें कर्तृत्व कुणा कृष्णाजी शामरावाकडे जात असलें तरी तें विवाद्य दिसतें. ग्वाल्हेरच्या आनंदराव फाळक्यांच्या मतें ही बखर शिंद्यांच्या नोकरींतील त्रितो कृष्ण वळे–फडणीस यांनीं लिहिली असावी. प्रो. शेजवलकरहि याच मताचे दिसतात. बखरकार कोणीही असो, पण तो शिंद्यांचा पक्षपाती दिसतो. वाङ्मय म्हणून असणारें या बखरीचें महत्त्वहि अपूर्व आहे. किंबहुना बखरींना वाङ्मयीन मोल देणाऱ्या ज्या कांहीं थोड्याफार बखरी आहेत त्यांत या बखरीस फारच वरचें स्थान द्यावें लागेल.

### १. बचेंगे तो और बी लढेंगे

प्रस्तुत उताऱ्यांत दत्ताजी शिंद्याचा शिरच्छेद, दिवस भरलेली भागीरथीबाई व पत्नी काशीबाई यांच्यासह जखमी जनकोजीचा दुर्दैवी पळ आणि दुर्दशा, तसेंच तेव्हा मल्हाररावाचा याच्या स्त्रीनें केलेला निषेध इत्यादि हकीकती आल्या आहेत.

पृ. ५५ **उधोमाधो**— उद्धव माधव या नांवाचा हिंदी संत कवि.

पृ. ५७ **पडतीयांनी**— 'पळतीयांनीं' असें असावें.

पृ. ५० **निशाअकताला**— (इन्‌शा हाख्नाल्ला) ईश्वराच्या इच्छेनें. हें पूर्ण वाक्य असें: "इन्‌इशा हाख्नाल्ला हुकमत परवरदिगार की है." (ईश्वराची इच्छा असल्यास त्याचीच आज्ञा प्रमाण.)

### २. कर्मणो गहनो गतिः

पानिपतचा अखेरचा संग्राम पौष शुद्ध ८ शके १६८२ (ता. १४ जानेवारी १७६१) या दिवशीं झाला.

पृ. ७१ **गाईचे गोरे आले**— गाईचे गोहरे = वेडावलेले, गांजरलेले.

---

## क्रमांक ७ : : श्रीमंत भाऊसाहेब यांची कैफियत

भाऊसाहेबांची ही कैफीयत कधीं आणि कुणीं लिहिली याचा निर्णय करतां येत नाहीं. मात्र लिहिणारा कुणी देशस्थ ब्राह्मण किंवा दुसरा कुणी देशावरील रहिवासी असावा.

### १. 'आजच कूच करून जातों'

पानिपतावर दादासाहेबाऐवजीं भाऊसाहेब कां गेले याचें उत्तर प्रस्तुत उताऱ्यांत मिळतें. दादासाहेब व भाऊसाहेब यांची याबाबत झालेली बोलाचाली त्यांच्या स्वभावावर चांगलाच प्रकाश पाडते.

### २. क्षात्र धर्माची शर्थ

गिलच्यांचें बळ दिवसेंदिवस वाढूं लागलेलें व आपलें लष्कर सडत चाललेलें पाहून भाऊंनीं केलेली मसलत व अखेरची शर्थ येथें वर्णिली आहे.

---

## क्रमांक ८ : : होळकरांची थैली

पानिपतच्या प्रसंगावर लिहिली गेलेली आणखी ही एक बखर : ती मल्हारराव होळकर यांनीं आपले धनी श्रीमंत पेशवे सरकार यांना लिहून कळविली. तीच "होळकरांची थैली' या नांवानें प्रसिद्ध आहे. ती निश्चित कधीं लिहिली गेली हें मात्र कळत नाहीं. कै. वि. का. राजवाडे यांनीं ती आपल्या तिसऱ्या खंडांत छापली आहे.

---

## क्रमांक ९ : : श्रीमंत नारायणराव पेशवे यांची बखर

नारायणराव पेशवे यांच्या वधासंबंधींच्या हकीकतींचीं अनेक टिपणें आढळतात. त्यांतच 'श्रीमंत नारायणराव पेशवे यांची बखर—कारभारी पक्षाच्या हकीकती-सुद्धां' हें टिपण गणावें लागेल. परंतु हें इतकें विस्तृत आहे कीं, त्यास एक स्वतंत्र बखर मानण्यास हरकत नाहीं. तशीच त्याची भाषाहि त्यास वाङ्मयांत स्थान द्यायला उपयोगी पडणारी आहे.

प्रस्तुत उतारा पेशवाईत प्रसिद्ध पावलेल्या बारभाईच्या मसलतीविषयींचा आहे.

हें टिपण वा ही छोटी बखर कोणीं व केव्हां लिहिली याजबद्दल माहिती मिळत नाहीं.

---

## क्रमांक १० : : नाना फडणिसांचें आत्मचरित्र

बाळाजी जनार्दन उर्फ नाना फडणीस यांचें हें स्वलिखित आत्मवृत्त आहे. यांत श. १६८३ आषाढ वद्य ३ (ता. २०-७-१७६१) या दिवशीं पहिल्या माधवरावास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं तोंपर्यंतची हकीकत आहे. म्हणजे नाना फडणिसानें हें वृत्त त्यानंतर केव्हां तरी लिहिलें असावें. याचें इंग्रजी अवतरण मॅक्डोनल्डकृत ना. फ. चरित्रांत छापलें आहे.

आत्मचरित्र या दृष्टीनें नानाच्या या लेखनाला फार महत्त्व आहे. नानाचें आत्मपरीक्षण मोठें निर्भीड दिसतें. स्वतःचे दोषहि त्यानें स्पष्ट वर्णिले आहेत. उत्तरपेशवाईतील नानाचें महत्त्व लक्षांत घेतां त्याचा स्पष्टवक्तेपणा विशेषच प्रशंसनीय होय. नानाच्या वर्णनशक्तीचे नमूनेहि प्रस्तुत आत्मचरित्रांत भरपूर आढळतात.

**नाना फडणीस जन्म**— श. १६६३ ; पित्याचें नांव-जनार्दन बल्लाळ भानु.

**श्रीरंगपट्टणाची स्वारी**— श. १७५५-५६ मध्यें झाली.

**मुक्तिपुरीं मथुराक्षेत्रीं**— ह्या सप्त मुक्तिपुऱ्या प्रसिद्ध आहेत.

अयोध्या मथुरा माया काशी कांची अवंतिका।
पुरी द्वारावतीचैव सप्तैता मोक्षदायकाः॥

**पृथ्वीपाति**— दिल्लीचा बादशहा. जवानबख्त म्हणून एक लहान शहाजादा भाऊनेंच गादीवर बसविला होता.

**उत्तरेकडील यवन**— अहमदशहा अबदाली.

**बळवंतराव मातुल**— बळवंतराव मेहेंदळे.

**शाहनवाजखानी**— दिल्लींतील पादशाही मुत्सद्दी.

**बापूजीपंत**— हरिपंत फडके यांचे जेष्ठ बंधु.

**रामाजीपंत**— रामाजीपंत दाभोळकर, शिंद्यांचे दिवाण.

**गुरुजी**— हे बहुदा महादजी बल्लाळ करकरे असावे.

---

## क्रमांक ११ : : सप्तप्रकरणात्मक चरित्र

क्र. ११, १२, १३ व १४ यांचा लेखक मल्हार रामराव चिटणीस हा मराठेशाहीचा एक नामांकित बखरकार होऊन गेला. बाळाजी आवजीचा तो निपणतू आणि पेशव्यांचे सरदार सखाराम हरि गुप्ते आंबेगांवकर यांचा तो जांवई. हा सातारच्या प्रतापसिंह छत्रपतींचा चिटणीस होता. त्यानें विष्णुपुराण, दंडनीति, राजधर्म इत्यादि ग्रंथ आणि त्याचप्रमाणें वडिलार्जित कारकीर्दी, दिनचर्या, पत्रें इत्यादि पाहून आपल्या बखरी सजविल्या. त्यानें आपल्या बखरींचें लेखन इ. स. १८१३ च्या आसपास केलें असावें. 'श्री शिवछत्रपतींचें सप्तप्रकरणात्मक चरित्र' याच्या सुरवातीस "स्वतिश्री राज्याभिषेक १३७प्रमोदी नाम संवत्सरे, ज्येष्ठ बहुल पष्ठी भृगुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्रीराजाधिराज श्रीमहाराज प्रतापी शाहू नृपति......यांनी......आज्ञा केली ऐसीजे......" असें जें वाक्य मल्हार रामरावानें दिलें आहे त्यावरून छत्रपति शाहूच्या आज्ञेनें ही बखर त्यानें इ. स. १८१० मध्यें लिहायला घेतली. परंतु त्याच्या आधींच दोन वर्षें शाहू मृत्यु पावलेला असल्यानें याबाबत कांहीं घोटाळा दिसतो. तथापि पेशवाईच्या अस्तकालीं व अव्वल इंग्रजीच्या उदयकालीं मल्हार रामरावानें शककर्ते थोरले शिवाजी महाराज याजपासून तों धाकट्या शाहू महाराजांपर्यंत सर्व छत्रपतींच्या चरित्रलेखनाचें कार्य केलें आहे.

प्रस्तुत उताऱ्यांत शिवछत्रपतींच्या राज्याभिषेकाचें वर्णन आहे.

पृ. १०८ **राज्याभिषेक शक**—शिवाजीनें आपल्या राज्याभिषेकापासून नवीन शक सुरू केला. राज्याभिषेक शालिवाहन शके १५९६ जेष्ठ शु. १३ (६ जून इ. स. १६७४) रोजीं झाला; म्हणजे तेथपासून राज्याभिषेक शकगणना सुरू.

---

## क्रमांक १२ : : संभाजी राजे यांचें चरित्र

मल्हार रामराव चिटणीसकृत छत्रपति संभाजीचरित्रांतील हा उतारा आहे. गोव्यावरील स्वारीपासून तों संभाजीच्या तेजस्वी पण करुण अखेरीपर्यंतचें वर्णन यांत आलें आहे.

**बावा**—कबजी

## क्रमांक १३ : : थोरले राजाराम महाराज यांचें चरित्र-प्रकरण

हें प्रकरणहि मल्हार रामरावाचेंच आहे. यांतील (१) 'राजारामाचें जिंजीस प्रयाण' व (२) 'औरंगजेबाचा साताऱ्याला वेढा' यांबाबतचे उतारे येथें घेतले आहेत.

पृ. ११८ **रामचंद्र निळकंठ**— रामचंद्रपंत बावडेकर यांस 'हुकमतपन्हा' हा किताब होता. प्रसिद्ध 'राजनीति' ज्या रामचंद्रपंत अमात्याच्या नांवावर मोडते, तोच हा.

पृ. १२० **जमाव पाडिला**— जमाव मिळविला.

---

## क्रमांक १४ : : राजनीति

'आज्ञापत्राप्रमाणें (क्रमांक ४)' राजनीति हा मराठींतील एक राजनैतिक स्वरूपाचा ग्रंथ म्हटला पाहिजे. या ग्रंथाचा लेखक मल्हार रामराव चिटणीस असून त्यानें तो शुक्रनीतीच्या आधारें लिहिला. ही राजनीति सप्तप्रकरणात्मक आहे. त्यांतील (१) श्री राजगुण–प्रकरण, आणि (२) बल–प्रकरण धर्मयुद्ध हे दोन उतारे येथें घेतले आहेत. त्यावरून गद्य सारस्वताचे गुण त्यांतहि कसे उतरले आहेत याचा प्रत्यय येईल.

---

## क्रमांक १५ : : श्रीहनुमंतस्वामीकृत श्रीसमर्थांची बखर

हनुमंतस्वामी हे समर्थांचे जेष्ठबंधु जे श्रेष्ठ त्यांच्या नातवाचे नातू. त्यांच्या या बखरीची "मूळ प्रत किंवा पहिली आवृत्ति श. १७१५ मध्यें लिहिली गेली व नंतर स्वामींच्या आज्ञेवरून रंगो लक्ष्मण व मल्हार रामराव चिटणीस यांनीं वाढवून

दुसरी आवृत्ति श. १७४० मध्यें तयार केली. " म्हणजे प्रस्तुत बखरीला मल्हारराव रामरावाच्या बाक्यालेखणीचा स्पर्श झालेला दिसतो. सांप्रदायिकांत महत्त्व पावलेली ही बखर प्रथम इ. स. १८७० मध्यें प्रसिद्ध झाली व नंतर इ. स. १८८८ मध्यें त्याचो 'शुद्ध करखून' दुसरी आवृत्ति छापली गेली. परंतु तिच्यांतील भाषेला बरेंच अर्वाचीन स्वरूप आलेलें दिसतें.

अलीकडे दोन-तीन वर्षांपूर्वी 'रामदास आणि रामदासी' या मासिक पुस्तकांतून श. १७११ मध्यें मूळ लिहिली गेलेली व श. १७४५ मध्यें वाढवलेली अशी एक 'श्रीहनुमंतस्वामीकृत समर्थांची बखर' छापली गेली आहे. ( रामदास आणि रामदासी ग्रंथमाला, भा. ५५ वा ). 'श्रीहनुमंतस्वामींनीं सांगितलें तें लिहिलें — श. १७४५ आषाढ कृ. ८ बुधवारीं समाप्ति–जुने प्रतीवरील मिती श. १७४० ' असा त्याचे अखेरीस उल्लेख आहे. परंतु त्याच्याहि आधींची म्हणजे श. १७११ मध्यें लिहिली गेलेली जी बखर आहे त्यांतून 'श्रीशिव–समर्थ भेटीचा' उतारा येथें घेतला आहे. या बखरीची समाप्ति खालीलप्रमाणें आहे. "श. १७११ सौम्य नाम संवत्सरे श्रावण शु ॥ ९ रो गुरवारी ते दिवसी प्रारंभ केला तो श्रावण वद्य ९ नवमीस समाप्त जाहाली."

श्रीशिव-समर्थ भेटीसंबंधींच्या प्रस्तुत उताऱ्यांत वर्णनाचा थाटमाट न आढळला तरी त्यांतील साधेपणा व शब्दांचा वेंचक उपयोग मनांत भरावा.

---

## क्रमांक १६ : : पेशव्यांची बखर

कृष्णाजी विनायक सोहनीविरचित 'पेशव्यांची बखर' ही अव्वल इंग्रजी सुरू झाल्यानंतर ५–७ वर्षांनीं म्हणजे साधारण इ. स. १८२५ चे सुमारास लिहिली गेली. हिच्यांत पहिले पेशवे श्रीमंत बाळाजी विश्वनाथ भट हे त्यांचा मूळ गांव जो श्रीवर्धन तेथून निघाल्यापासून तहत इंग्रज सरकारनें पुण्यांत शनिवार वाड्यावर आपला बावटा चढविला तोंपर्यंतची हकीकत आहे.

सदरहू बखरीचे लेखक कृष्णाजी विनायक सोहनी यांची फारशी तपशीलवार माहिती मिळत नाहीं. ते कोकणांत रत्नागिरीनजिक सोमेश्वर गांवचे राहणारे. शेवटले पेशवे यांचे कारभारी चिंतोपंत देशमूख पावसकर यांचे कृष्णाजीपंत आप्त होते व पेशवाईत सुभेदारीचें कामहि त्यांनीं केलें होतें. परंतु पेशवाई-बरोबर त्यांचेंहि वैभव लुप्त झालें आणि वैजनाथच्या देवालयांत तपस्व्याप्रमाणें ईश्वरोपासनेंत त्यांनीं आपला उर्वरित काळ घालविला. मृत्यूसमयीं म्हणजे इ. स. १८५४-५५ सालीं त्यांचें वय सुमारें ७० पर्यंत असावें.

कृष्णाजीपंत सोहनी यांनीं ही बखर वैजनाथ गांवीं तोंडी सांगितली आणि तेथील कित्येकांनीं ती आदरपूर्वक लिहून घेतली. बखरकार हे खरोखरीच 'पुरातन माहितगार' असल्यानें त्यांनीं केलेलें निवेदनहि संगतवार व चटकदार झालेलें आहे.

### १. श्रीमंतांचें लग्न

प्रस्तुत उताऱ्यांत सवाई माधवराव पेशव्यांच्या विवाहाचें वर्णन आहे. हा विवाहसमारंभ पुण्यास श. १७०४ (फेब्रुवारी १७८३) मध्यें झाला. वधू बाळाजी बहिराव उर्फ नवलाखे थत्ते यांची कन्या. हा सवाई माधवरावाचा प्रथम विवाह होय.

पृ. १३७ **पन्नास काठी सोन्याची उभी राहिली**— सोन्याच्या काठीचे चोपदार : असे चोपदार असणारे राजे तेथें हजर होते.

**नेम नाहीं**—नक्की संख्या सांगतां येत नाहीं.

**हातावरून फुलांचा हार गुंडाळून**— कधीं कधीं रुमालहि गुंडाळीत. हें सेवकत्वाचें दर्शक आहे.

**आदब बजावीत**—नम्रतेनें मुजरे करीत.

### २. रंगाचा समारंभ

हा समारंभ चैत्र शु. १, शके १७१५ रोजीं झाला.

पृ. १४२ **गुलाल गोटे**— पातळ कागदाचे गोळे. (आंत गुलाल भरून होळीच्या सणांत एकमेकांवर फेंकण्याकरितां तयार करतात ते).

## क्रमांक १७ : : खर्ड्याच्या स्वारीची बखर

ही बखर केव्हां व कोणीं लिहिली तें समजण्यास तूर्त साधन नाहीं. हिला बखरकार 'माधवराव नारायणराव पेशवे यांची बखर' असेंहि म्हणतो. खर्ड्याच्या स्वारीचें त्यानें केलेलें वर्णन सहजतेनें आणि सरसतेनें नटलेलें दिसतें.

पृ. १५५ **अकरावीचे अमलांत**— अकराव्या घटकेच्या अमलांत.

---

## क्रमांक १८ : : हरिवंशाची बखर

'हरिवंशाची बखर' म्हणजे हरभट पटवर्धनाच्या वंशजांची हकीकत. ही त्याच वंशांत जन्मलेले बाळकृष्णराव हरिहर पटवर्धन आंबेकर यांनीं 'शके १७६४ शुभकृन्तामसंवत्सरे वैशाख शु. ५ इंदुवारीं' लिहिली. म्हणजे ही बखर अव्वल इंग्रजींतील आहे आणि 'मु. आंबे, नजीक श्रीक्षेत्र पंढरपूर' येथें तिची लेखनसमाप्ति झाली आहे. प्रस्तुत बखरींत पेशवे, घोरपडे, प्रतिनिधि इत्यादिकांच्या हकीकती प्रसंगोपात्त दिलेल्या असल्या तरी ती मुख्यतः पुरुषोत्तमराव कृष्ण उर्फ दाजी यांचे पराक्रम वर्णण्यासाठीं लिहिली आहे.

बखरकार बाळकृष्णराव हे पेशवाईच्या इतिहासाचे हौशी असून जुन्या चालीरीतींचे उत्तम माहितगार होते आणि पेशवाईतील नानाविध प्रसंग ज्यांनीं डोळ्यांनीं पाहिले होते अशा माणसांचा त्यांस रात्रंदिवस सहवास लाभलेला होता. शिवाय वर्णविषय जो पटवर्धनकुलाचा वृत्तांत, त्याचें त्यांनीं आस्थापूर्वक आकलन केलें होतें. वर्णनाचा सरळपणा हा त्यांच्या लेखनाचा मोठा गुण आहे.

प्रस्तुत बखरींतील 'ध' चा 'मा' हा उतारा नारायणराव पेशव्याचे वध-प्रसंगींचा आहे. नारायणरावाच्या खुनासंबंधींचीं ऐ. ले. संग्रहांत नं. १२५७ वगैरे पत्रें आहेत. परंतु त्यांतील मजकुरापेक्षां प्रस्तुत बखरींतील तपशील पुष्कळच अधिक आहे. इतकी एकत्र तपशीलवार हकीकत आजपर्यंत कोठेंहि छापलेली नसल्याचा निर्वाळा संपादक वासुदेवशास्त्री खरे यांनीं दिलेला आहे.

'घ' चा 'मा' आनंदीबाईनें केला असें वर्णन याहि बखरींत केलेलें असलें तरी त्याला सबळ ऐतिहासिक असा पुरावा नाहीं. किंबहुना "माझी ममता विशेष म्हणोन नारायणरायाची गर्दीचा मार मला सांगत नव्हते. यांणीं चौकशी किमर्थ केली नाहीं ? यादीचीं अक्षरें "घ" चा "मा" कोणी केला याची चौकसी किमर्थ न केली ? माझा दस्तऐवज किंवा निरोप कांही तरी निवडावयाचे होते. काहीच न करतां उगेच पेचांत ठेवलें. दैवास उपाय नाहीं." असे वैतागाचे उद्‌गार आनंदीबाई, कोपरगांव येथें नजरकैदेंत असतांना काढते ( पेशवेदफ्तर, खंड ४, क्र. ७३ ).

पृ. १५६ **श्रीमंत रावसाहेब**— थोरले माधवरावसाहेब पेशवे.

पृ. १५६ दादासाहेबांची कन्या दुर्गाबाई इचें लग्न मोरोपंत कवीचे आश्रयदाते पांडुरंगराव बारामतीकर यांच्याशीं झालें.

पृ. १५७ **सासुरवाडी**— कृष्णाजी हरि साठे यांचे घरीं. श्रीमंतांचे श्वशुर यापूर्वीच वारले होते. सासू ताईसाठीं जिवंत होती. तिचा मुलगा महिपतराव साठे लहान होता.

पृ. १५७ **तलब चढली**— पगाराची बाकी तुंबली.

पृ. १५८ **तरवारी ओढून**— तरवारी म्यानांतून उपसून.

पृ. १५९ **'दीन्' गाजविला**— 'दीन् दीन्' अशी गर्जना केली.

---

## क्रमांक १९ : : मराठी ऐतिहासिक शिलालिपि

प्रस्तुत उतारा हा तंजावर येथील बृहदीश्वराच्या देवळांतील प्राकाराचे भिंतीवर कोरलेल्या बखरींतून घेतला आहे. हा प्रदीर्घ शिलालेख म्हणजे मराठेशाहीची एक संपूर्ण बखरच होय. ही शिलालिखित बखर अव्वल इंग्रजींतील म्हणजे १३ डिसेंबर १८०३ मध्यें पूर्ण झालेली आहे. तंजावर राजवंशीय शेवटील राजे श्रीशिवाजीमहाराज यांचे वडील श्रीशरफोजीमहाराज यांच्या कारकीर्दींत त्यांच्या चिटणिसांनीं ती लिहिली आहे. "प्रथमवर्ण (ब्राह्मण) महाराष्ट्र जाति

भगवंतरायाचे पौत्र विठ्ठलरायांचे पुत्र प्रस्तुत चोळदेशाधिपती श्रीमंत राजेश्री महाराज छत्रपति शरफोजी महाराजेसाहेब यांचे निजसेवक आश्वलायन सूत्र ऋक् शाखाध्यायी यांजकडून लिहिलेजे ते शालिवाहन शके १७२५ रुधिरोद्गारी संवत्सर मार्गशीर्ष वद्य आमावास्या भौमवारी इंग्रेजी सन १८०३ इसवी डिसेंबर १३ तारीख लेखनसीमा समाप्त." अशी प्रस्तुत शिलालेखाच्या अखेरीस नोंद आहे. लेखांतील इतिहास अविश्वसनीय असला आणि मराठी भाषाहि अशुद्ध असली तरी तंजावर प्रांतीय मराठीचा नमूना म्हणून त्याचें महत्त्व आहेच. शिवाय एक शिलालिखित बखर म्हणूनहि असणारें महत्त्व कमी नाहीं.

प्रस्तुत बखरीचें वाचन आणि प्रकाशन प्रथम वि. का. राजवाडे यांनीं केलें असें दिसतें. श्री. चांदोरकरसंपादित 'प्रभात' मासिकाच्या इ. स. १९०६ च्या १ ल्या अंकांत त्यांनीं या बखरीचें प्रकाशन सुरू केलेलें आढळतें. त्यानंतर इ. स. १९०७ मध्यें तंजावरचे श्री. तं. सांबमूर्तिराव यांनीं त्याचें स्वतंत्र वाचन आणि पुस्तकरूपानें प्रकाशन केलें. प्रस्तुत उतारा हा त्यांच्याच पुस्तकांतून घेतला आहे.

### १. चिताऱ्यानें सुरत लिहून नेली

औरंगजेब बादशहा स्वतः शिवाजीवर स्वारी करतो तेव्हांची हकीकत या उताऱ्यांत आहे. शिवाजीला जिवंत धरण्याचे प्रयत्न निष्फळ झाल्यावर त्याची निदान तसबीर तरी मिळावी म्हणून त्यानें चिताऱ्याकडून शिवाजीची सुरत लिहवून घेतली.

पृ. १६२ मोंगलांच्या घोड्यांना पाण्यात शिवाजी दिसत नव्हता, तर धनाजी दिसत होता, अशी आख्यायिका आहे. बखरकारानें तीच शिवाजीबद्दल दिली आहे.

### २. येकोजीराजे तंजावर किल्ला प्रवेश केले

बेंगळूरचें राज्य करीत असतांना व्यंकोजीराजास तंजावरचें राज्य कसें व केव्हां मिळालें तत्संबंधींची हकीकत या उताऱ्यांत आहे.

---

# शब्दकोश

(कोशांतील आंकडे मूळांतील क्रमांकांचे आहेत.)

**अजम** १–(फा. अझम्)–श्रेष्ठ; थोर
**अड** १–अट
**अनर्गल** ४–आडकाठी नसलेला
**अनसुट** ५–वीर्यवान्
**अनाईक** ३–अनायक; अनायकी
**अनीना** ५–(फा. इनान्) लगाम
**अमदरफ्ती** ४– दळणवळणाचें संरक्षण
**अमासवणी** ३–मासे मरून पडल्यानें खराब झालेले
**अरबुज** ५–राकट; आडदांड
**अराबा** २–तोफेची गाडी
**अरुता** ५–इच्छा
**अलबत्ता** ३–नक्की
**अवाढावी** ४–बेबंदशाही
**अविंध** ४–यवन
**अश्रणी** ३–अशरीरिणी वाणी; आकाशवाणी
**अश्वार** १–स्वार
**असमानगिरी** ३–छत
**अस्तावा** १२–झारी
**अस्वासणें** १–आश्वासणें
**आदळ** १–झटापट
**आमान्य** ९–कोरान्न
**आराबा** ३, ५, ६, १७–तोफखाना तोफेची गाडी
**आहमक** १२–पाजी
**आळा** १–अलंकार
**उभडा** ६–अनावर गंहिवर
**उल्लोच** ११–छत; चांदवा; मंडप
**उस्तरखाना** २–उष्ट्र > उस्तर > उंट
**इजाफा** ३–अधिक
**इजातदार** १–मक्तेदार, ठेकेदार
**इतबारी** २–विश्वासू
**ईर** ६–हिंमत
**ईसाई** १–(ईसा–येशु ख्रिस्त)–ख्रिस्ती
**एक बेरीज** १६–एकत्र केलेल्या जमाखर्चाचा लेख
**कचदिल** ३–भितऱ्या मनाचा
**कचकलागत** ४–तंटाबखेडा
**कजाख–खी** १३–युक्ति, रानटीपणा; क्रूरपणा
**कटकबंद** २–सैन्यानिशीं
**कंठाळा** १६–पडशी, गोणी
**कडोविकडी** ५–पराकाष्ठा
**कर्दीम** ३–जुनें
**कमरगा** ५–सैन्याची बाजू; मध्यभाग
**कमकसर** १०–जवळजवळ
**करोल** ५–बंदूकवाला घोडेस्वार
**कलगी** १६–तुरा; रत्नखचित शिरोभूषण

कबिला १–कुटुंब, जनाना
करीणा ३–हकीकत
कस्त ४–पराकाष्ठा
कही १३, १७–लष्करासाठीं गवत, लाकूड-फांटा आणणारी सैन्याची टोळी
कातर ३–एक प्रकारचा पट्टयाचा हात
कापडी १३–यात्रेकरू
कामाविस १–वसुली
कार्पास ११–कापूस
कावित्र १–लबाडी
काहाळा १–वाद्यविशेष
किनखाप ११–सोनेरी, रुपेरी, जरीच्या वेलबुट्टींचें काम केलेलें रेशमी वस्त्र
क्रिया ३–शपथ
कुल ३–सर्व
कैची ५–दारूच्या बाणांची जुडी
कैदवार ३–हुकुमांत
कैवर्तक १–कोळी
कौल ४–वचन, आश्वासन
खता २–खोटें
खत्ता ५–कमी होणें
खरस ६–तृषेमुळें तोंडांतून येणारी फेसासारखी थुंकी
खलक-खल्लक १–सर्व लोक
खलक २–कारस्थानी लोक
खवासखाना १६–अंबारी किंवा हौदा यांचे खिदमतगार बसण्याची जागा
खास्त ६–टप्पा
खासबदार १६–खाशांचीं शस्त्रें बाळगणारा
खुम १–रीत, चाल
खुषवक्त १–संतुष्ट
खोंचली १–खिन्न झाली
गंगाळटोप १–शिरस्त्राण
गंजिफा ( गंजिफिया )६–दारूगोळा
गरनाळा ५–कुलपी गोळ्याची तोफ
गलीम ४–शत्रु
गारभांडी ५, ६–गारगोटीचा चाप असलेली भांडी
गुरगुज ५–गदा ; परशु
गुराबा ४–एक प्रकारचें तारूं
गैब-गैबत ६–अदृश्यता
गैरकौली ४–बिगरपरवाना
चपेटे ५–तडाखे
चादरा २–वस्त्रें
चारण १६–तांडेवाला ; भात, मीठ वगैरे ने-आण करणारी एक जात
चावर १–एकशें अठ्ठावीस बिघे
चिंचवणी १–चिंचेचें पाणी
चिंचोरा १–चिंचोका
चिंधीचोला १–लूट
चिराकदान १६–दीपस्तंभ; दीपमाला
चुकूर ३–भ्रमिष्ट; बावरलेला
चौगीर्द ४–चहूंकडून
चौळ चुडाकर्म १–लहान मुलांचा शेंडी राखण्याचा विधि

**छबी** ६–तेज
**जंजिरा** ४–जलदुर्ग
**जती** १–यती, जैन संन्यासी
**जंबुरे** २–लहान तोफ
**जमदाड** ३, ५–मोठ्या पात्याची तलवार
**जमनीस** १२–एक वसुली अधिकारी
**जमीयत** १३–मंडळी; सैन्य
**जरजरा** २–थोडी थोडी
**जर्गा–जार्गा** ४–मंडळ; वेढा
**जबादा** ४–बंदोबस्त
**जितरब (जितराब)** ६–जनावर; घोडी
**जिम्मा** ९–हमी; पत्कर
**जिलीब** १२, १६–लवाजमा
**जीना (जीन)** २–खोगीर
**जुंबरे** ४–लहान बंदूक
**जुम्मस** ५–हार
**जेजाला** ५, ६–लांब नळीची बंदूक
**जेर** ४–हैराण
**झोटधरणी** ५, ६–केशाकेशी
**ठिकडे** १२–खडा
**तकटी** ५–पदक; पिंपळपान
**तक्करावा** १३–फळ्या जोडून केलेलें तक्त
**तगड** ११–चांदीचा वा पितळेचा पत्रा
**तडीतापडी** ११–गोसावी
**ततबीर** २–उपाय
**तमाम** २–सर्व
**तमामी** १६–ज्यांत उभें सूत जरीचें व बाणा रेशमाचा असतो, असें कापड
**तरांडे** ४–जहाज; मोठें तारूं
**तलावा** २, १७–शत्रूची पाहणी करण्यासाठीं
**तव** ६–घेरी, मूर्च्छा
**तश्रीफ** २–मानाचा पोषाख
**तस्करा (तस्किर)** १२–परवित्ताप-हार
**तसनस** ४–विध्वंस
**ताबितानी** ४–व्यवस्था
**तालिवार–तालेवार** ५–श्रीमंत; सुदैवी
**ताले** १२–नशीब
**ताशे मरफे (ताशे – मरफे)** एक प्रकारचीं वाद्यें
**तिवाशी** ३–तक्या, गिर्दी
**तेजी** २–घोडा
**तेरीख** १२–तारीख
**तोडा** ३–साखळीच्या कड्याप्रमाणें केलिलें पागोट्यांतील बांधणीचें काम
**थटी** २–गाई, म्हशी वगैरे गुरें-ढोरें
**दबाजा** १–हुकमत, डौल, उद्धटपणा
**दमानी** ४–वाऱ्यासमोरची बाजू
**दरख** ११–हुद्दा
**दरोगा** १६–देखरेख करणारा
**दसोडी** ४–क्षुद्र

दिलपाखीनें २–मनापासून
दृढाव १–दृढनिश्चय
दुपेटा ५–शेला
देकार १६–दक्षिणा
देसक १–वतनदान
देसला १–देसाई
दोहडावले २–निरोप दिले
द्वालिबंद (दालिबंद) १–हत्यारबंद
धाडी गाणार ११–भाट; गवई
धांडोरा २–डांगोरा
धारसा ६–धार; कड
नकीब ५–ललकाऱ्या
नटनागर ५–नटून गांवांत हिंडणारा
नफर ५–उंट; उंटाची संख्या लिहावयाची असतांना संख्यावाचकापूर्वी लिहावयाचा शब्द
नरामिना (नर्मिना) ६–रेशमी वस्त्र
नवगोजी २–डेरा
नहर ११–कालवा; पाट
नामजाद ३–नियुक्त
नांवाजिक ३–मर्जीतले लोक
निटोपा ९–सरळपणा; योग्यपणा
निमचा ५–लहान तलवार
निमा १६–अंगरख्याचा प्रकार
निशाण १२–शिक्कामोर्तब
निसबत १२–सत्ता; हवाला; देखरेख
पचंगी १९–पोटपाठ झाकेल असें वस्त्र
पटे १–वस्त्र, शालजोडी इत्यादि
पलाण ६–पालाण; खोगीर
पहिरावणी (पैरावणी) १–पोषाख, देणगी, प्रावरण
पाईक २–पायदळ
पाखाडी १–घरांची रांग; बोळ
पातेजणें ३–विश्वासणें
पालत-ती १–पाळत
पालेगार-(पाळेगार) १,२–लुटारू बंडखोर स्वतंत्र जहागीरदार
पालकोईती १–जहाजावरील तांडेलाचा टहाळ तोडण्याचा लहान कोयता
पीलखाना २–हत्तीखाना
पुंसवन १–सोळा संस्कारांपैकीं एक; गर्भधारणा झाल्यापासून तीन महिन्यांनीं त्या गर्भाला पुंस्त्व प्राप्त होण्यासाठीं केला जाणारा संस्कार
पेशजी ५,६–मागें, पूर्वी
पेस्तर २,५–पुढील, भावी
पैदास्ती ४–नफा, मिळकत
पोगा (ग) र १–पोलादी खिळा
पोवंत १–पोहत
प्रमादणें १–मरणें
फड १६–सरकारी लिहिणें, वसूल घेणें इत्यादीची जागा
फरास १६–बिछायती, तंबू
फरासखाना १६–बैठकी वगैरेंचा संग्रह
फरे १–मोजणीचें एक माप (मण किंवा अर्धा मण)

फर्जंद २,१६– पुत्र
फिरंग-फिरंगाणा २,३,५– तलवार
बखतर ५– लोखंडी जाळीचें चिलखत
बदली ( बादली ) ११– भरजरी
बयाण २– वृत्तांतकथन
बळगी-( बुळगी ? )– टाकाऊ
बक्षी १२– सेनापति
बाके १– वाद्यविशेष
बाजे २– इतर
बाड ६– तंबू; तंबूची कनात; कुंपण
बारगे ५ ( बारगीर ? ) – घोड्यावर बसणारे शिपाई
बारू २– दारू
बिचवा ३– विंचवाच्या आकृतीची वाकडी कट्यार
बिचोला ६– लहान तंबू
बिनी ५– नाकपट्टी
बिरदे ५– गुणदर्शक चिन्हांची माळ
बेजरब ५– निर्भयपणें
बेनिगा १२– अपरक्षण
बेहडा१६– वहिवाट, शिबंदी, इनाम इत्यादींबद्दल नियम
बैगनी १७– वांग्याच्या रंगाची
बैसकार १– बैठक
बोळी १ ( बोळीहोन )–एक प्रकारचा होन
भतीजा ३– भाचा
भाईचार ३– स्नेह, बंधुत्व
भांडीं ४– तोफ
भानसिनी ६– दासी
भारघडी ६– जड सामान
भुलटा १९–चुरा
भोगाईत १ -विलासस्थान ; राहण्याचें घर
मजुरा ४– सूट
मझर ( महझर )-१ सनद
मनेवर ( मनेवार )–२ बंडखोर
मरदोमी ६– मर्दुमकी
मर्फा ११– लहान टिपरी, नगारा
मशाकत २– मेहनत
महकूब १७– तहकूब, रहित
माज १९– कंबर
मात्रुपक्ष १– माहेर
मालबिसात ४– मालमत्ता
मुजाफा ( मुजाखा )१२– महत्त्व
मुतालीक १२– उपमंत्री
मुद्दारत ( मुजारत ) १६–आदर-सत्कार
मुलाजमत ३– भेट
मुस्तेद १,२,३–सिद्ध, तयार
मेढा ११– लाकडी कोट, कठडा
मेवाती ५– मेवांत प्रांतांत राहणारे
मोख्तसर २– वजनदार लोक
मोहोरे १– पुढें
रईत १–रयत
राऊत १– घोडेस्वार
राणभरी ६–रानांत पळून गेलेले

रेकला ६–एक प्रकारची तोफ; छकडा
लगी १६– निशाण, पताका, झेंडा.
लवण १७– सखल जागा
लुगडीं १–वस्त्रें
वहमा ५–संशय, शंका
वारसे ( वारस ) ४–इमारतीचे एक लांकूड
वितान ११–चांदवा, छत, मंडप
विरगांठ १–अलंकारविशेष
विराणी १–वाद्यविशेष
विले ४–मागणी
वीर ६–ईर्षा, आस्था.
वेठ १–हमाल
शर्तनामा २–करार
शर्तमर्दी २–पराक्रम
शिलेखाना १६–युद्धोपकरणांचें स्थान
शेरणी ६–नदींत उगवणारी एक वनस्पति
श्रावक १–जैनमतानुयायी
सदर ३–कचेरी
सदुते ४–सिद्ध
सफेगंज ६–कत्तल
सलतनत १३–चतुरंगदळ
सलाबत ४–पगडा, प्रताप, यश
साबरीपंथ १–मांत्रिक जादुगाराचा पंथ
सामास १–सहावास
सायत ( साअत ) ६–घटिका, तास
सांवळे ६–हलकें लुगडें
साहेब नौबत १६–हत्तीवरील नौबत
सिताब ३–जलद
सीरपाव १–शिरपेच, बहुमानाचा पोषाख
सुतरनाला ३, ५, ६–( शुतरनाला ) उंटावरील तोफ
सुतरस्वार १६–उंटावरील स्वार
सुरतपाक १२–सुंदर चेहऱ्याचा
सोट ४–न कापलेले बुंधे
सोदासोदी २–शोधाशोधी
सौगंद २–शपथ
हंकारा १–दवंडी
हडकणें १–उद्देशून बोलणें
हरकारे २–जासूद
हरीफा ३–शौर्य
हलगा ११–एक वाद्य
हवाला ३–ताबा
हस्तकडग २–हातांतील वलय
हस्तपंजर ३–हाताचा पंजा
हांवभरी ५–उत्सुक
हाशील ४–फी, आकार
हुली २–गडबड
हेजीब ३–जिल्ह्याच्या अधिकाऱ्याचा मदतनीस
होके ४–तोफेचे गोळे, बाण, सुरुंग
क्षेत्रपति १–क्षत्रिय राजा

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | २० | केसे | केलें |
| ३ | १९ | सिर पाव | सिरपाव |
| ३ | २६ | घरोघर | घरोघर |
| ५ | २६ | येगपुरीस | येमपुरीस |
| ५ | २६ | यांस | त्यांस |
| ६ | १ | प्रसादलें | प्रमादलें |
| ६ | ७ | विजधामी | निजधामी |
| ६ | २८ | तयांरि | तयाचि |
| ७ | ६ | जली | जती |
| ७ | १३ | लोहोक्या याहि· | लोहोक्या याहि |
| ७ | १५ | राज्यात | राज्यान |
| ८ | १२ | टाकिल्या न आपले | टाकल्या व आपले |
| ८ | १२ | काय | काये |
| ८ | २० | लाहेकें | लोहके: |
| ९ | ९ | उभयवशि | उभयवंशि |
| १० | १० | आचार्य-संयुक्त— पंच ब्राह्मण-संयुक्त | आचार्य-संयुक्त पंच-ब्राह्मण-संयुक्त |
| ११ | १२ | यूरी | चूरी |
| १२ | २० | राय ॥ नागरस्यानें | राया नागरस्यानें |
| १२ | २६ | आपले हितार्थि | आपले हितार्थि ॥ |
| १२ | २६ | उत्तमप्रकारें दिवस | उत्तम प्रकारें दिवसें दिवस |
| १३ | ७ | शत्राचि | रायाचि |
| १३ | ८ | माने | मनि |
| १३ | ९ | तत्रास | तयास |
| १३ | २३ | तेते | तेथे |
| १३ | २७ | मायार पक्षि | मामार पक्षि |

| ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- |
| २९ | शास्त्रीविद्या | शास्त्रविद्या |
| ३ | निश्चये करीन | निश्चये करोन |
| १२ | मन्य | अन्य |
| १९ | दवा | दया |
| २० | येसाण्यास | येसाव्यास |
| २२ | समई घेवोन | समई दर्शन घेवोन |
| ९ | सर्वेपणे | सर्वेपणे |
| १७ | हढाव | हढाव |
| ११ | वीतपसील | बीतपसील |
| १८ | नाहीं | नाहीं. |
| १६ | प्रतापगडाने | प्रतापगडास |
| ११ | निवाद | निर्वाद |
| १४ | शहाजीचा लेंक | शहाजीचा लेक. |
| ३ | पोटां | पोटांत |
| १६ | जंबुरे | जुंबरे |
| ११ | जंजिरेकरी बोभाट | जंजिरेकरी याचा बोभाट |
| १८ | दाहोदेळांत | दोहो दळांत |
| ७ | लिंगोजी केशव सदाशिव आप्पाजी | लिंगोजी केशव व सदाशिव आप्पाजी |
| २१ | चालू | चालून |
| १ | राणेंभरी | राणभरी |
| १७ | भक्षू | भक्षून |
| १५ | बाहेन | बाहेर- |
| २ | हो होईल | होईल |
| १० | होऊन | होऊत |
| २१ | भाऊसाहेब इनाम | भाऊसाहेब यास इनाम |
| १ | भाबावली | भांबावली |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ९५ | १३ | लोकून | लोळून |
| ९५ | १७ | या कालिंदी-तीरीं | या प्रति कालिंदी-तीरीं |
| ९६ | ५ | कृपेनें | कृपेचे |
| ९६ | १५ | नारा पुरंदरे | नाना पुरंदरे |
| ९६ | २४ | संदेश | संदेह |
| ९६ | २७ | करवा | करवावा |
| १०१ | २१ | त्याची | त्यांची |
| १०५ | १ | समुद | समुद्र |
| १०५ | १४ | अत्यदुत | अत्यद्भुत |
| १०७ | ४ | श्रीविष्णूचीसु वर्णमय | श्रीविष्णूची सुवर्णमय |
| १०७ | १४ | वरिवात्न केली | परिधान केली. |
| १०९ | १६ | खास. | खास |
| १११ | २२ | तेबहाल | ते बहाल |
| ११२ | २५ | राजमुरा | रोजमुरा |
| ११२ | २७ | काडी व हालावी | काडी न हालावी |
| ११३ | ७ | जाबा | जावा |
| ११३ | ८ | ठिकड | ठिकडें |
| १३२ | १९ | सा | सा। |
| १३३ | ९ | सा | सा। |
| १३५ | १४ | ज्यास इस्तमेल | ज्यास पुढें इस्तमेल |
| १३५ | १९ | तितक्यांत | तितक्यांस |
| १३७ | २१ | हुद्दे हुद्दे | हुद्दे |
| १४० | २० | झाले | आले |
| १४४ | ९ | लोक लोक | लोक |
| १४४ | १३ | जाण्यांची | जाण्याची |